॥ श्री ॥

हिंदु संस्कृति–ग्रंथ संपादक व प्रकाशक मंडळाचा

द्वितीय ग्रंथ

# धर्म हवा कशाला?

लेखकः—श्री. गणेश दामोदर सावरकर

'मला काय त्याचें', 'राष्ट्रमीमांसा' इ. पुस्तकांचे कर्ते.

मार्गशीर्ष १८६०

(इ. सन १९३८.)

प्रथम आवृत्ति

किंमत १। रुपया.

# हिंदु संस्कृति-ग्रंथ संपादक व ग्रंथ-प्रकाशक मंडळ, नागपूर.

## निवेदन.

समाजास धर्माची अत्यंत आवश्यकता असते. त्यावाचून तो कधीच उन्नत दशेस येऊ शकत नाही, असा हिंदुधर्मशास्त्रज्ञांचा त्याचप्रमाणे पाश्चात्य देशांतील धार्मिक व तात्विक विचाराच्या लोकांचा सिद्धान्त आहे. सर्व प्राचीन समाजांत हिंदुसमाजच काय तो आपली प्राचीन संस्कृति घेऊन जीव धरून राहिला आहे. ह्याचें सर्व श्रेय हिंदुधर्मासच आहे, परंतु सध्या हिंदु-संस्कृतीच्या मूलतत्वाचें अज्ञान आणि सत्वगुणप्रधान नसलेल्या परिस्थितीत बुद्धीस झालेले नवीन संस्कार ह्यांच्या योगानें जनतेत धर्मग्लानी येऊ पहात आहे. ह्यामुळे आमच्या चालीरीतींत हळूहळू फरक पडूं लागला आहे. तो फरक जातिभेद, विवाहसंस्था, अस्पृश्यता वगैरे आपल्या समाजाच्या मूलतत्वांतही क्रमशः प्रवेश करूं पहात आहे.

वैदिक धर्मीय मन्वादि स्मृतिकारांनी वर्णाश्रमाचे द्वारा जी समाज-घटना प्रसृत केली आहे ती निसर्गाला धरून आहे. आणि त्यांतील आचार-पद्धति जितकी निर्दोष असणे शक्य आहे तितकी निर्दोष आहे. तसेच हिंदूंचे तत्वज्ञान इतर कोणत्याहि तत्वज्ञानापेक्षा सरस आहे. आध्यात्मिक व आधिभौतिक उन्नति ह्यांचा सुंदर मेळ—जो इतर कोणत्याहि संस्कृतीस किंवा धर्मास साधला नाही—हिंदुसंस्कृतीनेच घातला आहे. अशा श्रेष्ठ संस्कृती-विषयी जे अज्ञान किंवा विपरीत ज्ञान हिंदु समाजांत वाढत आहे ते नाहीसे करून हिंदु संस्कृतीच्या अमोल तत्वांची ओळख व त्या संस्कृतीच्या स्वरूपाचे यथार्थ ज्ञान करून देण्याकरिता ह्या मंडळाची स्थापना करण्यांत आली आहे.

सांप्रत, जगांत अनेक पंथ निर्माण झाले असून त्यांचें वाङ्मयहि जोमानें निर्माण होत आहे. वाङ्मयावर अनेकविध गोष्टी अवलंबून असतात. कोणत्याहि चळवळीचा वाङ्मय हा प्राण असतो हे विसरून चालणार नाही. आणि ह्मणून आपण हिंदुसंस्कृतीस पोषक असें अभिजात, शास्त्रीय व ललित वाङ्मय मोठ्या प्रमाणांत प्रचलित भाषांतून निर्माण केले पाहिजे.

हेच कार्य मंडळानें आपल्या शिरावर घेतले आहे. तरी सदरहु मंडळाच्या कार्याचा सर्व हिंदुधर्माभिमानी लोकानी सहृदयतेने विचार करून त्याला यथाशक्ति मदत करावी सोबत मंडळाचे माहितीपत्रक जोडले आहे

**श्रीमद्जगद्गुरु श्रीशंकराचार्य महाराज, मठ संकेश्वर, ह्यांनीं या मंडळास पूर्ण आशीर्वाद दिला आहे.**

---

## 'हिंदु संस्कृति-ग्रंथ संपादक व ग्रंथ-प्रकाशक मंडळ' नागपूर.

(१) **उद्देश**—वेद, स्मृति, इतिहास (रामायण, महाभारत) व पुराणे ह्यातून प्रतिपादित केलेल्या हिंदु संस्कृतीस पोषक अशा ग्रंथाचे संपादन व प्रकाशन करणे.

ह्यांत पुढील ग्रंथांचा समावेश होऊ शकेल.—

(अ) **समाजविषयक शास्त्रें**—जसे (१) समाजरचनाशास्त्र (२) अर्थशास्त्र (३) राजकारणशास्त्र (४) शिक्षणशास्त्र (५) सामाजिक आचार (६) हिंदुसंस्कृति वगैरे

(आ) **इतर शास्त्रविषयक ग्रंथ**—जसे (१) अध्यात्मशास्त्र (२) योगशास्त्र (३) आचारधर्म वगैरे.

(इ) **ललितवाङ्मय**-(१) नाटके (२) कादंबऱ्या (३) लघुकथा (४) काव्ये (५) चित्रपटाचे कथानक वगैरे.

(ई) हिंदुसंस्कृतीस अविरोधि असे आधुनिक शास्त्रीय ग्रंथ.

**साह्यकर्त्यांचें वर्गीकरण—**

(अ) आश्रयदाते (आ) हितचिंतक आणि (इ) कायमचे वर्गणीदार.

(अ) **आश्रयदाते** वर्ग १ ला—अडीच हजार (२५००) किंवा अधिक देणारे. वर्ग २ रा—रुपये पाचशे (५००) किंवा अधिक देणारे. वर्ग ३ रा—शंभर १०० किंवा अधिक देणारे. वर्ग ४ था—रुपये २५ किंवा अधिक देणारे. वर्ग ५ वा—विना-

मूल्य ग्रंथ लिहून देणारे. (कमीतकमी १५० पानांचा ग्रंथ असला पाहिजे.)

(आ) **हितचिंतक**--रु. ५ किंवा अधिक देणारे.

(इ) **कायमचे वर्गणीदार**--प्रथमतः एकवेळ एक रुपया प्रवेश फी भरणारे.

(२) **सवलती**—(१) पहिल्या वर्गाच्या आश्रयदात्यास, संस्थेच्या उद्देशांत अंतर्भूत होणाऱ्या इष्ट विषयावर एक ग्रंथ मंडळाकडून लिहून घेणें, सदर ग्रंथ त्याचे इच्छेनुरूप अर्पण करणें. आणि त्याचे नांवावर ग्रंथकर्त्यास पारितोषक देणे, हे अधिकार राहतील. मंडळाकडून प्रसिद्ध होणाऱ्या सर्व ग्रंथाची एक प्रत फुकट देण्यात येईल.

(२) दुसऱ्या वर्गाच्या आश्रयदात्यास त्याच्या इच्छेनुरूप एक ग्रंथ अर्पण करण्याचा अधिकार राहील. आणि त्यास मंडळाकडून प्रसिद्ध होणाऱ्या सर्व ग्रंथाची एक प्रत फुकट मिळेल.

(३) तिसऱ्या वर्गाच्या आश्रयदात्यास मंडळाकडून प्रसिद्ध होणाऱ्या सर्व ग्रंथाची एक प्रत फुकट मिळेल.

(४) चवथ्या वर्गाच्या आश्रयदात्यास प्रत्येक प्रकाशनाची एक प्रत विकत घेणे जरूर राहील प्रत एक द्वितीयांश किंमतीस मिळेल.

(५) पांचव्या वर्गाच्या आश्रयदात्याचा ग्रंथ मंडळ स्वखर्चानें प्रसिद्ध करील. प्रत्येक प्रकाशनाची एक प्रत त्यास फुकट मिळेल.

(६) हितचिंतकास प्रत्येक प्रकाशनाची एक प्रत विकत घेणे जरूर राहील. प्रत दोन तृतीयांश किंमतीस मिळेल.

(७) कायमचे वर्गणीदारास प्रत्येक प्रकाशनाची एक प्रत विकत घेणें जरूर राहील. प्रत तीन चतुर्थांश किंमतीस विकत मिळेल.

मंडळानें प्रसिद्ध केलेले पुस्तक घेण्याचें नाकारल्यास सर्व सवलती रद्द होतील. ह्यामुळे मंडळास झालेला खर्च व शिवाय ८ आणे भरून सवलती पुन्हा सुरू करता येतील.

**सूचना**—मंडळाशीं करावयाचा पत्रव्यवहार प्रोफेसर भास्कर हरी मुंजे, वॉकर रोड, नागपूर शहर ह्या पत्त्यावर करावा. वर्गणी किंवा

देणगी देणाराना वसूल करणाऱ्याकडून कच्ची पावती मिळेल. व १५ दिवसाचे आत मंत्र्याच्या सहीची पावती मिळेल. ती त्या अवधीत न मिळाल्यास मंत्र्याकडे विचारणा करावी.

मंत्री—**भास्कर हरी मुंजे**,
,, **दत्तात्रय केशव भावे**, वकील
,, **वामन हरी मुंजे.**

---

## मंडळानें प्रसिद्ध केलेलीं पुस्तकें

१ **हिंदूंचें अर्थशास्त्रः**—भाग १ ला. ले गो म जोशी कि. २ रु

## पुरस्कृत पुस्तकें

१. **'वैदिक संस्कृतीची पुनर्घटना'**:—ले अप्रबुद्ध कि २ रु

२. **'हिंदूंचें समाजरचनाशास्त्र'**:—ले. गो म. जोशी. कि ५ रु.

**श्री. ना. चापेकर** आपल्या अभिप्रायात लिहितात, 'फेरबदल करतांना नुसत्या ऐहिक सुखाचा विचार करून भागणार नाही, कारण सुख अथवा विजय हा वंशाचा श्रेष्ठत्वाचा पुरावा होऊ शकत नाही इत्यादि प्रमेये हिंदु जनतेपुढे ठेऊन श्री. जोशी ह्यानी निरनिराळ्या मताच्या लोकाना विचार करावयास लाविले आहे.' हे पुस्तक मुंबई व मध्यप्रांत सरकारच्या शाळाखात्याने वाचनालयाकरिता मंजूर केले आहे.

३ **'आर्यधर्मोपपत्ति'**:—ले. ना. पै. उर्फ बावाजी महाराज पंडित. कि. रु. १॥.

प्रत्येक पुस्तकास टपाल खर्च निराळा पडेल.

**टीपः**—ही सर्व पुस्तके मंडळाच्या वर्गणीदारास पाऊणपट किंमतीत मिळतील. हिंदूचे अर्थशास्त्र, हिंदूचे समाजरचनाशास्त्र व धर्म हवा कशाला हीं तीनही पुस्तकें एकदम घेणारास ६ रुपयांस मिळतील.

---

## अनुक्रमणिका


| | | पृष्ठांक |
|---|---|---|
| १ | विषय प्रवेश .... .... | ३ |
| २ | धर्मावश्यकतेचें कारण काय ? .... ... | ४ |
| ३ | धर्माचीं कृत्रिम वा अनैसर्गिकशीं वाटणारीं कारणें.... | ५ |
| ४ | पाश्चिमात्यांत नास्तिकता कां प्रबल झाली ? .... | ७ |
| ५ | धर्माच्या अस्तित्वाला नैसर्गिक नि ह्मणून स्वाभाविक कारणें | ११ |
| ६ | शास्त्रीय सत्यकथन .... .... | २७ |
| ७ | ईश्वर आहे काय ? ... .... | ३६ |
| ८ | जन्ममरण परंपरेच्या अस्तित्वशोधनार्थ निर्विवाद प्रमाणशोधन .... | ४३ |
| ९ | जन्मसिद्ध अलौकिक सामर्थ्याचीं उदाहरणें .... | ४९ |
| १० | या असामान्य घटनांची कारणमीमांसा .... | ५५ |
| ११ | प्रत्यक्ष मरणकालीन आठवणी नि देखावे .... | ६० |
| १२ | मृत होऊन पुन्हां जिवंत झालेल्याचा अनुभव .... | ६३ |
| १३ | मरतांना काय होतें ? .... .... | ६४ |
| १४ | मृतात्म्यास स्वतंत्र अस्तित्व आहे काय ? .... | ६९ |
| १५ | मरणानंतरच्या अस्तित्वाचे पुरावे .... | ७१ |
| १६ | कांहीं विश्वासार्ह अनुभव .... .... | ७७ |
| | (अ) अनुभव १-३ .... .... | ७७ |
| | (आ) मृत पिता मुलीच्या लग्नाला उपस्थित झाल्याची घटना | ८४ |
| १७ | प्रबलतर कारतांचा प्रपंच .... .... | ८७ |

पृष्ठांक

पूर्वजन्मस्मृतीचीं विश्वासार्ह अुदाहरणें .... ८८
(क) सालेमपुरचा मलगा .... .... ८८
(ख) जगदीशचंद्राचें वृत्त .... .... ९२
(ग) विश्वनाथाचें वृत्त .... .... १०१
(घ) हीरा कौरची स्मृति .... ... १०६
(ङ) सुंदरलाल अर्थात् हन्नेलाल ... १०७
(च) चमेलीची पूर्वस्मृति .... .... १०९
(छ) व्रजचंद्रशरणची पूर्वजन्मस्मृति .... १११
(ज) वज्रांग बहादुरची पूर्वस्मृति .... ११२
(झ) पूर्वजन्मस्मृति .... .... ११३
(ञ) अेक ब्रह्मचारी नि अकबर—अकबराची पूर्वजन्माविषयीं निश्चिति .... ११४
(ट) पूर्वजन्मस्मृतीची साक्ष.... .... ११६
(ठ) पोलंडमधील अुदाहरण.... .... ११८
(ड) 'यथार्थ पूर्वजन्मस्मृति'.... .... ११९
(ढ) दिल्लीची शांति देवी. .... .... १२३
(ण) दोन जीवांचें परस्पर देहांतर .... १२८
१८ स्पष्टीकरणार्थ आव्हान करणाऱ्या कांहीं विशेष घटना.... १३४
१९ सत्यपरिशोधक वैज्ञानिकांकरितां आणखी अेक क्षेत्र.... १४०
२० प्रचंड अिच्छासामर्थ्याचे द्वारा चिच्छक्तीचें प्रभावदर्शन.... १४४
(अ) अेक देशभक्त हुतात्मा नि अेक अलौकिक स्त्रीरत्न १४७
(आ) सौ. थत्ते—सहगमन .... .... १५२

पृष्ठांक

(अि) अेका ब्राह्मण तरुणांचे महद्गमन .... १५३
(अी) मार्आण पुरीची महापातिव्रता .... १५४
(अु) मुकुंद ब्रह्मचारी याचा शरीरयज्ञ .... १५४
(अू) दोन असामान्य बालहुतात्मे .... १५५
(अे) विदेही वीर वैरागी .... .... १५७
२१ चिच्छक्तीचें स्वातंत्र्यदर्शन .... .... १६१
(अ) बौद्ध योग्याची स्वेच्छासमाधि .... १६२
(आ) योगिराज शंभुनाथ- जिवंत समाधि .... १६३
(अि) श्री. गुरुरुद्रदेवब्रह्म--यांची १०
दिवसांची अवरुद्ध विवरसमाधि ... १६३
(अी) महान योग्याची अवरुद्ध विवर समाधि-४० दिवस १६३
(अु) योगी हीरानंद ... .... १६६
(अू) तिबेटांतील विलक्षण योगशक्तिद्वय . १६७
(अे) अलौकिक शक्तिमान योगी .. १६७
(अै) डॉ. कॅननचे चार विलक्षण अनुभव .... १६८
(अो) सोमण पेन्शनर याचा स्वतःचा
अेक विलक्षण अनुभव . १७३
(अौ) हिरालालची विलक्षण गोष्ट .. १७६
(अं) पॉपची प्राकाम्यसिद्धी .... १७७
(अः) जोन्स रार्डिंग्जचे विलक्षण अनुभव .... १७८
(क) डॉ. टिंडालचा मृत्युवरील विजय .... १७९
(ख) योगींद्र चुडामणि यांची ऋद्धिशक्ति .... १८२

| | | पृष्ठांक |
|---|---|---|
| | (ग) मॅक्झिम गॉर्कीचा हिंदु योग्याचा असामान्य अनुभव .... | १८२ |
| | (घ) योगशक्तीचे प्रयोग प्रदर्शन .... | १८३ |
| | (ङ) विल्यम गेरहार्डीचा सूक्ष्म शरीरानुभव .... | १८३ |
| २२ | यावरून काय ठरतें? .... .... | १८९ |
| २३ | विश्व नि त्याला जाणणारा .... ... | १९१ |
| २४ | अेक संभवनीय आक्षेप नि त्याचे निराकरण .... | १९६ |
| २५ | जीवाचें अिष्ट कोणतें? .... ... | २०० |
| २६ | 'सुखसाधनार्थ प्रयत्न' ही जीवाची भ्रमशीलता आहे काय? .... | २०३ |
| २७ | सुखेच्छेमधील सुखकल्पनेचें स्वरूप .... | २०५ |
| २८ | असीम सुखप्राप्तीचें शास्त्र असूं शकेल काय? .... | २०७ |
| २९ | तें शास्त्र ह्मणजे धर्म .... .... | २०९ |
| ३० | यतोऽभ्युदय निःश्रेयस हेतुसिद्धिः स धर्मः .... | २१५ |
| ३१ | धर्म हवा कशाला .... .... | २१६ |

---

# प्रकाशकाचे दोन शब्द

ईश्वरकृपेने श्री. गो. म. जोशी ह्याचे 'हिंदूचे अर्थशास्त्र' हे पुस्तक प्रसिद्ध केल्यानतर सुमारे दीड वर्षांनी श्री. ग. दा. सावरकर ह्यांच्या तेजस्वी लेखणीतून उतरलेला 'धर्म हवा कशाला' हा ग्रंथ प्रकाशित करताना आह्माला आनद होत आहे. हिंदु अर्थात् वैदिक संस्कृति विषयक सशास्त्र वाङ्मय प्रसिद्ध करणे हा मडळाचा मुख्य उद्देश आहे. त्याला अनुसरूनच हा ग्रथ प्रसिद्ध होत आहे. हिदु संस्कृतीचा वैदिक धर्म हा आत्मा आहे. हिदु सस्कृतीची यथार्थ कल्पना येण्याकरिता वैदिक धर्म काय आहे त्याची मूलतत्वे काय आहेत हे समजणे आवश्यक आहे परतु त्याच्याहि अगोदर धर्म ह्मणजे काय त्याची आवश्यकता मनुष्यसमाजास खरोखर भासते काय हा प्रश्न सोडविला पाहिजे वैदिक धर्माची आवश्यकता, त्याचे इतर धर्माहून वैशिष्ठ्य व श्रेष्ठत्व सागण्याच्या अगोदर साधारणत धर्माचीच गरज का भासते व त्याशिवाय मनुष्य–जीवन कसे अपुरे राहते हे सिद्ध केले पाहिजे. त्या दृष्टीनेच श्री. ग दा. सावकर ह्याचा हा ग्रथ मडळाने प्रसिद्ध करून जनतेसमोर विचाराकरिता माडला आहे. सध्याच्या काळात तरी 'धर्म हवा कशाला' ह्या प्रश्नाला फार महत्व आले आहे. 'धर्म कृत्रिम आहे, धर्म ही अफूची गोळी आहे, धर्म काही लोकानी श्रीमताना लुबाडण्याकरिता निर्माण केला आहे' अशा तऱ्हेच्या कल्पना समाजसत्तावाद्यांनी प्रथम लोकात पसरविण्यास सुरवात केली. त्या कल्पनाचा उगम हिंदुस्थानच्या बाहेर झाला असला तरी हिदुस्थानात देखील त्या कल्पना पसरू लागल्या आहेत, व काही सुशिक्षित विद्वान् लोकाकडून त्यांचा प्रचारहि होत आहे. सुशिक्षित तरुण वर्गाला त्यामुळे मोह पडून धर्माच्या आवश्यकतेविषयी त्यांच्या मनात सशय उत्पन्न झाला आहे अशा वेळी तो सशय दूर करणारे वाङमय प्रसिद्ध करणे अत्यत जरुरीचे आहे. श्री. सावरकर यांनी अशा तऱ्हेचा ग्रंथ लिहून मराठी वाङमयांत मौल्यवान् भर टाकली आहे हे कोणीहि कबूल करील. सत्य जाणण्याकरिता त्या प्रश्नाची जितकी खोल व अधिक चर्चा होईल तितकी पाहिजेच आहे. श्री. ग. दा. सावरकर

हे मराठी वाचकाना अगदीच अपरिचित नाहीत. त्याची दोन तीन पुस्तकें अगोदर प्रसिद्ध झालेलीच आहेत. त्याच्या लिखाणाच्या तेजस्वितेविषयी काही लिहिण्याची आवश्यकता नाही ह्या विषयांवर लिहिण्याचा त्याचा अधिकार आहे किंवा नाही हें वाचक पुस्तक वाचून स्वतःशीच ठरवू शकतील. आम्हाला येथे ऐवढेच सांगावेसें वाटतें की त्यांनीं हा ग्रंथ आधुनिक पाश्चात्य तत्त्वज्ञानाचा सूक्ष्म व सखोल शोधक बुद्धीनें विचार करून लिहिलेला आहे. त्यांनी आपला सिद्धांत प्रस्थापित करताना एखादा ग्रंथ ईश्वरकृत अतएव प्रमाण समजून त्याचा आधार घेतला नाही. तर प्रत्येक विधान चिकित्सक बुद्धीच्या कसोटीवर लावून केलेले आहे. म्हणूनच त्याचा ग्रंथ विचारणीय झाला आहे.

ग्रंथांतील मताबद्दल व विधानाबद्दल लेखक सर्वस्वी जबाबदार आहे त्याची जबाबदारी मंडळावर यत्किंचितहि येत नाही. काही ठिकाणी तर त्याच्या व मंडळाच्या कल्पनांचा बराच भेदहि आहे. अशी भेदाची अेक दोन प्रमुख स्थळे येथे नमूद करणे यावरें होणार नाही. धर्माचा संबंध अीश्वर व पुनर्जन्म ह्याच्याशीं आहे. आणि अीश्वर व पुनर्जन्म सिद्ध झाले तर धर्माची सिद्धता आपोआप व निसर्गतःच होते असे त्यांनी सांगितले ही गोष्ट खरी आहे, परंतु आमच्या मतें व वैदिक धर्मानुसार अीश्वर व पुनर्जन्म ह्या शिवाय धर्माचा संबंध परलोकाशीहि आहे. या विश्वांत अनेक लोक–जीवाची वसतिस्थाने–आहेत त्यांपैकीं आपला मृत्यू लोक अेक आहे. देहपातानंतर जीव आपल्या कर्मानुसार दुसरा जन्म घेतो म्हणजे दुसरा देह धारण करतो. तो पुनर्जन्म या लोकी किंवा पर-लोकीहि मिळेल. दुसरे स्थल म्हणजे त्यांनी जो उत्क्रांतिवाद प्रतिपादिला आहे (पान २११) तो मंडळास त्या स्वरूपात मान्य नाही. परंतु हे प्रतिपाद्य विषयाच्या दृष्टीने किरकोळ मुद्दे आहेत. मुख्य सिद्धांताच्या बाबतीत मात्र दोघाचेंहि एकमत आहे. तो सिद्धांत लेखकानेंच पुस्तकाचें शेवटी दिला आहे. ‘सर्वजीवव्यापी परमसुखेच्छातृप्तिहेतु शक्य तितक्या सुलभ रीतीनें नि कमीत कमी काळात प्राप्त व्हावा आणि तो हेतु सिद्ध करता यावा अशा प्रकारची वैयक्तिक नि सामुदायिक सुस्थिति, सुसंपन्नता नि सुरक्षिति इत्यादि

पूर्णपणे प्राप्त झालेली असावीत अथवा थोडक्यात म्हणावयाचे तर या जगातील (व परलोकातीलहि) अभ्युदय आणि प्राणिमात्राना नैसर्गिक प्रेरणेनें प्रेरित करणारा परमसुखप्राप्तिहेतु निःश्रेयस ही दोन्हीहि यथार्थपणे मनुष्यसमाजाला नि त्यातील व्यक्तीला प्राप्त व्हावीत, म्हणून धर्म हवा '

ह्या पुस्तकात सावरकर बंधूंनी पुरस्कृत केलेली शुद्ध लिपी उपयोजिली आहे अशाची बाराखडी त्यांच्या शुद्ध लिपीप्रमाणे घेतली आहे. लिपिशुद्धि हे सावरकरांचे वैशिष्ट्य असल्यामुळे त्यांनी लिहिलेल्या पुस्तकात ती असणे योग्य व उचित आहे म्हणून आम्ही त्या लिपीचा ह्या पुस्तकात उपयोग केला आहे या व्यतिरिक्त मंडळाचा दुसरा कोणताहि हेतु ही लिपि वापरण्यात नाही

ह्या पुस्तकाकरिता मुद्दा महाग परंतु स्वदेशी कागद वापरला आहे. व छपाई बांधणी वगैरे शक्य तितकी उत्कृष्ट करण्याचा प्रयत्न आहेच तरी देखील पुस्तकाची किंमत फारच कमी ठेवली आहे उद्देश असा की जिज्ञासु विद्यार्थ्यांनाहि पुस्तक विकत घेऊन त्यावर विचार करता यावा

या ग्रंथाला प्रस्तावना लिहून दिल्याबद्दल आम्ही लोकनायक बापूजी अणे ह्यांचे फार आभारी आहोत. तसेच श्री विश्वनाथराव केळकर वकील यांनी मुद्रित तपासण्यात आम्हाला अमोल मदत केली त्याबद्दल त्यांचे व ग्रंथाची छपाई फार थोड्या वेळात व सुबक रीतीने करून दिल्याबद्दल नक्षत्र प्रेसचे मालक श्री. गो अ ओगले व व्यवस्थापक श्री नेवाळकर ह्यांचेहि आम्ही आभार मानतो

शेवटी याचप्रमाणें मंडळाचे कार्य यशस्वी रीतीने पार पडत जावे अशी जगच्चालक परमेश्वराची प्रार्थना करून वाचकांची रजा घेतो.

बांकर रोड,
नागपूर
ता. ७-१२-३८

**वामन हरि मुंज, मंत्री**
हिंदु संस्कृति-ग्रंथ संपादक व प्रकाशक मंडळ,
नागपूर.

---

# संदर्भ—ग्रंथांची यादी


| | ग्रंथकाराचे नांव | ग्रंथ वा आधारस्थल |
|---|---|---|
| १ | हर्बर्ट स्पेन्सर | ... फर्स्ट प्रिन्सिपल्स (नोअेबल नि अननोअेबल) |
| २ | अर्नेस्ट हेकेल | ... (i) पेरिजिनिसेस ऑफ ग्लॅस्टडच्यूल.<br>(ii) दी रिडल् ऑफ दी युनिव्हर्स. |
| ३ | विल्यम जेम्स् | ... (i) दी विल् टु बिलिफ अँड अदर पॉप्युलर अेसेज.<br>(ii) व्हेरायटीज ऑफ रिलिजिअस अेक्सपेरियन्सेस. |
| ४ | हक्सले | ... (i) अेव्होल्यूशन अँन्ड अेथिक्स.<br>(ii) मेथडस् अँन्ड रिझल्टस्. |
| ५ | चार्ल्स बोटविन | ... अिनर डिसिप्लिन. |
| ६ | नेट सेट जॉन मॉटेग्यू | ... रिव्हिलिशन्स ऑफ दी सोसायटी ऑफ क्लेरव्हायन्स |
| ७ | श्री. स्वामी रामकृष्णानंद | ... लाअिफ ऑफ श्री रामकृष्ण. |
| ८ | आर्थर लॅमरले | ... प्रिडिक्शन. |
| ९ | श्री. भागवत | ... धर्मजागृति—अंक. |
| १० | मायर्स | ... ह्यूमन परसनॅलिटी |
| ११ | श्री. सावरकर | ... वीर वैरागी |
| १२ | ,, प लेखराज | ... आर्य मुसाफिर (अेनअी अकबरी आणि अितर मुस्लिम पुस्तकाचे अुल्लेख) |
| १३ | ,, स्वामी अभयानंद | ... री अिन्कार्नेशन |
| १४ | ,, नंदकिशोर विद्यालंकार | पुनर्जन्म |
| १५ | गिबन | . राअिज अँड फॉल ऑफ रोमन अेम्पायर |
| १६ | फील्डिंग हॉल | ... दी सोल ऑफ पीपल. |
| १७ | श्री कैकयीनंदन सहाय, हायकोर्ट वकील, बरेली | ... रि अिन्कार्नेशन केसेस् डिसक्राअिबड् |

१८ केसरी, अमृतबाझार पत्रिका, लीडर, स्वराज्य, हिंदू, चित्रमयजगत्, विहार, हिंदुस्थान स्टॅंडर्ड आदिक वृत्तपत्रांचा संच.

# विषयप्रयोजन

जिचा दुरुपयोग भोदू व लबाड लोकाकडून केला जात नाही अशी सर्व जगात अेकहि गोष्ट नाही. भौतिक जगातील गोष्टीमधील लबाडी अुमगण्याची साधने ही सहजसाध्य नि सर्वसामान्यानाहि मोकळी असल्यामुळे ती जशी लवकर अुमगली जाते तशी स्थिति मानसिक, बौद्धिक नि आध्यात्मिक जगताची नाही. लबाडी अुमगण्याची साधने जितकी जितकी अल्पसंख्य अमूर्त स्वरूपाची नि म्हणून कमी कमी होत जातात तितकी तितकी त्या त्या क्षेत्रात लबाडी नि भोदूपणा अधिकाधिक होण्याचा संभव निर्माण झालेला असतो. अेखादा खोटा रुपया वा सोनपितळ खऱ्या रुपया-सोन्यापासून ओळखता येणें हे फारसे कठीण नाही; पण केवळ मनाच्या स्थितीवर अवलबून असणाऱ्या भावनाप्रकटनाचे सबधी तसे नाही स्नेह वा मैत्री दाखवित आपल्या स्वार्थासाठी फसवू पाहणारा मनुष्य हा पुष्कळ काळपर्यंत अुमगला जाणे कठीण असते. कारण त्याच्या स्नेहदर्शनाचा खोटेपणा अुमगण्याचे बाह्य सृष्टीतील साधन अुपलब्ध नसते त्याची फसविण्याची क्रिया साध्य झाली अथवा फसवण्याच्या क्रियेचा बाह्य जगतातील अेखादा पुरावा स्पष्टपणे दृग्गोचर झाला तरच त्याचे कपट अुघड होणार; पण तत्पूर्वी त्याच्या प्रेमप्रदर्शनकाली ते प्रेम खरे की खोटे हे अुमगणे सर्वथा अशक्यवत् होअून बसलेले असते. निरपेक्षता, सरलपणा, विश्वासपात्रता, प्रेम, देशभक्ति, अेकनिष्ठा, प्रामाणिकपणा अित्यादि मानसिक गुणाचे भोद नि लबाडीचें आडबर कोणीहि करू शकतों; आणि ते अुमगण्याची शक्यता मात्र फारच थोड्याना कधीनवतच लाभू शकते. बौद्धिक जगांतहि त्या गोष्टीच्या अमूर्ततेमुळे भोदूपणा नि लबाडी यांना विपुल क्षेत्र मिळू शकते. आध्यात्मिक क्षेत्रात तर मग विचारूच नका. त्यात लबाडी अुमगण्याची शक्यता तर फारच दुरावलेली असते. कारण या क्षेत्रांतील अमूर्तता ही सामान्यवर्गीयांच्या तर काय पण बुद्धिमान वर्गीयांच्याहि कल्पनाकक्षेत येत नसल्यामुळें या क्षेत्रांत तर लबाडी नि भोंदूपणा हीं पुष्कळ काळ छपलेली नि सुरक्षितपणें चालू शकतात. लबाडी नि भोंदूपणा चालविण्याला जितके अधिक सुलभ नि

सुरक्षित असे क्षेत्र असेल तितका तितका या गोष्टीना अधिकाधिक अूत येतो, ही गोष्ट आपल्याला थोड्याशा निरीक्षणाने कळण्यासारखी आहे.

सोने, रत्ने, मोती, विविध प्रकारच्या मूल्यवान् शास्त्र-रसायने आदिक योग्य परीक्षणावाचून ज्याचा खरेखोटेपणा सामान्य लोकाना समजणें कठिण असते अशा गोष्टीमध्ये अितर गोष्टीपेक्षा लबाड्या नि फसवाफसवी ही अधिक होतात. ही जर साधारण भौतिक अशा प्रत्यक्ष जगातली स्थिति आहे तर ज्या क्षेत्रातील गोष्टीचा खरेखोटेपणा असामान्य शक्तिमत्तेच्या पुरुषावाचून कोणलाहि चटकन् अुमजणे शक्य नाही अशा मानसिक, बौद्धिक, आध्यात्मिक आदिक क्षेत्रात लबाडयांना नि फसवाफसवीना मोकाट वाव सापडतो यात आश्चर्य काय आहे! आणि अितकी फसवाफसवी भौतिक नि मूर्त अथवा अभौतिक नि अमूर्त जगतात कित्येक गोष्टीविषयी होते तरीहि त्या त्या गोष्टी खोटया, भ्रमात्मक नि म्हणून त्याज्य आणि गहच आहेत असे आपण समजत नाही सोनपितळाने फसवणूक होते म्हणून सोने, रत्नात खोटेपणा चालतो म्हणून रत्ने, मोती खरी समजून परीक्षाभावी खोटी हाती आली यास्तव मोती, भोदू देशभक्ताच्या फसवाफसवीचे अनुभवाने फसल्यामुळे देशभक्ति आदिक गोष्टी जगात अस्तित्वातच नाहीत—केवळ भोदू नि लबाड लोकानी अुत्पन्न केलेली ही सर्व थोतांडे आहेत—असे जर कोणी बरळू लागला तर त्याची आपण वेड्यातच गणना करू. कमीत कमी त्या मनुष्याचे प्रलाप लक्ष देण्याच्या योग्यतेचे नाहीत, अुपेक्षणीय आहेत—तिकडे लक्ष देण्याचे कारणहि नाही असेच आपण म्हणू. तेव्हां अेखाद्या गोष्टीत फसवाफसवी, भोदूपणा, असत्यता नि अवडंबराचा धुमाकूळ याचा सुकाळ आहे म्हणून ती गोष्ट वा वस्तूच जगात नाही—ती केवळ भ्रमात्मक नि ह्मणून त्याज्य नि हेय आहे हा युक्तिवाद निर्बुद्ध्याना कदाचित् चकवणारा असला तरी बुद्धिवानानी थुंकून बघण्याअितकाहि योग्यतेचा नाही. ही गोष्ट सर्व विचारी लोक मान्यच करतील.

ही गोष्ट ध्यानी घेतल्यानतर जर अेखाद्या सत्यासत्यतेविषयीचा निर्णय देण्याकरता पुढे सरसावलेली मडळी वरील मूर्ख युक्तिवादाचा धुरळा अुडवीत अेखाद्या गोष्टीला खोटी, भ्रमात्मक, नि ह्मणून हेय आणि त्याज्य ह्मणून ओरड करू लागली तर विचारवंतांनी त्या त्यांच्या बडबडीकडे

यत्किंचित् सुद्धां लक्ष देण्याचें कारण नाहीं. उलट अशी गोष्ट भ्रमात्मक आहे असे नसून या लोकांची कोल्हेकुईच भ्रमिष्टपणाची आरोळी आहे असें समजणेंच श्रेयस्कर ठरेल. कारण कोणत्याहि गोष्टीच्या सत्यासत्यतेची कसोटी भोदूपणा नि फसवाफसवीचा होणारा आरोप ही नसून ती निर-निराळ्याच गोष्टीवर अवलबून असते. आणि याप्रमाणें निराळ्या नि स्वतंत्रपणे मिळू शकणाऱ्या पुराव्यावाचून त्या त्या गोष्टीचा सत्यासत्यपणा पारखून पाहणे हाच अेक योग्य नि बुद्धिसमत मार्ग आहे हें लक्षांत ठेवले पाहिजे.

सध्यां जगात बोलशेव्हिक लोकांकडून नि त्याचे करवीं प्रतिपादन केल्या जाणाऱ्या मनाला भुलून हुरळून जाणाऱ्या तदनुयायांकडून 'धर्म' या विषयाची अवहेलना केली जात आहे. धर्मक्षेत्रांतल्या फसवाफसवी भोंदूपणा नि तदुद्भूत आपत्तीची मालिका आणि बुद्धिनिष्ठ चिकित्साबुद्धीचें समाधान करण्यास असमर्थ होणाऱ्या तत्वज्ञानविहीन पश्चिमीय ख्रिस्ती-मनाविषयी अुत्पन्न होणारी स्वाभाविक अनादरबुद्धि यांच्या संयोगानें धर्मा-विषयी झालेल्या हेयबुद्धीने प्रभावान्वित होअून युरोपीय बोलशेव्हिक-सोशियालिस्ट जगत् 'धर्म ही अेक अफूची गोळी आहे, ढोंगी लोकांनीं निर्माण केलेली ही अेक स्वार्थसाधक युक्ति नि जादू आहे नि ह्मणून त्याचें कचाटयातून मनुष्यजातीने सुटले पाहिजे' असें मत प्रतिपादन करीत आहे. परतु हे मतप्रतिपादन सत्य की असत्य याचा निर्णय पौर्वात्यांनी—विशेषत: भारतवर्षीयांनी केवळ समाजसत्ता—समाजवाद्याच्या ह्मणण्याला प्रमाण मानून लावं नये. कारण त्यांच्या ओरडीत प्रमाणसिद्ध प्रतिपादनाचा लवलेश नाहीं. तसे प्रमाणसिद्ध प्रतिपादन धर्माच्या सत्यासत्यतेविषयी पूर्णपणें करून घेतल्यावांचून तद्विषयक निर्णयस्वीकृति नि तदनुसार मार्गावलंबन ही दोन्हीहि आपणाला विपथगामी केल्यावाचून राहणार नाहीत. आणि म्हणून साधकबाधक नि सारासार विचारपूर्वक या विषयाचा निर्णय लावून घेतला पाहिजे.

असा अेक संभव आहे की 'धर्म हा खोटा वा खरा ठरल्यावर जगाचें असें कोणतें मोठें कल्याण त्यावर अवलंबून आहे कीं ज्यासाठीं आज अितर सर्व अत्यावश्यकीय जीवनव्यवसायांच्या गडबडींत या प्रश्नाचा विचार अपरि-

हार्यंतेनें केलाच पाहिजे ' असा प्रश्न विचारला जाअील. आणि या प्रश्नाचे अुत्तर टाळणें हें युक्त नि अुपकारक होणार नाही. जगातील जी जी गोष्ट जीवनकालाला अधिकाधिक व्यापक, अधिक अुपयुक्त, अधिकाधिक अपरिहार्य नि म्हणून अधिकाधिक अवश्य असेल ती ती गोष्ट अधिकाधिक लक्ष देण्यास योग्य नि अवश्यकीय ठरेल. आरोग्य हे सर्व जीवनकालव्यापी होणें अत्यावश्य आहे नि म्हणून आरोग्यशास्त्र हे अत्यावश्य नि तत्संबधी नियम–पालन अुपकारक; चरितार्थसेधन हीहि गोष्ट अशी आहे की ज्याचेकडे दुर्लक्ष करणें या जगात जीवनयात्रा सुखासमाधानाने चालविण्याची अिच्छा करणाऱ्याला टाळतां येणार नाही नि म्हणून जीवनार्थ साधनाच्या गोष्टी, शास्त्रें, कला, मनुष्य जीवनाला अत्यावश्य नि अुपयुक्त आहेत. कदाचित् जर आपला जन्म हाच आपला आरंभबिंदू नि मरण हा प्राणिजीवनाचा पूर्ण-विराम–आधी वा मागून केवळ शून्यमयता असते, जन्ममरण परंपरेची कल्पना ही भ्रामक आहे–ही गोष्ट विवेचक परीक्षणानंतर खरी ठरेल नि असेल तर सर्व खटखटच आटोपली, काहीच अडचण अुरली नाही. मग वाटेल ते करावयास सर्व दिशा मोकळ्या नि मग जगातील भौतिक अभौतिक अशा कोणत्याहि पंथातील वा मनातील विधिनिषेध न पाळता साधेल नि जुळेल त्याप्रमाणें सर्व प्राणिसुलभ सुखलालसेच्या तृप्तीसाठी मोकाटपणे धावत सुटावयाला आपण चौखूर अुधळू या ! !

पण जर वर सांगितलेल्या नि त्यासारख्याच सर्व जीवनव्यापी अितर गोष्टीच्याच मालेंत धर्म बसत असल्यास तोहि तितकाच अत्यावश्य नि अपरिहार्य ठरेल. मग याहून तो अधिक आवश्यक नि उपयुक्त ठरल्यावर त्याचें महत्व, अुपयुक्तत्व नि अेकांतिक आवश्यकता किती असेल हे काही कोणास सागावयास नको.

केवळ या शरीरांतल्या जन्मापासून तों मरणकालपर्यंतच्या कमी अधिक मानानें शभर वर्षांच्या जीवनकालांत आवश्यक नि म्हणून अपरिहार्य ठरणाऱ्या धर्मेतर गोष्टीचें अितकें महत्व जाणावयास पाहिजे तर धर्म सांगतो तें खरे असल्यास–त्याचें सांगीप्रमाणें–अनादिकालापासून कालातीत होअी-'आवेतों होणाऱ्या (पूर्वी झालेल्या, आतां असणाऱ्या नि पुढें होणाऱ्या) पनंत जन्मांतून प्रवाहित होणाऱ्या जीवनप्रवाहाला अिष्ट वळण देणाऱ्या

आवश्यक मार्ग दाखवणाऱ्या, सकटसूचक करीत योग्यमार्गावलंबी ठेवणाऱ्या नि अती जीवमात्रांच्या अनत क्रियामधून ज्या अैक्या अिष्टतम नि म्हणून श्रेष्ठतम अशा परमानदमयतेच्या स्वाभाविक अिच्छेकडे प्राणिमात्र जाणून व अजाणता धावत जात आहे त्या स्वभावसिद्ध ध्येयाप्रत पोचवणाऱ्या धर्माची आवश्यकता नि अपरिहार्यता कितीतरी पटीने अधिक असेल. हें त्रैराशिक सम असल्यामुळे याचे अुत्तरी धर्म ही वस्तू तुलनात्मकतेने या जगातील सर्वश्रेष्ठ नि अेकमेव अत्यावश्य अशी गोष्ट आहे असेच दिसून येअील.

आजकालच्या युरोपीय भौतिकवाद्याचे–विशेषत समाजसत्तावादी नि समाजसमतावादी (सोशियालिस्ट नि कम्युनिस्ट) लोकाचे–भ्रमोत्पादकतेचे नि खोटेपणाचे आरोप धर्मादि गोष्टींवर जितके आले आहेत तितके अितर कोणत्याहि गोष्टीवर कोणत्याहि लोकाकडून आलेले नाहीत. नि त्यामुळें सामान्यपणे ज्या आरोळ्यानी भोवतालचे वातावरण दुमदुमून जाते तीच गोष्ट सत्य मानण्याची प्रवृत्ति असलेला सामान्य जनसमाज विचार करण्याच्या स्थितीत सतत नसल्यामुळे 'भ्रमात्मक, खोटी, भोदू लोकाकडून पुरस्कारलेली नि अफूच्या गोळीप्रमाणे लोकमनाला धुंदी आणणारी अनिष्ट अशी धर्म ही गोष्ट आहे' ही विवेकहीन आरोळी लोकमनावर भुरळ पाडून जगाला भ्रमात पाडीत आहे.

या खोटया, अप्रमाण नि म्हणून सर्वस्वी त्याज्य मताच्या आरोळीची छाया दूर होअून 'धर्म' या गोष्टीविषयीच्या सत्यासत्यतेचा विवेक लोकमनाने करावा आणि स्वतत्र, योग्य नि सारासार विचाराला अुपकारक अशा प्रमाणशोधनानतर 'धर्म' हा सत्य की असत्य नि तो अस्वीकार्य आणि म्हणून हेय नि त्याज्य अथवा स्वीकार्य नि म्हणून अत्यावश्य हें ठरवण्याचे साधन लोकाना हाती यावे, म्हणून या पुस्तकाचा प्रपच केला आहे आणि हे या पुस्तकाचें प्रयोजन आहे.

**ग्रंथकर्ता.**

---

# प्रस्तावना



" Kind and upright is the Eternal,
He teaches any who go astray
Guiding humble souls aright,
Teaching humble souls **His Way** "

'ओीश्वर सदय आणि ऋजु आहे. पथभ्रष्टांना तो मार्ग दाखवितो. दीन भूतात्म्याना तो सन्मार्गाचे दिग्दर्शन करून आपल्याकडे येण्याचें शिक्षण देतो.'

बाबासाहेब सावरकराच्या प्रस्तुत ग्रंथास प्रस्तावनेदाखल दोन शब्द लिहिण्याचे मी केवळ त्याच्या आग्रहास्तवच मान्य केले. ग्रथांतील प्रतिपाद्य विषय हा तत्वज्ञानशास्त्रवेत्यानाच पूर्ण आकलन होण्यासारखा आहे, विश्व-विद्यापीठात या शास्त्राचे अध्यापक ह्मणून प्रसिद्ध असणाऱ्या ओखाद्या पडितावर जर या ग्रथास पूर्वशब्द अथवा प्रस्तावना लिहिण्याचें काम सोपविले असते तर ते सर्वथैव योग्य झाले असते. परतु बाबासाहेबाचें लक्ष अशा ओखाद्या प्रथितयश पडिताकडे न जाता मजकडे गेलें हा अशा पडिता-पेक्षा त्याचा माझ्याशी अधिक निकट परिचयाचा व प्रेमाचा सबंध आहे हें असावे असे मला वाटते.

'धर्म हवा कशाला' या विषयावर त्यानी ही जी परिश्रमपूर्वक ग्रंथ-रचना केली ती अत्यत योग्य माणसाकडून व योग्य समयी झाली यांत सशय नाही. धर्म हे एक थोताड आहे हा विचार प्रस्तुत काळी तरुण वर्गांत अधिकाधिक प्रसृत होत आहे. कोठेहि चार तरुण चर्चा करीत बसलेले दृष्टीस पडले ह्मणजे त्यांची चर्चा धर्म अथवा धर्मसंबंधीं कल्पना व आचार ओीश्वर, अुपासना, जपजाप्य, अध्यात्मविचार याची अनुपयुक्तता अथवा निरर्थकता किंबहुना अनर्थकता अशासारख्या विषयावर बहुश: चाललेली असावी असें अनुमान केल्यास ते सहसा चूक ठरणार नाहीं. धर्म अथवा तदनुषंगिक कल्पना या सर्व केवळ श्रद्धागृहीत आहेत, त्यांना प्रमाणसिद्धि

नाही, आप्तवाक्य हे प्रमाण त्याना मान्य होणे शक्यच नाही, या परिस्थितीचा बारकाओीनें विचार करणाऱ्याचे मते तरुणाच्या मनावर नास्तिकवादाची पकड दिवसेंदिवस अधिकाधिक जोराने बसत चाललेली आहे हें स्पष्ट दिसतें. ही स्थिति अनिष्ट आहे असे ह्मणणारे नव्हे तर त्याबद्दल अंतःकरणापासून तळमळणारे बरेच विद्वान् ह्मणून समजले जाणारे लोक आहेत. परतु जडवादजन्य शकानी ज्याची मने ग्रस्त झाली आहेत व ज्यांनी आस्तिक्यबद्धीचा परित्याग विचारपूर्वक केलेला आहे अथवा जे करण्याच्या तयारीत आहेत असे दृष्टीस पडते, त्याच्या तात्विक शकाचे निराकरण करण्याचे बुद्धिसामर्थ्य व अधिकार हा सर्वानाच नसतो.

सावरकर बधूना अशी अेक परमेश्वरदत्त देणगी आहे की त्यानी हाक मारताच तरुणाची वृत्ति त्यांचेसमोर नम्रतेने लीन व्हावी हे सामर्थ्य त्यांच्यात निसर्गतः बीजरूपाने होते ह्मणूनच तीशी बावशीचे आत बाबाने व तात्यानें महाराष्ट्रातील तरुणाची अंतःकरणें आपल्याकडे खेचून घेतली. आपल्या प्रभावी कल्पनानी त्याची मने भारून टाकली व त्यानी अेक अघटित घटना निर्माण करण्याचा व्यूह रचला. त्या पूर्ववयानच विनायकराव सावरकर उर्फ तात्याराव यांची वाणी व लेखणी ही अेखाद्या यक्षिणीचे काडीप्रमाणें तरुणास मोहून टाकीत असे ही गोष्ट सर्वांना विदित आहेच या वशीकरण विद्येंत मी स्वातन्त्र्यवीर तात्यारावपेक्षा त्याचे वडील बधु व प्रस्तुत ग्रथाचे कर्ते बाबासाहेब याचा नबर वर लावावा लागेल, असे विधान करण्याचे धाडस करतो. तात्यारावाना निदान आपल्या अमोघ वक्तृत्वाचा व प्रतिभासपन्न कवित्वाचा अुपयोग करून ती मनें आकर्षित करता आली परतु बाबासाहेब हे अेखाद्या सिद्ध पुरुषाप्रमाणें अति मोजके व नेमस्त शब्द बोलून नुसत्या दृष्टिक्षेपानेच तरुणाना आपले नादी लावीत व अजूनहि लावतात. त्यानी फारशी व्याख्याने दिली नाहीत. भेटीस जाणाऱ्याशी सुद्धा ते फारसे बोलत नाहीत. ज्या अेक दोन गोष्टीचा त्याना निदिध्यास लागला आहे, त्याचाच कार्यापुरता अुल्लेख करून ते भेटीस येणाऱ्या पाहुण्याशी चाललेलें सभाषण आटोपतें घेत असतात. त्यांच्यांत मजलसीपणा नाही. अुलट ते अेकान्तप्रिय, मितभाषी आणि नेहमीं कांहींतरी गहन व गढ विचारांत गढलेले असे

दृष्टीस पडतात. परतु आपल्या कामी कोणता तरुण येअील हें मात्र त्यांची गरुडदृष्टि सहज ओळखू शकते आणि नेत्र अुघडून त्याचेकडे त्यांनीं सस्मित अवलोकन करताच त्या तरुणाचे ठिकाणी त्याचेविषयी कांहीतरी अपूर्व आदरभाव प्रकट झाल्याशिवाय सहसा राहत नाही. त्यांच्यांत असणाऱ्या या निसर्गशक्तीचें सामर्थ्य देशाचे स्वातंत्र्यप्राप्तीसाठी व हिंदुधर्माचे रक्षणासाठी त्यानी जो अतुल स्वार्थत्याग केला, ज्या अनंत हालअपेष्टा सहन केल्या आणि देहदंड सोसून त्यानी दोन तपे घोर तपश्चर्या केली त्यामुळें तर तें सहस्त्रपटींने अधिक वृद्धिंगत व प्रखर झालें आहे. ह्मणून तरुणांना सहसा न रुचणाऱ्या 'धर्म हवा कशाला' या सारख्या विषयावर लिहिण्यास व अुपदेशिण्यास सर्वथैव योग्य पुरुष ते आहेत. हा ग्रंथ बाबासाहेबानी लिहिला आहे अेवढी गोष्ट देखील त्याची अेक प्रत प्रत्येक महाराष्ट्रीय तरुणाचे खिशातून दृष्टीस पडण्यास पुरे आहे अशी माझी खात्री आहे.

त्यानीं यापूर्वी मराठीतून 'राष्ट्र मीमांसा' हा लहान पण विचारप्रवर्तक ग्रथ लिहिला आणि तेव्हापासून महाराष्ट्रांतील तरुणांच्या राष्ट्रीयत्वाच्या कल्पनेस त्याच्या विचारानुसार वळण हळुहळु लागत आहे हें मार्मिक निरीक्षकाचे नजरेस आल्यावाचून राहणार नाही. धर्म आणि वंश याच्या एकत्वावाचून राष्ट्रीयत्वाचे कल्पनेची पूर्णता होअू शकत नाहीं हा सिद्धात त्यांनी आपल्या पूर्व ग्रथातून परिश्रमपूर्वक प्रतिपादला आहे. हा सिद्धात पुढे माडून त्या राष्ट्रीयत्वाचे पायावर भावी देशकार्याची रूपरेषा त्यानी आखून टाकली असल्यामुळे त्या कल्पनेत अतर्भूत होणाऱ्या धर्म शब्दाचा तात्विक विचारहि यथाशास्त्र करणें त्याना क्रमप्राप्त होतें.

प्रस्तुत ग्रथातील प्रतिपाद्य विषय 'धर्म हवा कशाला' हा आहे. जगात तत्वज्ञान्याची जात निर्माण झाल्यादिवसापासून जे कांही प्रमुख प्रश्न सनत्कुमाराप्रमाणें तत्वज्ञानाचे बुध्दिरूप विश्वात अखड संचार करीत असलेले दृष्टीस पडतात, त्यांपैकीच 'धर्म हवा कशाला' 'धर्मस्य किं प्रयोजनम्' हा अेक आहे. 'अथातो धर्मजिज्ञासा, अथातो ब्रह्मजिज्ञासा' ही प्रत्येक द्विजाला ब्रह्मयज्ञांत करावीच लागते. तो मखानें पूर्वोत्तर मीमांसाशास्त्रांतील आद्यसूत्रद्वयाचा सर्व शास्त्रांचें प्रतीक ह्मणून अुच्चार करून या

शास्त्राचें अध्ययन केल्याचें व धर्म अथवा ब्रीद यांचें सम्यग्ज्ञान संपादन केल्याचें श्रेय प्राप्त झालें अशी आपली समजूत करून घेत असतो. या प्रकाराला अेखाद्यानें मिथ्याचार म्हटलें तरी त्यांत मोठी चूक नाही हे खरे. तथापि ही मीमांसा करून धर्मज्ञान व ब्रम्हज्ञान यांचें सोपपत्तिक अध्ययन करणें हें प्रत्येक द्विजाचें अेक नित्यकर्म म्हणून आर्यसंस्कृतीचे संस्थापक समजत होते अेवढे तरी या संस्कारावरून स्पष्ट होण्यासारखे आहे. धर्म-विचार हा सर्व आर्यसस्कृतीचा प्राण आहे. त्यामुळे बाबासाहेबांनी 'धर्म हवा कशाला' हा ग्रंथ लिहून देशांतील सर्व सुबुध्द जनतेसमोर अेक अत्यत आवश्यक पण नितान्त अुपेक्षिलेला विषय चर्चेकरितां अुभा केला आहे. हे त्यांचे मोठे अुपकार आहेत असेच विचाराती कोणासहि दिसून येअील.

धर्मभावनाचा लोप ही समाजाचे सामर्थ्य नष्ट करणारी व त्यास अकाली वार्धक्य आणणारी व्याधि आहे. ती आपले समाजास जडू नये याची खबरदारी घेणे हें समाजातील पुढाऱ्याचे कर्तव्य आहे. तरुणाच्या हातांत प्रस्तुत कालात काही अेका विशिष्ट विचाराचे वाङमय नित्य पडत असतें. तें तो करमणूक म्हणून वाचावयाला घेतो व तद्वारा धर्म, अीश्वर अित्यादिकांविषयी त्याचे मन हळूहळू साशक बनू लागते. अितकेच नव्हे तर धर्म हाच जगनांतील महान् अनर्थाचे व संकटपरपरेचे मूल आहे व त्याचे अुच्चाटन झाल्याशिवाय जगास खऱ्या सुखाची, समाधानाची व समृद्धीची प्राप्ति होणें शक्य नाही असाहि त्याचे मनावर थोड्याच काळात पकड धरून बसते. अध्यापक व पाठक हेहि बराच वेळ मोठ्या कौतुकाने आपल्या तरुण मुलाची वरील प्रकारची विचारसरणी मोठ्या कौतुकाने अैकत असतात. परंतु या विचारसरणीचा परिणाम त्याचे ठिकाणी कायमचा धर्मतिरस्कार निर्माण करण्यांत होत आहे अिकडे कोणीहि फारसे लक्ष देत नाही. अशा तऱ्हेनें 'लाफिंग गॅस' प्रमाणें हंसवित किंवा अेखाद्या अस्वलीप्रमाणें गुद-गुल्या करीत त्यांच्यांतील सर्व सात्विक भावना व विचारांचें अधिष्ठान गुदमरून टाकलें जातें व तें अेक मोठें संकट आहे याची वेळीच जाणीव कोणालाहि होत नाही. म्हणून तर आज कॉलेजांतून कितीतरी विद्वान् तत्व-ज्ञानशास्त्रवेत्ते अुपलब्ध असतां अेकालाहि या संकटाचे निराकरणार्थ सुलभ व सोपपत्तिक असा ग्रंथ लिहिण्याची बुद्धि अुत्पन्न झालेली दिसत नाही.

बाबासाहेबांसारख्या तरुणाशी समरस होणाऱ्या व नित्य त्याचे सान्निध्यांत कालक्षेप करणाऱ्या विचारवंताचे दृष्टीपासून ही स्थिति फार वेळ गुप्त राहणें शक्य नाही व अेकदा तो व्याधि तेथे मूळ धरून बसला आहे हे त्याचे दृष्टीस पडल्यानतर सर्व प्राचीन व अर्वाचीन शास्त्रांचें मथन करून त्याचे निवारण करण्याची महौषधि तयार करण्याचे अुद्योगास ते लागले व प्रस्तुत ग्रथ हा त्या मथनात अुपलब्ध झालेल्या अमृताचा कुभ आहे आणि बाबासाहेब हे साक्षात धन्वतरीप्रमाणे तो अमृतकुभ हातात घेअुन प्रत्येक तरुणास त्याचे पान करण्याचा आग्रह करीत आहेत असे दृश्य माझ्या डोळ्यासमोर हा ग्रथ वाचीत असता अुभे राहत असे.

'धर्म हवा कशाला' ही गभीर समस्या सोडविण्यासाठी बाबासाहेबानी हाती घेतली व तिचा निरनिराळ्या तऱ्हानी विचार करून त्यानी जो निष्कर्ष काढला तो असा –

'धर्म हवा कशाला' या प्रश्नाला सर्वजीवव्यापी परमसुखेच्छातृप्तिहेतु शक्य तितका सुलभ रीतीने नि कमीत कमी कालात परिपूर्ण व्हावा आणि तो हेतु सिद्ध करता यावा अशा प्रकारची वैयक्तिक नि सामुदायिक सुस्थिति, सुसपन्नता नि सुरक्षिति अित्यादि पूर्णपणे प्राप्त झालेली असावीत अथवा थोडक्यात ह्मणावयाचे तर या जगातील अभ्युदय आणि प्राणीमात्राना नैसर्गिक प्रेरणेने प्रेरित करणारा परमसुखप्राप्तिहेतु–निःश्रेयस ही दोन्हीहि यथार्थपणे मनुष्य समाजाला नि त्यातील व्यक्तोला प्राप्त व्हावीत ह्मणून 'धर्म हवा' हे अुत्तर येथपर्यंतचे विवेचन, प्रमाणशोधन, विवरण, परीक्षण व निर्णय ही आपणाला देत आहेत.'

या ग्रथांतील सिद्धान्त हा जडवाद्यांना अुत्तर ह्मणून लिहिण्यात आला आहे. धर्माचे प्रयोजन जीवाचें जडाहून भिन्न अस्तित्व तर आहेच. कारण धर्म हा दृश्याअितकाच अदृष्ट अशा एका तत्वाशी मनुष्याशी नव्हे तर यच्चयावत् विश्वाशी सबद्ध आहे असें गृहीत धरून चालतो. अितकेंच नाहीं तर धर्मातील तत्वद्रष्टयांच्या दृष्टीनें दृश्य हे क्षणिक व नश्वर असून अदृश्य ह्मणून जें गृहीत धरलें जातें व ज्याच्या अस्तित्वावांचून धर्मप्रयोजन सिद्ध होणें अशक्यप्राय आहे तें अदृश्यच हें शाश्वत सत्य आहे. जे जडवादी आहेत

ते जीव हा अेक जडामध्ये घडून येणारा रासायनिक परिणाम आहे असे समजतात. व अदृश्याचा हा सर्व खेळ भ्रममूलक आहे अर्थात् परलोक, पुनर्जन्म, परमेश्वर ही त्रिपुटी ही निव्वळ कल्पनाचा पसारा आहे असें ह्मणतात.

या ग्रंथात बाबासाहेबानी जडवाद्याचा सिद्धात अनेक तऱ्हानी खंडित केला आहे आता भौतिक शास्त्रातील अनेक तज्ञानी जडवादाने जगद्गूढाची समस्या सुटली नाही व पुढे केव्हाहि सुटणे शक्य नाही हे प्राजळपणे मान्य केले आहे.

याप्रमाणें जडवादाचे निराकरण होत असले तरी चैतन्यवादाने जगाचें गूढ सोडवता येणें शक्य आहे काय असा प्रश्न अुरतोच. ऋग्वेदातील 'नासदीय' सूक्त-द्रष्टच्या ऋषीने हाच प्रश्न आपले पुढे ठेवला होता. त्याच-प्रमाणें 'हिरण्यगर्भः समवर्तताग्रे भूतस्य जातः पतिरेक आसीत्। सदाधार पृथिवीं द्यामुते मा कस्मै देवाय हविषा विधेम ॥ अित्यादि अृचा पाहणाऱ्या ऋषीच्या समोरहि तोच विचार होता.

बादरायण व्यासाने 'तत्तु समन्वयात्' या सूत्राने वरील प्रश्नाचे श्रुतिवाक्याच्या समन्वयावरून स्पष्ट लक्षण सिध्द होते असे सिध्द करण्याचा प्रयत्न केला आहे.

श्रीमच्छंकराचार्यांनी आपल्या शारीर भाष्यात 'वेदवाक्याना समन्वये कृते ब्रह्मलक्षं सिध्दति' असे म्हटलें आहे. आणि ब्रम्हसूत्रातून व शारीर भाष्यातून जीवब्रम्हनिदर्शक श्रुतिवचनाचा समन्वय करण्यांत आला आहे. परतु हा समन्वय झाला व तद्वारा चैतन्यबीज ब्रम्हलक्षण सिद्ध झालें तरी अर्वाचीन सुशिक्षित आक्षेपकाचे समाधान होणें शक्य नाही कारण वरील ग्रथातील विवेचनात 'श्रुति' ही स्वयप्रमाण आहे व तिच्या प्रमाणग्राह्यतेस मुख्य अडचण म्हणजे श्रुतीतील परस्पर विरोध तो वस्तुतः नाही; विरुध्द दिसणाऱ्या श्रुतिवाक्यांचा समन्वय आहे व विद्वान् तो करू शकतात अित्यादि गोष्टी गृहीत धरल्या आहेत. आधुनिक तर्कशास्त्रप्रवीण सुशिक्षित आप्तवाक्य अर्थात् श्रुतीना प्रामाण्य आहे असे मानीत नाहींत. म्हणून त्यांच्याशीं

निराळ्या तऱ्हेनेच वाद करून व निराळी प्रमाणपध्दति अवलंबून त्याच्या शकाचे निराकरण केले पाहिजे. असे परीक्षण या ग्रथात बाबासाहेबांनी करून जड हे परतत्र आहे व चैतन्य हे स्वतंत्र आहे. स्वतंत्राधीन परतत्र जडाला राहणे हे क्रमप्राप्त आहे हे अुत्तम तऱ्हेने सिध्द करून दाखविले आहे. जीवशक्ति अथवा चिच्छक्ति ही देहधारण करण्यास का प्रवृत्त होते याचे कारणाची मीमासा करून ती कारणें सर्वव्यापी आहेत असा निष्कर्ष त्यांनी काढला आहे.

ही अनुमाने केवळ तर्कसिद्ध नसून त्याला मानवा अनुभवाचे पुराव्याने बळकटी आणलेली आहे. सूक्ष्म आणि स्थूल यामधील भेद व्यक्त करून स्थूल हे सूक्ष्म शक्तीच्या प्रेरणेने व प्रोत्साहनाने कसे चालत असतें याचें विवेचन केले व संस्कारात्मक शरीर अर्थात् लिगदेहाची अुपपत्ति समजावून दिली आहे.

जन्मातराचे सिद्धातावर स्मृत्यभावामुळे येणाऱ्या आक्षेपाचे फार मार्मिक खडन करून पुनर्जन्मतत्वाची विश्वसमत प्रतिष्ठा वाचकांच्या निदर्शनास आणून दिली आहे. या सिद्धीकरिता त्यांनी ग्रथांत अनेक विश्वस-नीय अुदाहरणाचा संग्रह केला आहे. त्या सर्वांच्या परिशीलनाचा सामवायिक परिणाम वाचकाचे मनावर पुनर्जन्मसिद्धान्त मान्य करण्यास अनुकूल असाच होअील.

याप्रमाणे आक्षेपकाच्या शकास्थानाचे समूळ निरसन केल्यावर विश्वाला जाणणारा कोणीतरी आहे हे मत सर्व विद्वानांना कसें मान्य आहे हे निरनिराळ्या तत्ववेत्याच्या व शास्त्रवेत्याच्या ग्रथांतील समर्पक वचने अुद्धृत करून सिद्ध केले आहे. जीवाचें अिष्ट सुखसाधनार्थ प्रयत्न किवा जुन्या वेदान्त परिभाषेंत पुरुषार्थ हे आहे हे दाखवून दिले आहे. सुख-कल्पनेचे वास्तविक रूप यावर मार्मिक विवेचन करून अुत्कृष्ट प्रकाश पाडला असून 'असीम सुखाची कल्पना' ध्येयरूपाने विशद केली आहे. आनंद-धन, निरतिशय–निरवधि–निरपवाद आनंदप्राप्ति हे ध्येय तर्कशुद्ध व अनुभवसिद्ध आहे असें ठरविल्यावर असीमसुखप्राप्तीचे शास्त्र म्हणजेच धर्म व हेंच धर्माचें प्रयोजन व यासाठींच धर्म हवा हा सिद्धांत अुन्नीत केला आहे.

कोणत्याही विचारी व परिपक्व बुद्धीच्या माणसास या ग्रंथातील सिद्धान्त तर पटेलच व यांतील विचारसरणीच्या सूक्ष्मतेबद्दल व मार्मिकतेबद्दलहि सादर कौतुक करावेसे वाटेल.

बाबासाहेबांनी जो विचार या ग्रंथाचे रूपाने पुढें मांडला त्याची चर्चा पाश्चात्य देशातून अलिकडील काळात अनेक विद्वानानी केली आहे. व ज्या मानवी अनुभवाची अुदाहरणे या ग्रंथात बाबासाहेबांनी संकलित केली आहेत तशी मानवी अनुभवाची अुदाहरणे नीट परीक्षण करणाऱ्या संस्था मानसशास्त्र व अध्यात्मशास्त्र परलोकगत जीवशास्त्र अित्यादिकांच्या अभ्यास करण्यासाठी पाश्चात्य देशात निघाल्या आहेत. मायर नावाच्या अेका शास्त्रज्ञाने 'Human Personality' म्हणून जो ग्रंथ लिहिला तो अशाच अुदाहरणाचे योग्य परीक्षण करून व त्यावर ग्रंथहि विचार करून लिहिला आहे. William Mc Dougal म्हणून अेक नामांकित मानसशास्त्रज्ञ आहेत. त्यांनी मानसशास्त्रावर अनेक ग्रंथ लिहिले आहेत त्यांच्याहि विचारांचा ओघ प्रस्तुत प्रतिपादलेला सिद्धान्त हा भौतिक व मानसिक शास्त्राच्या खोल अभ्यासावरून निष्पन्न होतो हे सिद्ध करणारें, त्याचें अेक 'Religion and the Science of Life' ह्मणून नुकतेच निबंधाचे पुस्तक प्रसिद्ध झाले आहे त्या विषयावरील अुपरोक्त निबंधाचे १६ वे पानावरील भाग अवश्य वाचकानी परिशीलन करावा. त्या निबंधाचा सारांश या प्रस्तावनेंत द्यावा असा प्रथम माझा विचार होता. परंतु विस्तारभयास्तव तो मोह मला आवरणें भाग पडले. त्यातील अेकच वाक्य येथे देतो. त्यावरून सर्व निबंधाचीहि परीक्षा वाचकास शीतावरून भाताची परीक्षा करतात त्याप्रमाणे करता येअील.

'Here then we have yet another line of evidence that each man is not what to many scientists he has seemed to be, a fortuitious concatenation of physical forces, but is rather a ripple of the mighty ocean of spirit, an individualised ripple, small and feeble, yet sharing in the nature of the whole and not wholely detached from it'.

'अनेक विज्ञानशास्त्रवेत्यांना वाटते त्याप्रमाणे मनुष्य केवळ भौतिक शक्तीची सहजगत्या जुळलेली साखळी नसून तो महान् अशा चैतन्य सागरावरील अेक तरग आहे. प्रत्येक तरगाला स्वतत्र वैशिष्ठ्य आहे तो लहानसा व दुर्बळ असला तरी त्या सपूर्ण चैतन्यसागराच्या क्रियाप्रक्रियेत तो अशभागी आहे–त्यापासून तो सर्वस्वी अलिप्त अथवा भिन्न नाही.'

यापेक्षा जीवाजीवामधील सबध अधिक मार्मिक शब्दांत कोणास तरी सागता येअील काय ?

रसेल नावाच्या लेखकानी तर 'One Thing That I know' या नावाच्या ग्रथात मर्त्य मनुष्यास अतींद्रिय वस्तूच्या अस्तित्वाचे प्रत्यय कसे येतात याची कितीतरी अुदाहरणे सविस्तर दिली आहेत. Mc. Dougal साहेबांच्या ग्रंथातील अेक अुतारा देअून हा प्रस्तावनालेख पूर्ण करतो. 'The evidence supports the view that religion and science have ample scope to approach even nearer to the truth without essential conflict to reality, without any sacrifice of the essentials of religion or any offence against the most rigid canons of scientific reasoning. It bids us be of good cheer; for truth and reason are not mere adaptations to envoironment, rather truth is a spiritual ideal and must in the end prevail and reason is the essence of the universe; while the beauty is the symbol of immortal things, a symbol which we can but dimly comprehend, things which the poet alone may tell of in the symbolic language of his art.'

**"वास्तवतेशीं आवश्यक भासणाऱ्या कलहावांचून किवा धर्माच्या मूलभूत तत्वांवर पाणी सोडल्यावांचून अथवा तर्ककर्कश शास्त्रीय सिद्धांतांनां दुखविल्यावांचून धर्म नि विज्ञान यांना सत्याच्या समीपतर जाण्याला पुरेसा**

वाव आहे, ही गोष्ट पुराव्याने सिद्ध करणारी आहे. ते आपल्याला अुल्हसित राहण्याचा आदेश देते, कारण सत्य नि बुद्धिवाद ही केवळ परिस्थितीशी टक्कर देण्यासाठी वापरावयाची साधनें नाहीत, सत्य हें आध्यात्मिक ध्येय असून अंती त्याचाच जय होणार हे निश्चित बुद्धिवाद हा तर विश्वाचें सार आहे. सौंदर्य हे अमर्त्य वस्तूचें प्रतीक आहे; आपण त्याचे केवळ अधुकपणेंच आकलन करूं शकतो. कवीच काय तो आपल्या कलेच्या प्रतीकात्मक भाषेंत त्याचे वर्णन करण्यास समर्थ आहे."

शास्त्र आणि धर्म यातील विरोधाचा परिहार वरील वाक्यात ग्रंथकर्त्याने केला आहे अितकेच नाही तर अेक दुसऱ्यास अुपकारक आहे हे सुचविलें आहे. परतु धर्माचे श्रेष्ठत्वहि त्यात अुत्कृष्ट रीत्या व्यक्त केले आहे

बाबासाहेबाच्या या सुदर व गभीर ग्रथामुळे तरुण पिढीच्या विचारास अिष्ट वळण लागून त्याची बुध्दि व कर्तृत्वशक्ति धर्मसेवेस अधिक तत्पर व्हावी अशी शेवटी मी भगवताजवळ याचना करतो व त्यासाठी लेखणी खाली ठेवतो.

यवतमाळ, ता. २३-१२-३८
श. १८६० पौष शु २ बुधवार

माधव श्रीहरी अणे.

# अर्पण पत्रिका

श्री

वैदिक

धर्माविषयींची

एकनिष्ठा, मंडळाची

निरपेक्ष सेवा, अत्युच्च

सुहृद्स्नेह, स्पष्टवक्तेपणा, सरळता,

विनयशीलता इत्यादि दुर्मिळ सद्गुणसमुच्चयनिधि

**कै. पुरुषोत्तम रामचंद्र परांजपे**

ओव्हरसीअर व प्रमुख सभासद, हिंदुसंस्कृति ग्रंथ

संपादक व प्रकाशक मंडळ, नागपूर

ह्यांस मंडळाकडून हें पुस्तक

सादर प्रेमानें अर्पण

करण्यांत येत

आहे.

*

# १ विषय प्रवेश

मानवी जगामध्ये जी जी गोष्ट अुत्पन्न होते ती ती गोष्ट त्या त्या वेळच्या काही विशेष आवश्यकतानुसार अुत्पन्न होत असते. निष्प्रयोजन अशी अेकही गोष्ट अुत्पन्न केली जात नाही. आवश्यकता संपल्यावरहि काही काळ ती गोष्ट अस्तित्वात राहू शकेल, आणि त्या वस्तुची अडगळहि भासेल, कदाचित् तीपासून हानीहि होअू लागेल, पण तिची अुत्पत्ति मात्र अुपयुक्ततेवाचून झालेली नसते ही वस्तुस्थिति त्या त्या वस्तूची वेळ, स्थल, काल, नि स्थिती लक्षात घेता नीट विचार करणाऱ्याचे ध्यानी आल्यावाचून रहाणार नाही. हाच सामान्य नियम 'धर्म' या वस्तूविषयीहि खरा असल्याचें थोडक्याशा विचाराने दिसून येईल. ही अवश्यकता मनुष्यप्राण्याला केव्हा, का नि कशी, वाटू लागली याचा शोध करीत असता त्या आवश्यकतेच्या पोटी नैसर्गिक कारणाचे अस्तित्व आहे किंवा कृत्रिम नि ह्मणून अनैसर्गिक कारणे आहेत हे पहाणे आवश्यक आहे. कृत्रिम नि ह्मणून अनैसर्गिक कारणें असली तर ती कृत्रिम कारणें नाहीशी केलीं की, मग धर्माचे अस्तित्वनाशाला वेळ लागणार नाही. पण जर नैसर्गिक कारणेंच या सृष्टीत चिरंतनपणें अस्तित्वांत असली तर त्या नैसर्गिक कारणांपासून धर्माच्या अस्तित्वाचे नैसर्गिक कार्य घडल्यावाचून रहाणार नाही. तेव्हा धर्म अस्तित्वांत येण्याची आवश्यकता अुत्पन्न करणारी कारणे, वा कारण काय आहे? ते नैसर्गिक आहे की अनैसर्गिक आहे? आणि अनैसर्गिक असल्यास तें नष्ट करून धर्माची 'अडगळ' काढून टाकता येअील की नाही? हें बघण्याकरितां नि नैसर्गिक असल्यास तीं कारणें धर्माची आवश्यकता चिरंतनपणें टिकविणारी आहेत की काय हे ठरवण्यासाठी आतां आपण धर्माची आवश्यकता अुत्पन्न करणाऱ्या कारणांचा शोध करण्याकडे वळू.

---

## २ धर्मावश्यकतेचें कारण काय ?

जगामध्ये जड वा निर्जीव नि चेतन वा सजीव असे दोन मोठे भेद पडतात. आवश्यकतेची जाणीव होणे ही गोष्ट जडामध्यें शक्य नाही. ती जाणीव सजीवामध्ये वा चेतनसृष्टीतच शक्य आहे. जगामध्यें ज्याप्रमाणें जड वा निर्जीव आणि चेतन वा सजीव असे भेद पडतात त्याचप्रमाणें चेतना-मध्येंहि अज्ञान सजीव प्राणी नि सज्ञान सजीव प्राणी असे आणखी दोन भेद पडतात. माती, दगड, धातु, पाषाण, मणि, रत्न आदिक खनिज नि वनस्पति वृक्षादिक अुभ्दिज हे वर्ग सामान्यत: बोलावयाचे तर सृष्टीच्या जड विभागांत गणावयास चिंता नाही. (जगात जड असे वास्तवत: कांहीच नाही, असें भौतिक प्रयोगशास्त्री प्रो. जगदीशचद्र बोस सारखे विज्ञानशास्त्री यांनी सिद्ध केले आहे.) बाकी अुरलेले ओल नि अुष्णतेमुळे अुत्पन्न होणारे कीटकादि स्वेदज प्राणी, अंड्यापासून अुत्पन्न होणारे मुंगीआदि लहान जीव नि पक्षी वर्ग आदिक अंडज प्राणी आणि स्त्रीपुरुषमयोगापासून अुत्पन्न होणारे पशुवर्ग, वनचर नि मनुष्यवर्ग हे जारज प्राणी यांचा समावेश सजीव वा चेतन सृष्टीत होअू शकतो. परंतु वर सजीवात जो अज्ञान सजीव नि सज्ञान सजीव म्हणून भेद दाखवला त्या भेदानुसार मनुष्यप्राण्याव्यतिरिक्त सर्व जारज, अंडज नि स्वेदज प्राणी याचा समावेश अज्ञान सजीव प्राण्यामध्येच करावा लागेल. मनुष्यप्राणीच काय तो ज्ञानवान् जीव आहे. भासलेल्या अवश्यकतेच्या पूर्तीसाठी आपल्या बुद्धिबलाचा अुपयोग करून निरनिराळी साधनें निर्माण करावयाची नि त्या साधनाद्वारा आपली अवश्यकतापूर्ति करून घ्यावयाची ही गोष्ट केवळ मनुष्यप्राणीच काय तो करूं शकतो. आणि ही बुद्धिशक्ति असणें नि तिचा अुपयोग करण्याचें सामर्थ्य असणें यालाच ज्ञानवत्ता समजतात. धर्माची आवश्यकता मनुष्यालाच भासली. आणि धर्मो-त्पत्ति मनुष्यासाठींच जणू झालेली दिसत आहे. या धर्मोत्पत्तीच्या अनैसर्गिक कारणांची माहिती थोडीशी देअून नि त्यांचे स्वरूप वाचकांपुढें मांडून मग नैसर्गिक कारणांच्या शोधनाकडे वळणे बरे. त्यामुळें नैसर्गिक कारणें असल्यास तीं कळतांच 'कृत्रिम कारणें' पूर्वीं माहित झालेली असल्यानें तीं नैसर्गिक कारणांपुढें किती क्षुद्र, व्यर्थ, अवास्तव नि म्हणून त्याज्य ठरतात हें निराळें

प्रतिपादण्याची आवश्यकता अुरणार नाही. त्यासाठी कृत्रिम वा अनैसर्गिक कारणांचा अुल्लेख करून मग पुढील मार्ग आक्रमू लागू.

---

## ३ धर्माचीं कृत्रिम वा अनैसर्गिकशीं वाटणारीं कारणें

भारतात चार्वाक, बृहस्पति, आदिक नास्तिक लोक नि पश्चिमेकडील हेकेल, डाल्टन, टिडाल, डार्विन, आदिक परमाणुवादी, नास्तिक नि संशयवादी, लोक हे "धर्म हा कृत्रिम कारणानी निर्माण झालेला आहे—तो नैसर्गिक कारणानी अुत्पन्न झालेला स्वाभाविक असा नाही" असे प्रतिपादू लागतात. साम्रनचे बोल्शेव्हिक मनवादी लोक हेच मत समुदायव्यापी होण्याकरिता प्रयत्न करू पाहत आहेत. "सृष्टीतील निरनिराळ्या भौतिक द्रव्याच्या अेकीकरणापासून रासायनिक क्रियेने जीवशक्ति निर्माण होते आणि तें अेकीकरण बिघडून ती रासायनिक स्थिति विस्कटित झाली ह्मणजे ती नष्ट होते. निर्मितीच्यापूर्वी वा नाशानतर तिचे प्रकट वा अप्रकट अस्तित्व असू शकत नाही. जीवशक्ति ह्मणजे रासायनिक परिणाम. यापलीकडे काही नाही. परंतु काही बुद्धिवान पण ढोंगी नि स्वार्थसाधू लोकांनी आपला बडेजाव वाढावा, आपली पोळी पिकावी, आपल्या लगामी जनसमाज लागावा, त्याचेवर आपलें वर्चस्व गाजवावे नि याप्रकारें आपण सत्ता, वैभव, सामर्थ्य नि भोगविलास अुपभोगावेत ह्मणून धर्म नावाचे अेक ढोंग नि सोंग अुभें केले आहे. धर्म ह्मणजे अेक अफूची गोळी आहे. त्यांत वास्तवता कांही नाही. जीवच मुळी विनाशी नि रासायनिक सृष्टिपरिणाम आहे. मरण्यानंतर तो नष्ट होतो. तेव्हां परलोक, चिरंतन जीवन, पुनर्जन्म आदिक सर्व गप्पा आहेत. याचें नादी मनुष्यानें लागू नये. भारतीय नास्तिकांचें मतें प्रेतें जाळीत असल्यामुळें भस्मीभूतस्य (भस्म झालेल्या) नि पाश्चात्त्यादि लोक प्रेतें पुरित असल्यामुळें धूलीभूतस्य (माती झालेल्या) देहस्य पुनरागमनं कुतः (देहाचें वा त्या देहांतील त्या रासायनिक परिणामानें निर्माण झालेल्या जीवाचें पुनरागमन कोठून होणार?)" हा या सर्वांच्या ह्मणण्यातील तात्पर्यांश आहे.

खरोखरीच जर अशी स्थिति असेल, अशीच वस्तुस्थिति सिद्ध होअील तर मग धर्मादीचें बंड जितके लवकर मोडेल तितके चांगले. सृष्ट पदार्थांच्या संयोगामुळे नैसर्गिकपणें पण विशिष्ट प्रकारे निर्माण होणाऱ्या जीवानें जन्मापासून मरेपर्यंत सर्व प्रकारच्या कर्मांना एकमेव प्रेरक होणाऱ्या सुखेच्छेला अनुसरून आपल्याला अधिकात अधिक सुख कसे मिळेल हे बघत ते मिळविण्यातच मग्न राहावे त्याने मागे-पुढे, आजूबाजूला बघण्याचे कारणच नाही. "मला केवळ सुख अुपभोगावयास मिळावे" या नैसर्गिक अिच्छेची आज्ञा शिरसावंद्य मानीत आणि अितर कोणत्याहि गोष्टीच्या अफूच्या गोळयांकडे ढुंकुनहि न बघता सुखतृप्त्यर्थ कर्मपर रहावे हेच त्याचे निसर्गदत्त नि निसर्गप्रेरित कर्तव्य ठरते. समाजाकरिता त्याने झीज सोसली वा अितरांच्या अुपयोगी पडण्याकरितां कर्म केले तरी तसे करणे आपल्या सुखाला पोषक-वर्धक-अुपकारक होअील तरच करावें. अुलट जर शारीरिक आदिक अुत्कट बळाचे योगाने वा जन्मतःच मिळालेल्या अेकाद्या असामान्य शक्तीच्या सामर्थ्याने सर्वांच्या छातीवर नाचत, सर्वांच्या सुखाचा बळी घेत नि सर्वांना दुःखामध्ये लोटूनहि स्वतःचे सुख अभंगपणे नि निरपवाद रीत्या मरेपर्यंत अुपभोगतां आले तर त्याने निःशंकमने तसे वागावे. ते अगदी नैसर्गिक नि स्वाभाविक कृत्यच ठरेल. त्यात वाअीट असे काहीच नाही. अशा अनिर्बंध सुखाला आळा घालावा लागलाच तर तो केवळ स्वतःचे सुखाला अितरांकडून अडथळा होअील या भीतीमुळेच घालावा लागेल. त्या व्यतिरिक्त "स्वतःचे सुखाचा संक्षेप करण्यास स्वाभाविक नि ह्मणून निसर्गांतर्गत दुसरें कोणतेंहि कारण प्रेरक नाही." असा तर्कनिष्ठूर निर्णय या निसर्गसिद्धांतवाद्याला मान्य करावा लागेल. पण हा त्यांच्याच मूलभूत सिद्धांतानुसार निघणारा तर्कनिष्ठूर निर्णय मान्य करावयाला त्यांची जीभ धजावत नाही. त्यांचे मनाला धीरोसा येत नाहीं. त्यांच्याच सिद्धांतपक्षामुळे स्वीकारावा लागणारा हा निर्णय मनुष्य स्वभावांतर्गत अुपजत बुध्दीला कसासाच वाटतो. मनुष्याची अुपजतबुद्धि हा निर्णय स्वीकारीत नाही. आणि त्यासाठीं स्वार्थत्यागाची अुत्तमता सिद्ध करण्याकरितां जडवादी कच्च्या पायांच्या युक्तिवादांचे आधार घेअू लागतो. त्या तर्कनिष्ठुर निर्णयाचा तो स्वीकार करूं शकत नाहीं.

---

# ४ पाश्चिमात्यांत नास्तिकता कां प्रबल झाली ?

भूतकालातून भूतकालाशी मुसगति बिघडू न देता वर्तमानकाळ निर्माण झालेला असतो आणि भविष्यकाळहि वर्तमानकाळाची मुसंगति न सोडतां अुदयाला येत असतो. मधूनच धूमकेतूसारखा वाटणारा संबंध-विहीन फरक मुद्धा सूक्ष्म दृष्टीने मूलशोधन केलें असतां पूर्वकालाशी संबद्ध झालेला दिसून आल्यावाचून रहात नाही. या नास्तिकतेला प्रबल आधार मिळून तिचे स्वरूप विशेष व्यापक नि स्थिरस्वरूपी होण्याला पाश्चात्य भौतिकशास्त्रवाद्याचे जडशास्त्रसिद्धात कारणीभूत झालेले आहेत. पण हे जडशास्त्रसिद्धानाचे प्रतिपादकमुद्धा जडवादाचाच पुरस्कार का करूं शकले याचा विचार करता त्याचे बीज जडशास्त्र अुदयाला येण्याच्या पूर्वकालात रुजलेले होते असे दिसून येअील. पाश्चात्य देशात अथवा अधिक निश्चित अर्थी बोलावयाचे तर हिंदुस्थान नि हिंदुस्थान-शिष्य झालेल्या चीन, जपान, सयाम, तिबट, ब्रम्हदेश आदिक आशियांतील देशाव्यतिरिक्त जगांत सर्वत्र पसरलेली धर्ममते या नास्तिकतेच्या—या प्रबल नि निश्चित आधारावर अुभारलेली वाटणाऱ्या नास्तिकतेच्या—मुळाशी कारण झालेली आहेत असे दिसून येअील यहुदी, मुसलमान नि साप्रतच्या ख्रिस्ती मतामधून तत्व-ज्ञानाला ठाव राहिलेला नाही. आत्मस्वरूपज्ञान, पुनर्जन्मसिद्धांत, कर्मा-नुरूपजन्म, इत्याद्यनेक तत्वज्ञानोद्भूत सिद्धात तत्वज्ञानाचे पारखेपणामुळें त्या मतांना मुळीच ठाअुक नाहीत. साप्रतच्या ख्रिस्ती मतांत नि येशुनें प्रति-पादलेल्या धर्मोपदेशात महदंतर पडलेले आहे. येशु ख्रिस्त हा बौद्धपंथांतील अेका अुपपंथाचा अनुयायी होता. आणि त्याने जो अुपदेश दिला त्याचें स्वरूप बौद्धपंथाशी बहुतेक मिळते जुळतें होतें. पुनर्जन्म, कर्मानुरूप जन्म, आदिक सिद्धांत त्यानें आपल्या अनुयायांना अुपदेशिले होते. पण धर्मपंथ-विचलित झालेल्या तत्वज्ञानविहीन यहुदा आदिक मताचा पगडा बसलेल्या त्या देशो-देशींच्या लोकाना ही शिकवणुक न पटून वा न आवडून पुढें त्यांनीं तो भाग काढून टाकीत आपल्या मनाशीं जुळत्या कल्पना ख्रिस्तानें अुपदेशिलेल्या गोष्टींत घुसडून दिल्या-नको होत्या त्या गोष्टी नि सिद्धांत काढून टाकले आणि सांप्रतच्या ख्रिस्ती मताची अेक खिचडी सिद्ध केली. असवी सन

३००-४०० च्या सुमारास कान्स्टँटिनोपलमध्यें भरलेल्या 'धर्मपरिषदेत' पुनर्जन्मादिक सिद्धांत हे अमान्य म्हणून ख्रिस्ती धर्मोपदेशातून काढून टाकीत नि तो अुपदेश यहुदी मताशी शक्य तेवढा जुळता करून घेत आज दिसणारे ख्रिस्ती मत अुभारण्याची घटना घडून आलेली आहे. वर निर्देशलेल्या सर्व मतांत पुनर्जन्मादि सिद्धाताच्या अभावामुळे अेकप्रकारे नास्तिकतेची गर्भ-स्थापना केली गेली. या सर्व मतात 'मनुष्य' मेल्यावर जो पुरला जातो तो त्याच देहाने सृष्टीच्या अंती अीश्वरी शक्तीनें नि अिच्छेने पुन्हां जिवंत होतो; अशा जिवंत झालेल्या सर्वांना तो अीश्वर स्वर्गांत वा नरकात आपल्या अिच्छेप्रमाणें ( वा लहरीप्रमाणे वाटल्यास ह्मणा ) ढकलून देअून मोकळा होतो असे सांगितलेले आहे.

मनुष्याचा मृतदेह पुरल्यानतर वा अशाच प्रकारे त्याची कांहीतरी व्यवस्था लावल्यानतर तो देह सडतो, कुजतो, नष्ट होतो आणि पुढें मातीशीं मातीरूपाने बहुतेक मिसळून जातो असा प्रत्यक्ष अनुभव स्थलो-स्थलीं येत असून सुद्धा तोच देह पुन्हा जिवंत होतो हे कसे शक्य मानले जातें याचे आश्चर्य वाटेल. पण तसे वाटण्याचे काहीच कारण नाही. अनियमित नि नियमरहित खुदाची वा आकाशांतल्या बापाची समर्थ अिच्छा हें सर्व कांही करू शकते ही भोळीभावडी वेडी समजून त्या आश्चर्योत्पादी स्थितीचे समाधान करीत असली पाहिजे. युरोपीय देशातील बुद्धिमान् नि विचिकित्सक लोकाची दृष्टि जेव्हा भौतिक शास्त्राकडे वळली तेव्हा त्या शास्त्रांच्या साहृयानें भौतिक वाढ झपाट्याने झाली आणि प्रमाणावाचून कोणतीहि गोष्ट सत्य ह्मणून स्वीकारावयाचीच नाही अशा विचिकित्सक बुद्धीमुळें निसर्गतःच स्वतत्र बनणारी मनोवृत्ती पाश्चात्य मनात प्रकट झाली.

भौतिक शास्त्राचे शोधक नवीन नवीन शास्त्रीय शोध करतात तेव्हा त्यांच्या शोधक बुद्धीची अेक विशिष्ट रचना झालेली असते. ज्ञात झालेल्या शास्त्रीय सत्यांच्या समवायांमुळें शोधक बुद्धीच्या कुशाग्रतेनें त्यांना संभवनीय वाटणाऱ्या अशा कांही गोष्टींची अंधुकशी कल्पना त्यांच्या बुद्धीपुढें अुभी राहते आणि तदनुसार ते आपल्या प्रयोगशाळेंत प्रयोग करतात. पुढें बुद्धीला अंधुकपणें दिसलेल्या संभवनीय गोष्टीची सिद्धता झाली ह्मणजे त्याला शोध

लागल्याचें स्वरूप येते. वाफेनें चहादाणीचें झाकण अुडते आहे हे पाहून वाफेच्या अगी असलेल्या शक्तीनें यंत्राला प्रेरणा देतां येअील ही संभवनीय शक्यता वाटलेल्या शोधकाने प्रयोगशाळेत प्रयोगावर प्रयोग करून आगगाडीच्या अेंजीनाचा शोध लावला. विद्युद्वाही धातूच्या ताराचे द्वारा संदेश दूरवर पाठवता येतील ही संभवनीयता वा शक्यता वाटून त्यासंबंधी शोध सुरू झाले. आणि अनेक प्रयोगाअंती तारायंत्राची कल्पना सिद्ध झाली. जर्मनीच्या झेपेलीनला विमानोड्डाणाची निश्चित शक्यता ध्यानात आली. त्या प्रयत्नात त्याने आपली सर्व संपत्ती व्ययी घातली, ऋणाचा भार वाढवून ठेवला, लोकानी त्याला वेड्यात काढले, तरी त्याचे मनातून त्या शक्यतेचे ठाणें अुठू शकले नाही पुढे भूतपूर्व जर्मनीच्या केसरचे साहाय्यबळावर पुन्हा प्रयोगाला त्याने हात घातला नि ती कल्पना प्रत्यक्ष मूर्त स्वरूपात सिद्ध करून दाखविली. हे येवढे येथे सांगावयाचे कारण असे की, साप्रतचे प्रयोगसिद्ध शास्त्रवादी वा भौतिक शास्त्रवादी नवीन शोध करीत असता त्याचे मनात शोधनीय वस्तूच्या वा गोष्टीच्या शक्यतेची वा संभवनीयतेची पूर्व कल्पना पहिल्याने अुत्पन्न होते. पुढे तदनुसार प्रयोग चालू होअून मग त्या कल्पनेची सत्यता ठरणे वा न ठरणे हे घडू शकते, हे ध्यानीं यावे. पश्चिमीय धर्ममतात आत्म्याचे स्वरूपाची नि पुनर्जन्माच्या सिद्धांताची यत्किंचित् सुद्धां ओळख होत नाही. त्याचा गंधहि तेथे सापडत नाही. केवळ जमीनीत पुरल्यावर सडून, कुजून, माती होअून गेलेला देह पुन्हा सृष्टीच्या अंती परमेश्वराचे अगी त्या धर्ममतानें चिकटविलेल्या काल्पनिक नि म्हणून अवास्तव सामर्थ्याने जिवंत होणार हें अनैसर्गिक नि बुद्धीला कधीहि न पटणारें म्हणणे केव्हांहि सत्यतेच्या कक्षेंत येणें शक्य नाही असे वाटून त्याच्या धर्ममतांकरवीं आत्मादिकाविषयीं नकारात्मक ठसा वठलेल्या भौतिक शास्त्रवाद्यांच्या दृष्टीने विविध द्रव्याच्या अेका विशिष्ट प्रमाणात नि विशिष्ट प्रकारें झालेल्या संयोगानें अेक जीवरूप परिणाम अुत्पन्न झालेला त्यांना दिसतो; नि म्हणून तें मिश्रण बिघडतांच जीवरूप परिणाम नष्ट होतो असें त्यांनी ठरवले. त्याला स्वतंत्र नि चिरंतन अस्तित्व नाहीं याच गोष्टीच्या प्रतिपादनाकडे त्यांच्या त्या मूळ ठशांनीं त्यांचा कल वळविलेला होता. तेव्हां ज्या गोष्टीची

शक्यता वा संभवनीयता त्याच्या कल्पनाकक्षेतहि आली नाही, त्या आत्म्याच्या अस्तित्वादिक सिद्धांताना त्याच्या करवी अस्ति पक्षी शोध लावतां येण्याचा मार्गच बहुतेक खुंटला गेलेला होता. त्यात आश्चर्य ते काय? 'पूर्वग्रहानुरूप कल्पना सुचून तदनुसार धर्मसबधी शोधात नास्तिकाचे मन प्रतिपादित होत आहे. या विधानाची सत्यता दुसऱ्या अेका प्रतिद्वंद्वी अुदाहरणावरून स्पष्टपणे लक्षात येण्यास साहय होओील म्हणून तशा अेका प्रख्यात अुदाहरणाकडे वळू. श्री जगदीशचंद्र बोस हे प्रख्यात विज्ञानशास्त्री सर्वप्रसिद्ध आहेत. सर्व जगात चैतन्य भरून अुरलेले आहे अशी शिकवण देणाऱ्या आर्यसंस्कृतीत त्याचा जन्म झालेला असल्यामुळे त्याना त्या कल्पनेपासून सहजगत्या सुटका करून घेता येणे शक्य नव्हते सर्व जगातील विज्ञानशास्त्री निरपवादरीत्या जडवादी असताहि आणि 'चेतनवर्गाचे शास्त्र नि अचेतनवर्गाचे शास्त्र ही पृथकच ठेवा, या दोहोंचा मेळ घालण्याच्या भरीस पडू नका (तो मूर्खपणा होओील)' असे पाश्चिमात्य विज्ञानशास्त्र्यानी सर्वज्ञतेचा ढोल आणून बजावले असताना मुद्धा 'सर्व जगात चैतन्य भरलेले आहे' या शिकवणुकीच्या हिंदू संस्कृतीचा ठसा त्याच्या मनोभूमिकेत ठाणे धरून होता. या संस्काराने सर्व वस्तुमात्रात चैतन्यांश आहे हा हिंदुतत्त्वज्ञानाने प्रतिपादलेला सिद्धांत भौतिकशास्त्राच्या प्रयोगसिद्ध मार्गाने सिद्ध करून दाखविता येणे शक्य होओील असे वाटून त्या मार्गाने त्यांचे प्रयत्न चालू झाले. आणि दीर्घपरिश्रमाने नि स्वतःच्या अतिसूक्ष्म परिणामदर्शी यंत्राच्या साहयाने केवळ वनस्पतीमध्येच नव्हे तर धातूमध्येहि सजीव प्राण्यामध्ये दिसणारी सवेदनाशक्ति—जाणीव—वास करीत आहे हें सिद्ध करून पाश्चिमात्य भौतिक शास्त्रांच्या क्षेत्रात प्रचंड विचारक्रांति घडवून आणली. पाश्चिमात्य भौतिक शास्त्रवाद्यांचा कल नास्तिकता प्रतिपादनाकडे वळण्याचे कारणाची जी मीमांसा मागें केली आहे तिला या वर दिलेल्या श्री जगदीशचंद्रांचे अुदाहरणानें पुष्टीच मिळत आहे.

याप्रमाणे पाश्चिमात्त्य प्रयोगसिद्ध भौतिक शास्त्रांचे तज्ञांकडून नास्तिकता गृहीत कां धरली गेली नि त्याच कारणामुळें आत्म्याचें भौतिक द्रव्यापासून स्वतंत्रपणें अस्तित्व असल्यासंबंधाने त्यांना आतांपर्यंत प्रयोगसिद्ध पुरावे का

मिळाले नाहीत हे लक्षात घेता हे त्याचे नास्तिक्यमतप्रतिपादन निर्विवाद सिद्धांतरूपाने स्वीकारता येत नाही ते का हे स्पष्टपणे कळून येते. यावरून धर्मादिक गोष्टींचे अस्तित्व निर्माण होण्याला कृत्रिम कारणेच कारणीभूत आलेली आहेत हा सिद्धांतपक्षी म्हणणे लगडे, कांतं, प्रमाद-शंका उत्पन्न करणारे आहे हे पाहिल्यावर धर्मादिकांना नैसर्गिक नि म्हणून स्वाभाविक कारणे अस्तित्वात आहत की काय? असल्यास ती कोणती? ती कारणे स्वाभाविक आहेत असे सिद्धांतरूपाने ठरल्यास धर्मादिक गोष्टी मनुष्याकरिता अपरिहार्यतेने आवश्यक आहेत काय? हे पहाणे ओघप्राप्तच झाले आहे. याप्रमाणे परिशोधन करून नैसर्गिक नि स्वाभाविक अशी कारणे सापडल्यास धर्मादिक अत्यंत आवश्यक नि म्हणून अपरिहार्य आहेत असे ठरल्यावर नास्तिकतेच्या मुळावर सहजगत्याच कुठाराघात झाल्यासारखे होणारे असल्यामुळे नास्तिकताखंडनाचे दुबार श्रम घेण्याचे कारणहि उरणार नाही. म्हणून आता स्वाभाविक कारणाच्या शोधाला हात घालू.

---

## ५ धर्माच्या अस्तित्वाला नैसर्गिक नि म्हणून स्वाभाविक कारणें आहेत काय?

धर्म म्हटला की ऐकणाऱ्याचें मनात पहिल्याने नि अगदी प्रामुख्याने ज्या एका वस्तुविषयी स्पष्ट, ढळढळीत, अनिवार्य, आणि अपरिहार्य अशी कल्पना येते ती वस्तु म्हणजे 'ईश्वर' ही होय. हा ईश्वर कोण नि कोणी निर्माण केला? जगाच्या घटनेत सजीव-निर्जीव असे दोन मोठे ठोकळ नि मुख्य विभाग पडतात हे मागे सांगितलेच आहे. त्यांपैकी जडाला आपले अस्तित्वाचे ज्ञान असणे शक्य नाही. जडवत्ता-जडपणा-ह्मणजेच ज्ञानाचा अभाव होय. आणि तसे असेल तेव्हाच त्याला जड ह्मणतात. तसे नसेल त्या वस्तूचा अंतर्भाव जडात, निर्जिवात न होतां सजीवांत-चैतन्ययुक्तांत होईल. या जडाचे अस्तित्व, जडाचे जडत्व, यांचे ज्ञान सजीवालाच शक्य आहे. जडाला आपले अस्तित्वाचे सिद्धीसाठी जणू काही ज्ञानशक्तीमत्तेच्या-सजीवाच्या तोंडाकडे बघत

वाट पहात बसावे लागते. जडाचें अस्तित्व आहे हें ठरविणारी, अेक प्रकारे जडाचें अस्तित्वाला सत्यत्व देणारी, जर कोणती शक्ति असेल तर ती ज्ञानशक्ति–चित्शक्ति–जीवशक्ति हीच आहे. जड जगतावर अस्तित्वाचा ठसा मारून 'जगत् हे सत्य आहे' हे ठरविणारी, सांगणारी, मानणारी जाणणारी, ही ज्ञानशक्ति आहे हिच्यावाचून अस्तित्वाचा आहेपणाच सिद्ध होणे अशक्य–सर्वथैव अशक्य आहे. अशी ही ज्ञानशक्ति वा चित्शक्ति प्रत्येक देहांतून–मग तो अत्यंत निकृष्ट प्रतीच्या किड्याचा वा जीवाणूचा असो वा अत्यंत अुन्नत स्थितीला पोहोचलेल्या मनुष्यप्राण्याचा असो, त्या देहातून हा ज्ञानवत्तेचा 'मी', हा चैतन्यांश 'मी', जगाचे अस्तित्व जाणून त्यावर आहेपणाचा वा सत्यत्वाचा ठसा मारणारा 'मी' गर्जना करीत आहे. जगातील यच्चावत् वस्तूंना आपल्या अस्तित्वाच्या सिद्धी-करिता या सजीव सृष्टीमधून व्याप्त झालेल्या दिसत असणाऱ्या ज्ञानसत्ता-धारी 'मी' वर अवलंबून–सर्वस्वी अवलंबून–रहावे लागत आहे. जणू काही विश्वभर पसरलेला चैतन्यात्मा प्रकटन कार्याला सक्षम झालेल्या प्रत्येक देहाच्या खिडकीतून स्वत:च्या अस्तित्वाचे प्रकाशकिरण या 'मी' पणाच्या रूपानें जगावर पाडीत जगाच्या अस्तित्वावर सत्यतेचा ठसा वठवीत आहे. सर्व देहाच्या मागे सर्व देहांना प्रकाशमान करणारी चैतन्यशक्ति जरी अेक असली तरी देहभिन्नत्वाने प्रत्येक किरण पृथक् पृथक् होअून आपापला 'मी' देहाश्रयानें लहान, मर्यादित नि अल्पशक्त करून ठेवित आहे. तथापि पूर्वी सर्वव्यापित्वाच्या शक्तीत त्याचे मूळ असल्याने त्या सर्वव्यापित्वाचे अनुभवाची महत्ता तो कशी विसरू शकणार? पूर्वानुभूत सर्वव्यापित्वाची स्वभावगत जाणीव सांप्रतच्या संकोचित, मर्यादित, नि अल्पशक्त 'मी' च्या स्वरूपाशी जुळत नसल्याने त्या जाणीवेचे अधिष्ठान माझ्याहून निराळें आहे असे अंशत: वाटून त्या पूर्वानुभुत जाणिवेला विषय होणाऱ्या सर्वव्यापित्वाच्या आपल्याच पूर्व-रूपाला तो 'अीश्वर' दृष्टीने मानू लागला. आता ही जाणीव ज्या मानाने कमी अधिक अंधुक, अस्पष्ट असेल त्या मानानें त्या 'मी' च्या जाणीवेतील तें अीश्वरी स्वरूप कमी अधिक विकृत, विपर्यस्त, नि चुकस्या स्वरूपाचें

असू शकेल. जर जगत् सत्य असेल, तर हे जगत् जितकें आणि ज्या मानानें सत्य आहे असें मानीत असाल, कमीत कमी तितकें नि त्या मानानें तरी सत्य त्या जगताचे अस्तित्वाला सत्यता देणाऱ्या ज्ञानशक्तिमान अनेक देहधारी जीवशक्तीचें–जीवात्म्याचें–आणि सर्वदेहव्यापी शिवशक्तीचे–परमात्म्याचे–ईश्वराचेंहि अस्तित्व मानलेच पाहिजे. जगताच्या अस्तित्वाला अस्तित्व देणारा, नि जगाचें सत्यत्व सत्य ठरविणारा जर असत्य, खोटा, भ्रमकल्पित, नि अस्तित्वान नसणारा ठरवू पहाल तर जगताचें अस्तित्व सत्य आहे याचा पुरावा काय? कशावरून जगत् सत्य याचे अुत्तर कोण काय देअुं शकेल?

प्रयोगशास्त्री, विज्ञानशास्त्री, नास्तिक्यप्रतिपादक ह्मणेल की, 'अहो! हें आह्मी प्रयोगाने सिद्ध झालेले पाहिले आहे. प्रयोगानुभवावरून जीवरूप परिणाम अुत्पन्न होतो वास्तविक जीव वा चेतन्य याना स्वतत्र अस्तित्व नाही.' या अुत्तरावर फार मोठा आक्षेप आहे नि तो आक्षेप पूर्वीच्या च्छेदकापर्यंतच्या प्रतिपादनात ध्वनित झालेला आहे तुह्मी खोटे आहांत याला प्रमाण काय? असें विचारले तर 'आम्ही' वा 'मी' हे सिद्ध केले ह्मणून; आणि जगत् सत्य आहे हे तरी सत्य कशावरून? जगताच्या सत्यतेला अबाधित पुरावा काय? असे विचारले तर त्या सत्यतेचा अनुभव 'आह्मी' वा 'मी' घेतो म्हणून; हे नि असेच अुत्तर येणार! या अुत्तरांत जगातील साऱ्या निसर्गनियमांच्या त्रिकालाबाधितपणाचें प्रमाण, जगाचे निःसंशय अस्तित्वाचा पुरावा आणि या जीवशक्तीचे वा चैतन्यशक्तीचे खोटेपणाचा-नास्तित्वाचाहि अत्यंत प्रमाणसिद्ध नि सर्वांनीं मानलाच पाहिजे असा सत्य निकष-सत्याची कसोटी-कोण तर आमच्यांतील 'मी' वा 'आम्ही'. जड जगताची सत्यता सिध्द करणारा, जगताची सत्यता जाणणारा, सर्व विश्वाची सत्यता ज्याचेकडून सिध्द केली गेल्यावांचून सत्य ठरूं शकत नाही तो 'मी' वा 'आम्ही' असत्य नि अस्तित्वांत नसणारा आहे असें म्हणणें म्हणजे केवळ निरर्थक प्रलाप करणें होय. यांत धन्याला 'चले जाव' नि चोराला 'बढे आव' असाच प्रकार असल्यासारखा दिसतो.

गहन विचारसामर्थ्य सर्व विज्ञानशास्त्रवेत्त्यांना असतेंच असे नाही. विज्ञानशास्त्रापैकी अेखाद्या शाखेंत प्राविण्य संपादून त्या शाखेत नवा शोध लावणें हे वेगळें नि अनेक विज्ञानशास्त्राची प्रमेयें जाणून घेअून कोणतीहि गोष्ट प्रयोगसिद्ध सिद्धान्ताशी जुळत असल्यावाचून मानावयाची नाही अशी वृत्ति ठेवीत तत्वज्ञानाच्या गहन प्रदेशांत आपल्या बुद्धीचा प्रभावी संचार करण्याची शक्ति असणे हे निराळे. विज्ञानशास्त्रवाद्याचे तर्कशुद्ध नि प्रमाणशुध्द सिध्दान्तच स्वीकृत करण्याची प्रवृत्ति असलेले गहनगंभीर विचारक नि तत्वविचारी लोक जगाच्या मूळाचा ठावठिकाणा घेण्यासाठी प्रांजल प्रयत्न करणारे पाश्चियात्य देशात बरेच होअून गेलेले आहेत. हर्बर्ट स्पेन्सर नि हेकेल हे दोन महान विचारक पाश्चात्य देशातील प्रमुखातल्या प्रमुखांपैकी आहेत. हेकेलेला तर ‘Father of the Scientists’ ‘विज्ञानशास्त्र्याचा पिता’ असे म्हणतात. विज्ञानशास्त्रपध्दतीनें विचार करणारा म्हणून त्याची फार प्रख्याति आहे. या दोन्ही विचारकानी कोणत्याहि पूर्वग्रहाना आपल्या मनात स्थान न देता केवळ शुद्ध तर्क पद्धतीने नि विज्ञानशास्त्राच्या निर्विवाद सिध्दांताचे बळावर तत्वज्ञान प्रदेशात संचार करीत जगताच्या मूल शोधनाचे कार्य जितकें करता येणे शक्य झाले तितके करून ठेवलेले आहे. हरबर्ट स्पेन्सरचा त्यावरील ग्रंथ म्हणजे ‘फर्स्ट प्रिन्सिपल्स्’ पैकी ‘अननोअेबल’ हा होय. त्या ग्रंथात जो अंतिम सिद्धांत त्यानी शक्य तेवढा परिपूर्ण विचार करून काढला आहे तो सिद्धांत दाखवणाऱ्या शद्बाचीच योजना त्या विभागाचे नामकरणांत केली आहे. “या जगातील देश (Space), काल (Time), आकाश (Matter), प्राण (Force) या गोष्टींचे अनंतत्व वा सांतत्व यांपैकी अेकहि निर्णय बुद्धि करूं शकत नाही. त्याचप्रमाणे जगतांतील मोठ्यांतल्या मोठ्या नि सूक्ष्मांतील सूक्ष्म पदार्थांचे यथार्थ ग्रहण होणे अशक्यवत् आहे. व्यक्त जगांतील कोणतीहि गोष्ट कळणे म्हणजे त्या वस्तुमुळें आपल्या मनावर जे संस्कार होतात त्या संस्काराचें ज्ञान आपल्याला होणें होय. खरोखरी वस्तुतत्व काय आहे हे जाणण्याचे प्रयत्न व्यर्थ आहेत—ही आपणाला कळणाऱ्या जगताची स्थिति आहे. मग या अवाढव्य जगताच्या मूल कारणाच्या—केवलाच्या—स्वरूपाची कल्पना कल्पितां येणें तर

त्याहूनहि दुरापास्त आहे. केवलाच्या केवलत्वाचे स्वरूप सर्वस्वी अज्ञेय आहे". हा त्याच्या त्या ग्रंथाचा थोडक्यांत निष्कर्ष आहे. शोधकर्ता जिज्ञासू ही गोष्ट निश्चितपणे जाणतो या विषयीचे त्याचे अेक वाक्य फार अर्थगर्भ आहे. ते म्हणतात, "He, more than any other, truly knows that in its ultimate essence nothing can be known". "(तो ज्ञानपिपासू नि परिशोधक) अितरापेक्षा अधिक निश्चितपणें **जाणतो** की कोणत्याहि वस्तूचे सत्यस्वरूप–वस्तुतत्व या विषयी कांहीहि जाणता येणें शक्य नाही." या वाक्यात जाणणाऱ्याच्या निश्चित जाणतेपणाची कसोटी जगत्सत्यतेच्या सत्यतासिद्धाताला आधारभूत म्हणून दिलेली आहे. ती फार अर्थपूर्ण आहे. जाणणारा हा सद्वस्तु आहे नि म्हणून त्याच्या जाणतेपणाला मोल आहे असाच भावार्थ वरील वाक्यांत आहे. आणि त्याच ग्रथांत अेके स्थळी "I am sure of it as I am sure that I exist"–"माझ्या अस्तित्वाच्या सत्यते अितका मी त्याचे सत्यत्वाविषयी निश्चिति बाळगतों". असा स्वसमतिदर्शक अुतारा दिलेला आहे. निरनिराळ्या मार्गानें तत्वविचार करणाऱ्या अनेक तत्वज्ञाचे–अुदाहरणार्थ प्रोटागोरस, गर्सन, लिओहेब्रियस, सेटआगस्टिन, ॲरिस्टाटल, बोअेथियस, अव्हेरोज, आल्बर्ट मॅगनस्, मेल्याक्थान स्कॅलिगर, फ्रॅन्सिस पिकोलोमिनि, गिसोर्डानो ब्रूनो, कॅपनेल, बेकन, स्पायनोझा, न्यूटन, कँट अित्यादीचें–या संबंधांत अैकमत्य आहे. या जगाला जर सत्यत्व असेल, जगांतील अनेक विज्ञानशास्त्रांचीं शोधून काढलेली प्रमेयें जर सत्य असतील, आणि या जगाचें सत्यज्ञान आणि तीं विज्ञानशास्त्रें नि त्यांचे सिद्धांत यांचें सत्यत्वज्ञान ही जर निश्चित सत्यज्ञाने असतील तर हीं सत्यज्ञानें ज्याला होतात, ज्यानें शोधून काढलीं, ज्यांनी जाणली तो ज्ञाता असत्य, रासायनिक क्रियोद्भूत क्षणिक परिणाम नि भ्रमात्मक असा कसा मानतां येणार? जर तो असत्य असेल, त्याचें अस्तित्व भ्रमात्मक असेल, क्षणैक कालापुरतेंच त्याचें अस्तित्व भासमान् होअून विझून जाणारें असेल तर अशा भ्रमात्मक नि मृगजलमय ज्ञात्याच्या साक्षीमुळें जगाला नि जगांतील प्रत्येक शास्त्रज्ञानाला सत्यत्व आहे असें कसें मानतां येणार?

दुसरे असे की, जगांत नवीन असें कांहीं अुत्पन्न होत नाही. कोणालाहि निर्माण करता येणे शक्य नाहीं. ज्ञानशक्ति एका विशिष्ट स्थितीत जर व्यक्त होते असे स्पष्ट दिसत आहे तर व्यक्तीकरणाची क्षमता नि परिस्थिति येण्यापूर्वी नि पर्यंत ती अव्यक्त स्थितीत होती असेच ह्मणणे भाग आहे. तिच्या नसणेपणातून तिला बळेच अस्तित्व प्राप्त झाले असे मानणे अगदी बालिशपणाचें, अजाणतेपणाचे, नि मूर्खपणाचे आहे विज्ञानशास्त्रवादी विचारक (Scientist philosophers) हा निर्णय अैकून घेण्याइतकासुद्धा मोलाचा मानणार नाहीत. विज्ञानशास्त्रवाद्यांचा जनक ह्मणून ज्याला ह्मणतात तो विज्ञानशास्त्रवादी विचारक अर्नेस्ट हेकेल आपल्या Perigenisis of Plastidule नामक पुस्तकात ह्मणतो "Without the assumption of an atomic soul the commonest and the most general phenomenon of chemistry are inexplicable; pleasure and pain, desire and aversion, attraction and repulsion, must be common to all atoms of an aggregate; for the movements of atoms which must take place in the formation and dessolution of chemical compound **can be explained only by attributing to them sensation and will.**" "रसायनशास्त्रामधील सर्वसामान्य नि मनन अनुभवास येणारा हा विषय विचारात घेतां प्रत्येक अणूत अण्वात्मा आहे असे मानल्यावाचून गत्यतर नाही. सुख नि दुःख, अिच्छा आणि तिरस्कार, आकर्षण नि निःसारण, हे गुण कोणत्याहि पदार्थांचे घटकपरमाणूत सर्वसाधारणपणें असले पाहिजेत. कोणत्याहि रासायनिक मिश्रणाच्या सयुक्ततेत वा वियुक्ततेत त्यातील परमाणूच्या याच गुणाचे कार्य घडून येत असले पाहिजे, नि त्याचकरितां प्रत्येक परमाणूमध्ये 'संविच्छक्ति' नि 'सकल्पशक्ति' ही असलीच पाहिजेत असें मानल्यावाचून त्या क्रियांचा अुलगडा होअू शकत नाही." **हेकेल हे जडाद्वैती आहेत. सर्व जगत् हें अेका मूलभूत अेकरसी जडात्मक द्रव्यापासून. गुणपरिणाम रीतीनें परिणत होत आलेलें आहे असें त्यांचें**

म्हणणें आहे. पाश्चात्य वैज्ञानिक तत्ववाद्यांच्या मनावर जडवादाचा प्रबल सस्कार झालेला आहे. आणि त्या संस्काराच्या प्रभावानें, जडवादाला धक्का देणारे पुरावे मिळाले तरी त्यांची जडवादापासून सुटका ते करून घेअू शकत नाहीत याचें त्यांच्या वरील निर्णयांत स्पष्ट प्रतिबिंब पहावयास मिळेल. जगाच्या घटकातील सर्व परमाणूंत संविद् नि संकल्प–शक्ति आहेत असें समजल्यावांचून त्यांच्या गुणधर्माचे नि क्रिया प्रतिक्रियाचें स्पष्टीकरण कोण-त्याहि रीतीनें करता येत नाही, असें स्पष्ट दिसून आल्यामुळें त्या दोन शक्तीचे अस्तित्व मानणे त्यांना भाग पडलें आहे. त्यांच्या वरील अनुभवाचें मर्म नीटपणे लक्षांत येण्यासाठी येथें थोडें त्यासबधी विवरण करणें अत्य-वश्य आहे. त्यांनी ज्या दोन शक्ति परमाणूंत आहेत असें मान्य केलें आहे. त्याचे यथार्थ स्वरूप काय हें आपण बघूं. त्यांपैकी पहिली संविद् शक्ति ही म्हणजे संवेदना वा जाणीवशक्ति होय. बाह्य पदार्थांचा आपल्यावर होणारा परिणाम अनुकूल की प्रतिकूल आहे हें समजणें याला संविच्छक्ति म्हणतात. अेका अुदाहरणाने ही गोष्ट पूर्णपणें ध्यानांत अेईल. आपण झोपेंत असतां अंगाला ढेकूण चावला वा अेखादा जिवत प्राणी लागला कीं लागलीच त्या स्पर्शाविरुद्ध शरीरक्रिया होअू लागते. कधी कधी आपण त्यामुळे शुद्धीवर येतो नि कधी येत नाही. ज्यावेळी शुद्धीवर न येताच स्पर्शाविरुद्ध शरीरक्रिया होतात त्यावेळी, तो ढेकुणाचा वा त्या अेखाद्या सजीव जीवाचा स्पर्श होताच शरीर चळवळ करूं लागून त्याला टाळू पहातें वा त्याला चिरडू पहाते, हा जो टाळू वा चिरडू पहाण्याचा प्रयत्न न जाणतां त्या स्पर्शाविरुद्ध ते शरीर करते त्यापूर्वी स्पर्शज्ञान होअून तो स्पर्श अिष्ट नाही हे ज्ञान अुदित झालेलें असतें. अणि यालाच सविच्छक्ति म्हणतात. त्यानतर त्या स्पर्श झालेल्या वस्तूविरुद्ध क्रिया करण्याकरता म्हणून शरीराला जी शक्ति प्रवृत्त करते तिला संकल्पशक्ति असे म्हटले जातें. या अुदाहरणांत शरीर जागृतावस्थेंत नसते. जाणीवेचा अत्यंत अंधुकसा अंश सर्व शरीरभर व्यापून असतो. नि तद्‌?ग हें स्पर्शज्ञान होतें. आणि त्याच जाणीवेच्या अंशा-कडून संकल्प केला जाअून शरीराकरवीं प्रतिकूल क्रिया घडते. अेखादे वेळीं शरीराच्या अेखाद्या अंगाला सुखद स्पर्श झाला तर तो भाग वा शक्य तर

सर्व शरीर त्या सुखद स्पर्शाचे अस्तित्वाला ओळखून त्या स्पर्शाला न टाळतां कवटाळावयास प्रवृत्त होओील. सारांश बाह्यतः निश्चेष्ट दिसणाऱ्या पण जिवंत अशा शरीरांतील ही संविद् नि संकल्पशक्ति वरील अुदाहरणावरून लक्षांत येअील. रासायनिक मिश्रणांतहि अशाच गोष्टी घडतात. कांहीं पदार्थ अितर कांहीं विशिष्ट पदार्थांचें सान्निध्य होतांच त्यांना ढकलू पहातात वा आपण त्यापासून दूर होतात. आणि दुसऱ्या काहीं विशिष्ट पदार्थांशीं संबंध येतांच त्यांकडे धावत जाअून मिठी मारतात. या क्रिया वरील दोन शक्तींच्या अस्तित्वावांचून होणें शक्य नाहीं असें हेकेलचें म्हणणें आहे.

संविद् नि संकल्पशक्ति या जर जडाचे गुण आहेत असें मानलें तर चैतन्यांत तरी अधिक काय आहे ! चैतन्य न म्हणतां जड म्हटलें काय, वा त्या गुणसमुच्चयाच्या अधिष्ठानाला जड न म्हणतां चैतन्य म्हटलें काय, सारखेंच ठरणार ! येथें शब्दांचा प्रश्न नाहीं. विशिष्ट सत्याचा प्रश्न आहे. जड नि सचेतन असे दोन भाग आपण करतो तेव्हां ते ज्ञानाच्या दृष्टीनें करीत असतो. जेथें ज्ञानवत्ता स्पष्ट वा अस्पष्टपणें राहून तदनुसार क्रिया-शक्ति असते तेथें जडता आहे असें मानीत नाहीत. आणि जेथें ज्ञानाचा सर्वस्वी अभाव राहून तद्भूत क्रियाशक्तिविहीनता दिसते तेथें त्या वस्तूला जड असें मानतात. जडाजडाच्या वा जडाच्या नि चेतनाच्या या व्याख्या जोंपर्यंत स्वीकारल्या जात आहेत तोंपर्यंत हेकेलनें वर्णन केलेल्या परमाणूना तत्वतः जडाच्या कोटींत घालणें म्हणजे जड नि चेतन पदार्थांच्या कल्पनाचा घोटाळा करणें होय असेंच म्हटलें पाहिजे.

अिंग्लंडमधील सांप्रतच्या काळांतील प्रख्यात मानसशास्त्रज्ञ 'विल्यम जेम्स' यांनीं 'Will to live and other essays on popular philosophy' म्हणून अेक पुस्तक लिहिलें आहे. त्या पुस्तकातील $\frac{2}{3}$ वा कदाचित् $\frac{3}{4}$ हि असेल अितका भाग जडवादी नात्यानें लिहिलेला आहे. * जर्मन तत्वज्ञ हेगेल हे अद्वैतमती असून "हें जगत् केवळ कल्पनांचा खेळ आहे. जगाला वास्तवता मुळींच नाही. जगांत चैतन्यमयता हीच अेक गोष्ट

* या तत्वज्ञाचा पुढें भारतीय तत्वज्ञानाशीं परिचय झालेला होता.

सत्य आहे." याप्रमाणें प्रतिपादन करणारे होते. हे तत्वज्ञ अत्यंत प्रख्यात असून याचे अद्वैत प्रतिपादक ग्रंथांना युरोपीय तत्वज्ञान्यांत फार मान दिला जातो. अशा सुविख्यात तत्वज्ञ हेगेलच्या अद्वैतमताची थट्टा करून अत्यंत प्रभावी भाषेंत या विल्यम जेम्सनी अितकी रेवडी अुडवली आहे की, आस्तिक मनुष्याचें मनसुद्धां क्षणभर हेलकावे खाअू लागतें. जडवादी मताचा पुरस्कार करणारे अेक प्रमखतम तत्वज्ञ म्हणून ते समजले जात असत. पण पुढें अेकेवेळी त्याचे हाती 'The Gist of Philosophy' नामक अेक हस्तपत्रिका (pamphlet) आली. ती वाचताच त्या पुस्तिकेत वर्णन केलेला अनुभव काय आहे हे बघण्याची त्यांना अिच्छा झाली. ते जरी जडवादी–कट्टे जडवादी–होते तरी त्यांची ज्ञानपिपासा करपून गेली नव्हती. मानलेले सत्य हेच अतिम सत्य नि त्या व्यतिरिक्त अितरांना निराळे सत्य अनुभवाला आले असले तरी त्याकडे अपराधी दुर्लक्ष करून स्वमताभिनिवेशाने माझेच म्हणणे खरे असें मानणारे ते हट्टी गृहस्थ नव्हते. सत्य जाणण्याची प्रामाणिक अिच्छा अंतःकरणात निवसत असल्यामुळे त्यानी त्या हस्तपत्रिकेंत दिलेल्या वर्णनाचा अनुभव स्वतः घेअून त्याची सत्यासत्यता अजमावण्याचा निश्चय केला होता. त्या पत्रिकेंत अनुभवोपाय म्हणून दिलेला नायट्रिक ऑक्साअिड गॅस (लाफिग गॅस) चा प्रयोग त्यानी आपल्यावर करून घेतला. आणि तद्वारा आलेल्या स्वानुभवाचे २-३ पृष्ठे वर्णन देअून त्यात "आतापर्यंत पूर्ण विवेकाने बौद्धिक निर्णयद्वारा सत्य म्हणून हृदयाशी बाळगलेली जडवादी मतें या अनुभवानंतर सर्वतोपरी पूर्ण खोटी नि हास्यास्पद होती असे मान्य करणें भाग आहे." अशा अर्थाचे त्यानी अुद्गार काढले आहेत. त्यानंतर श्रीमत्स्वामी विवेकानद अिग्लंडमध्यें गेल्यावर त्यांच्या सहवासाने त्यांची संशयनिवृत्ति होअून पुढें त्यानी योगाभ्यास चालू केला होता. यानतर आयुष्याच्या अुत्तरकाली लिहिलेल्या ग्रथांपैकी "Varieties of Religious Experiences" (धार्मिक अनुभवांची विविधता) नामक लिहिलेला ग्रंथ सुप्रसिद्ध आहे. त्यांना केवळ बुद्धिनिष्ठ तर्कपद्धतीने जडमय नि चैतन्यरहित दिसणारे विश्व चैतन्यमय असल्याचें कळून आलें. अशीं अनेक

अुदाहरणें देतां येतील. युरोपमध्यें अनेक प्रख्यात जडवाद्यांनी बुद्धिनिष्ठ तर्कपद्धतीनें पुरस्कारलेल्या जडवादाला सतत विचारसातत्त्याचे ओघानें पुढें विचारपूर्वक सर्वस्वी सोडून दिलेलें आहे. आणि अद्वैती चैतन्यवाद वा द्वैती चित्–जडवाद स्वीकारला आहे. शेवटपर्यंत जडवादाचाच पुरस्कार करीत राहिलेले हेकेलसारखे लोक फार थोडे आहेत. आणि त्याचे प्रतिपादनात सुद्धां पुष्कळ स्थली चैतन्यशक्ति ही रासायनिक क्रियोत्पन्न नसून स्वतंत्र नि मूलतः अस्तित्वांत असणारी आहे असें मान्य केलें आहे. त्याविषयीचा हेकेलचा अुतारा वर दिलेलाच आहे.

येथें आणखी अेका पक्षाचा परामर्ष घेतला पाहिजे. या पक्षाला जडवादी म्हणतां येत नाही, चैतन्यवादीहि म्हणतां येत नाही. यांना आस्तिक म्हणणे शक्य नाही. नास्तिकहि म्हणणे सोपे नाही. या पुरुषाचे मनांत सुसंगतता नाही. अीश्वर मानणारे नि अीश्वर न मानणारे असे सेश्वर नि निरीश्वर सांख्य असे सांख्यांत भेद आहेत. नैय्यायिकांतहि तसे दोन भेद आहेत. परंतु त्या निरीश्वर नैय्यायिक सांख्यांना नास्तिक म्हणत नाहीत. तथापि वर जो अेक आणखी अेका पक्षाचा अुल्लेख केला आहे तो पक्ष विलक्षण मताचा आहे. त्याचे जिवात्म्याविषयी जडवाद्याप्रमाणें मत आहे. केवळ रासायनिक क्रियेनेंच जीवशक्ति निर्माण होते नि ती रासायनिक स्थिति बिघडली म्हणजे ती नष्ट होते. जीव म्हणून स्वतंत्र अशी शक्ति नि वस्तु मुळीच नाही. अीश्वर मात्र आहे. हे त्याचे मत आहे. जन्माबरोबर प्रारंभ होणारा नि मरणांत शेवट होणारा जीव कांही काळ अस्तित्वांत राहून विझणारा असल्यामुळे त्याला या त्यांच्या अीश्वराचें शुभाशुभ का नि काय म्हणून असावे? अीश्वर असला तरी रासायनिक संमिश्रणाने अुत्पन्न होणाऱ्या, आनुवंशिक गुण नि भोवतालची परिस्थिति यांच्या लाटांनी अितस्ततः त्या नेतील तसा नि नेतील तिकडे वहावत जाणाऱ्या नि शेवटी मरणाच्या क्षणी शून्य होणाऱ्या अशा त्या जीवाला त्या अीश्वराचा काय लाभ होणार? अथवा तो नसला तरी त्या अीश्वराचें नसणेंपण जीवाची कोणती हानि घडवून आणूं शकणार? जीवाचें क्षणभंगुरत्व जर सत्य असेल तर मग अीश्वराचें अस्तित्व त्याचे दृष्टीनें अजागलस्तनवंतच ठरणार! तो जीव नाशवंत ठरविल्यावर मग

अीश्वराची लुडबुड हवी तरी कशाला नि कशासाठीं? शुद्ध जडवाद मानणें त्यापेक्षां अधिक प्रामाणिक नाहीं कां? तेव्हां बाह्यात्कारी अीश्वरास्तित्वाचें पांघरूण घेणाऱ्या या आत्मशक्ति वा जीवशक्ति न मानणाऱ्या पक्षाला यथार्थदृष्टीनें नास्तिकच मानलें पाहिजे. ही नास्तिकता विश्वाच्या यथार्थतेचें यथार्थ दर्शन देणारी असती तर मग कांहीच चिंता नव्हती. पण विश्वाचे खरे विचारक विज्ञानशास्त्री तसें दाखविण्याचा प्रयत्न करीत असतां त्यांनाहि निरुपायानें जडवादाची सुसंगति न ठेवतां येअून पूर्णपणे वा अर्धवटपणें पण जीवशक्ति—चैतन्यशक्ति मानणे कसे भाग पडते हें पूर्वीं आपण सक्षिप्तपणे पाहिलें आहे. तेव्हा विज्ञानशास्त्रदृष्टीनेंच या बेरंगी पक्षाला काही मोलच देतां येत नाही. तरीहि काही जणाची दिशाभूल करणाऱ्या अशा त्याच्या अेका 'मोठ्या आक्षेपा'चें निराकरण करणें हें अगत्याचें वाटतें. तेवढें करून पुढें जाअू.

"पुनर्जन्मसिध्दांत पत्करल्यास पूर्वकर्मानुरूप प्रारब्ध भोगावयाचें अशी वृत्ति बनून मनुष्य दैववादी नि म्हणून निष्क्रिय बनतो." हा मुख्य आक्षेप घेअून त्याचे म्हणणें असें की, याच दुष्परिणामाच्यामुळें त्यापासून अुत्पन्न होणाऱ्या आणखीहि दुष्परिणामांची मालिका चालू होते. अेतदर्थ हा अकल्याणकारी "पुनर्जन्मसिध्दात" मानणेंच सोडून द्यावें. विश्वांतील अेखादे निसर्गसत्य वा स्वाभाविक सत्य हानिकारक होतें म्हणून तें सत्य न मानतां खोटें मानावें नि दुष्परिणामांपासून मुक्त व्हावें हें म्हणणेंच मुळीं असमंजसपणाचें आहे. शिकारी कुत्रा मागें लागल्यामुळें जीवभयानें पळणारा ससा अगदीं थकून गेला म्हणजे मागें लागलेला शिकारी कुत्रा दिसणार नाही अशा प्रकारे आपलें तोंड खुपसून कुत्रा दिसेनासा झाला म्हणजे आपणाला सुरक्षित झालेंसें मानतो. त्याची कल्पना कीं मला कुत्रा दिसत नाहीं तेव्हां मीहि कुत्र्याला दिसणार नाहीं आणि आपण वाचू. पण कुत्रा नेमका येतो नि पळणारें भक्ष्य आपण होअून हातीं लागल्याचें आनंदांत तें पकडून निघून जातो. तशीच वरील आक्षेपकांची कृति आहे. निसर्गसत्य हानिकारी आहे नि म्हणून तें खोटें आहे असें मानून ती हानि टाळू म्हणणें हें व्यर्थ आहे. वास्तविक मार्ग म्हणजे निसर्गसत्य ओळखून आपल्या बुध्दीचा

अुपयोग करीत त्यापासून आपला लाभ करून घेण्याकडे विनियोग करणें हेच बुध्दिमत्तेचें लक्षण ठरेल. अग्नि दाहक आहे. पण तसा तो नाहीं असे समजण्यानें त्याचे दाहकपणापासून होणारी हानि टळणारी नसून त्याच्या दाहकपणाचा अुपयोग करून घेणे हेच लाभदायक ठरतें. असाच सर्वत्र नि सर्व गोष्टीत अनुभव आहे. तेव्हा पुनर्जन्मसिध्दात जर सत्य असेल तर तो सिध्दात ओळखून तो लाभदायी करून घेण्यातच खरे कौशल्य नि बुध्दिमत्ता आहे. तो खोटा मानण्यात अर्थ नाही.

दुसरें असें कीं प्रारब्ध-कर्माधीनता आहे असें ठरून अिच्छास्वातंत्र्य हिरावलें जातें ही आपत्ति टळावी म्हणून पुनर्जन्मसिद्धाताला नाकारीत हे लोक जडवादांत डोकें खुपसण्याची अिच्छा करतात. त्याची प्रारब्धाधीनता जडवादामध्ये तर अधिक घट्टपणे त्याचे नरडे धरून बसते हे त्याचे लक्षांत येत नाही. तेथे त्याचे अिच्छास्वातंत्र्य निश्चितपणें हिरावले जाते. "रिडल ऑफ दी युनिव्हर्स" नामक पुस्तकात शास्त्रीय पद्धतीने जडवाद सिद्ध आहे असे गृहीत धरून हेकेल जे त्यावरून निगमन काढतो तें असें की, "The human will has no freedom–we now know that each act of the will is as fatally determined by the organization of the individual and as dependent on the momentary condition of his environments as every other psychic activity. The character of the inclination was long ago determined by the heredity from parents and ancestors; the determination to each particular act is an instance of adaptation of the circumstance of the moment wherein the strongest motive prevails according to the laws which govern the statics of the emotion." "मनुष्याला अिच्छास्वातंत्र्य मुळीच नाहीं......मनोविज्ञानानुसार मनाच्या क्रिया निसर्गनियमानुसार निसर्गनिर्घृणतेनें निश्चितपणें ठरून गेलेल्या दिसतात. माता, पिता नि पूर्वज यांच्या आनुवंशिकतेनें मनोवृत्तींचे प्रकार

फार पूर्वींच निश्चित झालेले असतात. प्रत्येक विशिष्ट कृति करण्याचा निश्चय हा भोवतालच्या त्या क्षणींच्या परिस्थितीशी जुळतें घेत मनांतील अनेकांपैकी बलिष्ठतम हेतु जो असेल त्या हेतूच्या अनुरोधें भावना-नियमनाच्या निसर्गनियमाप्रमाणे झालेला असतो." हें जर सत्य असेल तर मग कर्त्याच्या कर्तेपणाला जागाच नाही. पाण्याची वाफ होणें, वाफेचे पाणी होणे, आगीनें अंग पोळणें, दगडाच्या आघातानें घाव होणें, गोड फळाने सुख होणे, थंड पाण्याने तहान भागणे, अित्यादि सुखदु:खदायी परिणामासाठी ज्याप्रमाणें त्या त्या पदार्थाकडे बरेवाअीटपणा नाही, त्याप्रमाणेंच मनुष्याच्या बऱ्यावाअीट दिसणाऱ्या कोणत्याहि कृतीत बरेवाअीट मानावयाला जागाच नाही त्या सर्व जडाच्या नियमानुसार होणाऱ्या अपरिहार्य जड क्रिया आहेत. त्यात योग्यायोग्य, न्याय्यान्याय्य, बरे वाअीट, अित्यादि ठरविणे हें अयुक्त नि मूर्खपणाचे ठरेल. पण प्रत्यक्ष अनुभव वा मानवी समज नि कृति ते तसें आहे असे अनुभवास आणीत नाही. मनुष्याने पुनर्जन्मवाद मानून वा जडवाद स्वीकारून कितीहि खऱ्या खोटया विश्वासाने नि कितीहि निश्चितीनें नियतिवाद वा दैववाद मानला तरी मनुष्याची कृति या शाब्दिक विश्वासाचा खोटेपणा प्रात्यक्षिकतेनें खोटा ठरवीत आहे.

शास्त्रीय सत्य जर जडवाद सागेल तर स्वयंप्रेरणेला वा अिच्छास्वातंत्र्याला जागाच नाही. जड हें अहेतुक, निसर्गनियमानें जखडलेले, अपरिहार्यतेनें लोटले जाणारें, सर्वस्वी स्वातंत्र्यविहीन असेच असावयास पाहिजे. तसें असणें हेंच निसर्गाला धरून आहे. ज्ञानवत्ता आणि क्रियाशक्तियुक्त चैतन्यमयताच स्वातंत्र्याचे अधिष्ठान होअू शकते जड म्हणजेच परतंत्र. स्वातंत्र्य चैतन्य शक्तीलाच./ अेखाद्या कंदिलावर, आत दिवा असूनहि काचेवर काजळाची दाट पुटें बसण्याने ज्याप्रमाणे त्या काचेतून प्रकाश येअू शकत नाहीं, तथापि काचस्पर्शानें कळणारी अुष्णता आंतील दीपशिखेचें अस्तित्व दाखवित असतें त्याचप्रमाणें अत्यंत जडवत् दिसणाऱ्या पदार्थांतहि अत्यंत सूक्ष्म निरीक्षकाला दिसून येणारी क्रियाशक्ति, ही त्या जडाचे तमोमयतेचे मागें गुप्तपणें निवसत असलेलें चैतन्यदीपाचें अस्तित्वच अेक प्रकारें दर्शवीत असते. कोणतीहि क्रिया व्हावयाला हेतूची प्रेरणा मागें असावयाला पाहिजे. त्यावांचून क्रियेची

हालचालच होणें शक्य नाहीं. कोणतीहि हालचाल वा क्रिया म्हणजे भोवतालच्या परिस्थितीशीं वा असल्या वस्तुस्थितीशीं टकरत ती अिच्छेप्रमाणें बदलून घेण्याचा प्रयत्न होय. असा सहेतुक प्रयत्न हा जडाकडून होणें निसर्ग-विरुद्ध आहे. आणि जेथें जेथें हा प्रयत्न झालेला, होत असलेला, वा होणार असलेला, दिसून येअील तेथें तेथें तो कितीहि लुप्त स्थितीत असो पण हा चैतन्यदीपच त्या जडस्वरूपामागें आहे असें जाणलेच पाहिजे. आणि हीच गोष्ट हेकेलनें अपरिहार्यतेनें sensation and will संविद् नि संकल्पशक्ति-रूपानें मानली आहे. अत्यंत कट्टर जडवादी तत्वज्ञाना सुद्धा जडाच्या यथार्थ व्याख्येनुसार जडवत्तेच्या अेकमेव अस्तित्वामुळेंच जगताची घडा-मोड होत आहे असें सिद्ध करणे अशक्य आहे. अुलट जडाव्यतिरिक्त अजड वा दुसऱ्या शद्बात चैतन्यशक्तीच्याच गुणांचे अस्तित्व ओळखल्यावाचून जगांतील अेकाहि घडामोडीचें वा हालचालीचे स्पष्टीकरण विज्ञानशास्त्र-सिद्धांत्यालाहि करतां येणें शक्य न राहून चैतन्यगुणाचें अस्तित्व मान्य करणें त्यांना भाग पडले आहे.

ज्ञानवत्ता वा क्रियाशक्ति यांनीं युक्त असलेली चैतन्यसत्ता ही आपल्या अस्तित्वासाठी जडांवर अवलबून नाहीं. जडामधील विविध द्रव्याच्या रासायनिक प्रक्रियेमुळें चैतन्य गुण निर्माण होतो ही गोष्ट भ्रामक नि म्हणून खोटी कल्पना आहे. हे प्रत्यक्ष जडवादी शिरोमणि याचे स्वतःचेच साक्षीनें आपल्याला दिसून आले. यावरून दोन निगमनें आपणाला काढता येण्यासारखी आहेत. आणि ती हीं कीं, ज्ञानवत्ता नि क्रियाशक्ति असल्या-मुळें चैतन्यसत्ता ही स्व–तंत्र असली पाहिजे. आणि जड हे क्रियाशक्तिहीन नि ज्ञानसामर्थ्यशून्य अशाच वस्तूला म्हणता येणारें असल्यामुळे असे जें कांहीं जड द्रव्य असेल तें वा असें तें जडत्व पर–तंत्र असले पाहिजे. पर-तंत्र हें स्व–तंत्राचे स्वाधीन असणार हें न सांगतांहि समजण्यासारखें आहे. आणि हें जितकें खरें तितकेंच स्वतंत्र परतंत्राच्या स्वाधीन होअूं शकणार नाहीं, हेंहि अुघड दिसून येणारें सत्य आहे.

आपल्या दृष्टीपुढें जगांतील दिसून येणारी जीवसृष्टि ही वरील सिध्दांत लक्षांत घेतां भौतिक जगातील क्रिया संपन्न करण्याकरितां जड

देहाचा आश्रय करून प्रकट झालेली चिदंशाची सृष्टि आहे असेंच मानलें पाहिजे. जडदेह हें साधन, चैतन्यांश वा जीवशक्ति ही साधक, जगत् हें क्रियाक्षेत्र. जीवशक्तिरूपी साधक जडदेहाच्या साधनानें या जगाच्या क्रियाक्षेत्रांत आपले अिच्छेनुसार आपल्या सामर्थ्याप्रमाणें क्रियाशील झालेला आहे असेंच दिसून येतें. जडदेह कार्यक्षम राहिला नाही म्हणजे जीव या भौतिक जगांत प्रकट होण्यास साधनीभूत झालेला जडदेह उपयोगणें शक्य नसल्याने पुन्हा अव्यक्त होतो अितकेंच. तो नष्ट होतो असें नाही. अेखाद्या लेखकाला बाळबोध वा मोडी लिहावयाचें असले तर अेक प्रकारची लेखणी, अिंग्लीश लिहावयाची वेळ आल्यास दुसऱ्या प्रकारची लेखणी लागते. बारीक लिहावयाचें असेल तर बारीक टोकाची नि मोठे जाड लेखनाचे वेळी जाडी लेखणी हवी असते. आणि त्या त्या प्रकारचे लेखनाचे वेळी त्या त्या प्रकारचें साधन बनणारी लेखणी नसली तर त्या त्या प्रकारचें लेखन लिहिता येत नाही—वा फार कठिण जातें. अशा वेळीं लेखणीच्या अभावाने लेखकाची ती ती शक्ति नष्ट झाली असें कोणी जर म्हणेल तर तें मूर्खाचे बरळणे ठरेल. लेखणीचे साधन नसल्यामुळें त्या त्या प्रकारची लेखनक्रिया करता येत नाही—लेखनशक्ति व्यक्त होत नाही अितकेंच. लेखनशक्ति नष्ट होते असे नाही त्याचप्रमाणें साधनरूप देह कार्यक्षम आहे तोपर्यंत जीवशक्ति क्रियारूपानें प्रकट झालेली असते. आणि तो देह निरुपयोगी ठरताच वा होतांच ती शक्ति व्यक्त होअीनाशी होते. दुसरे अनुरूप साधन मिळेपावेतों वा मिळेपर्यंत व्यक्तता घेअु शकत नाहीं अितकेंच. जीवशक्तिच नष्ट झाली असे समजणें हे असमंजसपणाचे ठरेल.

हक्सले नि टिंडाल हे युरोपीयांमधील प्रसिद्ध विज्ञानशास्त्रवेत्ते नि विचारक होअून गेले. डार्विन, हक्स्ले नि टिंडाल ही त्रयी अत्यंत विख्यात विज्ञानशास्त्री म्हणून प्रमुख गणली जाते. त्यांपैकीं हक्सले आपल्या "Evolution and Ethics" ("अुत्क्रांतिवाद नि नीतिशास्त्र") या पुस्तकांत म्हणतात. "None but hasty thinkers will reject it (Reincarnation) on ground of inherent absurdity. Like the doctrine of evolution it-self

that of transmigration has its roots in the world of reality." "अुतावळे विचारकच काय ते पुनर्जन्मसिद्धात नैसर्गिक अयुक्तता म्हणून त्याज्य ठरवितील. उत्क्रांतितत्वाप्रमाणेच पुनर्जन्मसिद्धांत याचीहि मुळें जागतिक सत्यतेतच रोवलेली आहेत." त्याचप्रमाण "Methods and Results" "पद्धति नि निर्णय" या पुस्तकात ते म्हणतात, "I am utterly incapable of conceiving the existence of matter if there is no mind in which to picture its existence" "द्रव्याच्या अस्तित्वाचे चित्र कल्पिणाऱ्या वा जाणणाऱ्या ज्ञानवान् मनावाचून द्रव्याचे अस्तित्व मानणे हे मला सर्वस्वी अशक्य वाटते". दुसरे प्रख्यात विज्ञानशास्त्रवादी टिंडाल अेके ठिकाणी म्हणतात, "The first marshalling of atoms on which all subsequent action depends baffles a keener power than that of the microscope. Through pure excess of complexity and long before observation can have any voice in the matter of the most highly trained intellect, the most refined and most disciplined imagination retires in bewilderment from the contemplation of the problem." "सृष्टचारंभी जिच्यावर पुढील क्रियाशक्ति अवलंबून आहे अशी परमाणूना मिळणाऱ्या पहिल्या गतीचा धक्का देणारी गतिदात्री ज्ञानशक्तिसंपन्न सत्ता ही सूक्ष्मदर्शी यंत्राहूनहि अतिसूक्ष्म अशा बुद्धीशक्तीला कुंठित करून सोडते. मानवी सूक्ष्म निरीक्षणशक्तीच्या कक्षेत येण्यापूर्वीच संकीर्णतेच्या परिसीमेचे अतिशयतेने त्या महाशक्तीचा विचार करतां अत्यत प्रभावशाली बुद्धिमत्ता नि सूक्ष्मग्राही ज्ञानशोधनक्षम कल्पनाशक्ति त्या रहस्याकडे बघण्याचा प्रयत्न करण्यांत सर्वस्वीं गोंधळून जाऊन मागे परततात.

---

# ६ शास्त्रीय सत्यकथन

पाश्चिमात्य विज्ञानशास्त्रांचा कल पूर्वी अुल्लेखलेल्या कारणानें स्वाभाविकपणेंच जडवादाकडे झुकलेला होता. परतु श्री. विवेकानंदस्वामीच्या पश्चिमेंतील वेदातांतील अध्यात्मशास्त्राच्या प्रभावशाली प्रचारामुळें आणि श्री जगदीशचंद्र बोस यांनी भारतीय तत्वज्ञानांत सांगितल्याप्रमाणें चैतन्य-मयता सर्वत्र व्याप्त आहे हे सत्य भौतिकशास्त्रदृष्टया प्रत्यक्ष प्रयोगसिध्द-रीत्या दाखविल्या कारणाने पाश्चिमात्य विज्ञानशास्त्रवेत्यांना अेकप्रकारें नवी दृष्टि लाभल्यासारखे होअून त्याच्या परिशोधनशक्तीचा एकागीपणा बराच निघून गेला. आणि पूर्वग्रहदूषित बुध्दीचा नास्तिकतेकडे झुकणारा कल नाहीसा होअून यथार्थ परिशोधक दृष्टि त्याना प्राप्त झाली. त्यामुळे त्या कालाननर त्यानी विज्ञानशास्त्रदृष्टया जी निगमने काढली त्या विविध शास्त्रशाखेतील ती ती निगमने आपल्या प्रस्तुत विषयाला मार्गदर्शक असल्यामुळे त्याचीहि साक्ष महत्वाची म्हणून आता त्यांचे स्वरूप पुढे बघूं

(१) अमेरीकेतील शेतकी विभागातील वनस्पतिशास्त्रज्ञ श्री. अे. अेम्. फ्रीमन म्हणतात, "वनस्पति मनुष्याप्रमाणेंच काम करतात, आनंदानें नाचतात, नि विश्रातीकरिता झोप घेतात. जिवत प्राणी नि वनस्पति यांच्यात काम करणें, झोप घेणें, रुचि घेणें, तृष्णाशमनासाठी पाणी मिळ-विण्याचा-शोधण्याचा प्रयत्न करणे, आनदाने नाचणे, आणि मादक पदार्थानें निशाग्रस्त होणे आदिक गोष्टी सर्वसामान्य आहेत. सूक्ष्म छायाचित्र यंत्रांनीं शोध करून पाहता वनस्पति फार अुत्तम नृत्यकाराप्रमाणे सुंदर नृत्य करतात. पाणी शोधण्याचें कार्य तर आश्चर्यकारक रीतीने करतात. जवळपास असलेल्या पाण्याच्या नळाकडे आपली मुळें पाठवून त्या नळाच्या सांध्यास पोहोचतात आणि त्या मुळाकरवी साध्यामधून छेदून नळाचें पाणी खेचून घेतात." यावरून झाडांमध्येंहि जीवशक्तिच काम करीत असते. केवळ मनुष्यादि प्राण्याप्रमाणें अिंद्रियलाभ झालेला नसल्यामुळें त्यांचें सजीवत्व आपल्या सामान्य दृष्टीला स्पष्टपणें दिसून येत नाहीं.

(२) चार्लस बोटविन नांवाचे फ्रेंच शास्त्रज्ञ झाले, त्यांनीं लिहिलेल्या "अिनर डिसिप्लिन" नामक पुस्तकांत ते लिहितात, "ज्ञानशक्तिरूप सूर्याचे किरण अेकवट करण्याचें नि त्या अेकत्र केलेल्या किरणांचा झोत अिच्छित विषयावर पाडण्याचें शास्त्र जसे हिंदु लोकांना माहित आहे तसें जगांतील अितर कोणत्याहि जातीला माहित नाही". आणि मानसिक शक्ति वाढविण्याच्या जगांतील सर्व पद्धतीचें विवेचन करून ते म्हणतात, "The Hindus are past masters in the art of inner discipline" "अेकाग्रशक्तिसंवर्धनाच्या कलेंत हिंदु पूर्णपणें प्रवीण आहेत". हे सिद्ध करण्यासाठीं त्यांनीं श्री पतंजली भगवानाच्या योगशास्त्रातील अनेक सूत्राची विज्ञानशास्त्रदृष्टचा छाननी करून महती वर्णिलेली आहे. आणि हिंदु योग्या-विषयीं "योग्याची निरीक्षणशक्ति अति सूक्ष्म असते, विवेचनाशक्ति अगदीं अचूक असून अत्यंत शुद्ध असने". असे प्रशंसात्मक अुद्गार काढले आहेत. अशा या विशिष्ट पद्धतीचा अवलब करण्याची शक्ति निसर्गतःच मिळालेले भारतीय विज्ञानशास्त्री जगदीशचंद्र बोस आपले अेका भाषणात सांगतात, "अभ्यासात गढून गेलेले नि व्यवहाराविषयी अुदासीन असलेले हिंदु लोक विज्ञानशास्त्रांत मुळीच प्रगति करूं शकणार नाहीत असा जो सामान्य ग्रह आहे तो खोटा आहे. शास्त्रीय शोध लावण्यास जी मानस-शक्ति लागते ती हिंदू लोकांत असून तिचा विकास कसा करावा हे केवळ हिंदु लोकांनाच माहित आहे. ती विद्या त्यानी पूर्णावस्थेस नेलेली आहे. मोठमोठे शोध लावण्याची कल्पनाशक्ति, अतर्दृष्टि, प्रयोगकुशलता आणि मोठी चिकाटी हे अत्यवश्य लागणारे गुण हिंदु लोकांत निश्चयाने आहेत. विशेषतः विषयाशी तादात्म्य पावून त्या विषयीचें ज्ञान स्वयवेद्य करून घेण्याची विद्या योगशास्त्राबाहेर कोठेंहि दिसत नाही. वृक्षाचें ज्ञान पाहिजे असेल तर पाश्चिमात्य लोकाची पद्धति, वृक्षाचीं पानें, फळें, फुलें, साली, मुळें, निरनिराळ्या ऋतूत होणारे फेरबदल यांचें निरीक्षण अित्यादि द्वारा बहिर्मुख स्वरूपानें होअू शकेल. परंतु हिंदु पद्धतींत वृक्षाचें ज्ञान करून घ्यावयाचें असेल तर शास्त्रज्ञ चित्ताचें अैकाग्य्र साधून चित्तामध्यें वृक्षरूप बनतो नि मग वृक्षच आपलें हृद्गत त्याला अुलगडून सांगूं लागतो. अशी ही पद्धति अंतर्मुख

स्वरूपाची आहे." जगदीशचंद्र बोस या दोन्ही स्वरूपाच्या पद्धतींचा अवलंब करीत केलेल्या परिशोधनानंतर सांगतात, "**चराचरांमध्यें सर्वत्र जीवन–चैतन्य भरून राहिलेलें आहे. चराचरांत जी उत्क्रांति दिसून येत आहे तिचें कारण त्यांचे मागें प्रत्येक अणु–परमाणूंच्या नसानसांत असलेली संकल्पशक्ति ही होय. प्रत्येक अणु–परमाणु उत्क्रांति करून घेण्याचा प्रयत्न करीत असतो आणि प्रतिकूल परिस्थितीशीं झगडून त्यावर जय मिळवित असतो. ही संकल्पशक्ति झाडांत, प्राण्यांत, खनिज वस्तूंत–सर्व प्राणिमात्रांत–सर्व पदार्थमात्रांत–भरून राहिलेली आहे. या संकल्पशक्तीचा प्रभाव प्रचंड असतो. ही संकल्पशक्ति** (will power) **चैतन्याची असते-जडाची नव्हे.**"

(३) सापेक्षता–नियम (law of relativity) शोधून काढून विज्ञानशास्त्रांत क्रांति घडवून आणणारे प्रख्यात भौतिक विज्ञानशास्त्रवेत्ते अीनस्टीन म्हणतात, "भौतिक शास्त्रांनी परिशोधनाला आरंभ केला. धर्मांनी दिलेली अुत्तरे झिडकारली आणि परिशोधनमार्ग चालून चालून शेवटी त्याच प्रश्नाची पुढे अुभी राहिलेली गुंतागुंतीचीं स्वरूपें अुलगडण्यास द्यावी लागणारी अुत्तरे धर्माच्याच भाषेत आता त्याना पुन्हा द्यावी लागत आहेत. त्या सर्व अुत्तराचा मतितार्थ म्हणजे "**या दृश्य विश्वाचे मागें सर्व नियंत्रण करणारी अेक चालक–प्रेरक अशी ज्ञानसंपन्न महाशक्ति आहेच आहे**" हा होय ज्या सवादांत त्यांनी हा निष्कर्ष दाखविला आहे, तो सर्वच महत्वाचा, जडवादाचे वैय्यर्थ दाखवणारा, सर्व विश्व चिन्मय असल्याचे सिध्द करणारा आणि आता आतापर्यंत विज्ञानशास्त्राचे जडसिद्धांत सर्व चुकीचे असलेले पटविणारा असा आहे. पण तो विस्तार–भयास्तव गाळणे भाग पडत आहे.

(४) टोरोटो विश्वविद्यालयांत 'खगोल-पदार्थविज्ञानशास्त्री' डॉ. सी. अे. च्यांट यांनी अुद्घोषिलें, 'शेंकडा ९० खगोलशास्त्रज्ञांनीं निर्णित केलें आहे की, **आंधळ्या नि जड अशा निसर्गनियमानें हें विश्व निर्मिलेलें नाहीं. परंतु तें विश्वव्यापी अशा सर्वज्ञ महाशक्तीकडून नियंत्रित**

**झालेलें आहे. मग त्या महाशक्तीला तुम्ही कोणत्याहि नांवानें ओळखा. तें सर्व व्यक्तींच्या अिच्छेवर आहे.**

(५) प्रो. तुलसीदास कार अेम्. अे. अध्यात्मशास्त्राविषयीं लिहिताना प्रतिपादतात "जीवनशक्तीची व्याख्या 'भोंवतालच्या परिस्थितीला आपल्या आवश्यकतांशीं जुळतें करून घेण्याचा प्रयत्न करण्याची शक्ति असणारी ती जीवनशक्ति' अशी हर्बर्ट स्पेन्सरनी केलेली आहे. प्राणिशास्त्र जीवनशक्तीची व्याख्या न करतां तिची लक्षणें देते". ती लक्षणें चार आहेत. (१) बाहेरून येणाऱ्या अनुकूल प्रतिकूल अुद्दीपनानुसार प्रतियोगी क्रिया करणें (२) बाह्य जगांतून हवें ते आत्मसात् करून प्रवर्धित होणे (३) त्याज्य भाग बाहेर फेकणें, आणि (४) स्वजातीय प्रजावृद्धि, सेंद्रिय आणि निरींद्रिय पदार्थांचें निग्रहण, परिपालन आणि संनिधान (परस्पर जुळणी) करणारी ही जीवनशक्ति आहे. प्रत्येक परमाणूंतील धन विद्युदणु आणि ऋण विद्युदणु (protons) यांचें निग्रहण नि नियमन व्यवस्थितपणें होत असतें. आणि धन अणु नि ऋण अणु यांचें नियमनादिक करणारी शक्ति परमाणूंमधील जीवनशक्ति होय. अशा जीवशक्तियुक्त परमाणूच्या संयोगानें अणूचे जीवन सिद्ध होतें. अशीच प्रक्रिया पुढे चालत राहून अशा अणूच्या अेकत्रीकरणाने अंगप्रत्यंगें बनत अेक सेंद्रिय वा निरींद्रिय शरीर बनत असते. नि तेथेहि त्या शरीराची जीवनशक्ति आपापली कामे पहिल्याप्रमाणेंच करीत असते. याप्रमाणें अगदीं साध्या नि सूक्ष्म अणूपासून तो गुंतागुंतीच्या उत्क्रांत झालेल्या मानवी देहापर्यंत ही जीवनशक्ति अधिकाधिक साधनें मिळवीत आपलें प्रकटनकार्य चालू ठेवते. बर्गसनच्या म्हणण्याप्रमाणें "जीवनशक्ति स्वतःचे ध्येयप्राप्तीसाठी सामान्याहून सामान्य परमाणूच्या आकारापासून असामान्याहून असामान्य अशा मानवी आकारापर्यंत अनेकशः आकार धारण करीत नि आपलें सामर्थ्य अधिकाधिक प्रकट करण्याचें कार्य करीत आपल्या ध्येयस्थानाकडे धावत चाललेली आहे. याप्रमाणें आकारधारणक्रिया जीवनशक्ति करीत असते. या आकारामध्यें नि आकारापासून ती अुत्पन्न होते असें म्हणणें खोटें नि म्हणून चुकीचें आहे." पूर्वीच्या नि सांप्रतच्या विज्ञानशास्त्रांत हेंच अंतर आहे. पूर्वीचे विज्ञानशास्त्री द्रव्यांत (matter)

जीवशक्ति अुत्पन्न करण्याचें सामर्थ्य आहे असें म्हणत होते. परंतु तें म्हणणें विज्ञानशास्त्राच्या वाढीने चुकीचें ठरत जाअून आतां वरीलप्रमाणें विज्ञान-शास्त्राचें परिणत मत बनलेलें आहे. आतां तर विज्ञानशास्त्राचें पूर्वीचें म्हणणें चुकीचें ठरून विचारक विज्ञानशास्त्री म्हणू लागले आहेत की, द्रव्य या पदार्थाला स्वतंत्र अस्तित्वच नाही. चिच्छक्तीचे विचारांतील तें अेक प्रतिबिंब आहे. सांप्रतचा प्रख्यात विद्यमान प्राणिशास्त्री प्रो. अी. डब्ल्यू. मॅकबॉइड अेम्. अे. डी. सायन्स, अेफ्. आर्. अेस्. अिम्पीरिअल कॉलेज ऑफ सायन्स अॅन्ड टेक्नालॉजी हे आपल्या 'अुत्क्रांति' या पुस्तकांत म्हणतात "विचारकाचें मन हे सर्व ज्ञानाची मूलभित्ति आहे, आणि द्रव्य म्हणून निराळें कांही नसून त्या मनातील विचारांचें अेक स्वरूप या द्रव्यरूपानें भासते." शेवटी प्रो. कार अनेक आधार देअून प्रगत विज्ञानशास्त्रवाद्यांच्या परिणत सिद्धांतांचा निष्कर्ष पुढीलप्रमाणें देतात. "**चित्‌शक्ति हीच मूळ सत्यरूपानें सनातनपणें अस्तित्वांत आहे. खरा पुरुष म्हणजे हीच चित्‌शक्ति होय. आणि ती अिच्छेनुसार आकार नि देह धारण करीत राहते. या भौतिक जगतांतील देह वा आकारधारण हा त्या शक्तीच्या प्रकटनार्थ अवलंबलेला अेक मार्ग होय. आणि ज्याप्रमाणें देहधारणापूर्वी ती असते नि स्वेच्छापूर्वक देह नि आकार धारण करते, त्याचप्रमाणें देहादिकांच्या त्यागानंतरहि—नाशानंतरहि स्वतंत्रपणें राहते.**"

(६) 'अतींद्रिय द्रष्टृमंडळाचे अनुभव' (Revelations of the Society of Clairvoyance) या पुस्तकाचे कर्ते नेल सेंट जॉन माटेग्यू यांनी लिहिलेल्या वरील पुस्तकांत दिलेल्या अनुभवांपैकी अेक दोन विशेष महत्वाचे अनुभव या विषयावर प्रकाश पाडणारे असल्यामुळें ते काय सांग-तात तें आपण पाहूं.

(अ) माझ्या अेका स्नेह्याजवळ त्याचें फार आवडतें मांजर होतें आणि तें मांजरहि त्याच्याशीं पूर्ण अेकनिष्ठेनें वागत असे. (कुत्रे नि घोडे आपल्या धन्याशी पूर्ण अेकनिष्ठ राहिल्याचीं अुदाहरणें अितिहासांत पुष्कळ आहेत पण मांजराचा अेकनिष्ठपणा हा अपवादात्मकच आहे.) अेका अप-

घातामुळें तें मांजर दुखावलें होतें. आणि त्याला वाचविणें हें पशुवैद्याला दुरापास्तसें होऊन बसलें. माझ्या मित्रानें त्या मांजराची सहा आठवडे-पर्यंत रात्रदिवस खपून शुश्रूषा केली. आणि तें माजर बरें होण्याच्या पंथाला लागलें. त्याला अेका महत्वाच्या कामासाठी न्यूयार्कला जावें लागलें नि म्हणून जातांना त्यानें आपल्या घरच्या मनुष्याला त्याची काळजी घ्यावयाला सांगून ठेवलें होतें. अेके रात्री तो स्नेही घाबरून जाअून जागा झाला आणि त्याचे सर्वांगाला दरारून घाम सुटलेला होता. अेका दाढी असलेल्या मनुष्याच्या हातून सुटण्याचा तें मांजर प्राणपणाने प्रयत्न करीत आहे असें त्याला निश्चित वाटलें. त्याच्या खोलीत क्लोरोफार्मचा वास दरवळून गेला होता. त्या माझ्या मित्रानें सर्व कामे स्थगित केली. आणि तो तत्काळ अिंग्लडला परत आला. तो घरी पोहोचताच घडलेली घटना त्याला कळून आली. ज्या रात्री न्यूयार्कला त्याला ते दृश्य दिसलें त्याच रात्रो दाढी असलेल्या अेका पशुवैद्याने त्या माजराला झालेल्या अपघातांतील घावामुळें होणाऱ्या असह्य वेदनापासून त्याला त्रास होअू नये नि ते माजर झोपी जावे यासाठी त्याला क्लोरोफार्मने गुगी आणली होती. न्यूयार्क नि लंडन यामधील अंतराचे कारण लक्ष्यात घेता ज्यावेळी ते माजर मेले जवळ जवळ त्याचवेळी न्यूयार्कला त्याला तेच दृश्य दिसलें असे ध्यानात आलें.

(आ) मनःसंदेशाचें ( telepathy ) अेक विशेषप्रकारचें अुदाहरण माझे घरी घडलेले आहे. माझे घरी अेक हिंदु योगी मुंबअीहून मला भेटण्यासाठी आला होता आणि त्या नगरी राहणाऱ्या माझ्या अेका ममतेच्या मनुष्याची वार्ता मला मिळावी यासाठी मी त्याला विश्वासांत घेअून विचारलें. त्यानें गंभीरपणें मान हालविली. "मी जर येथें दोन तीन तास राहिलो तर मी तुला त्या विपयीची माहिती सागू शकेन". असे तो योगी म्हणाला. नतर तो अगदी स्तब्ध झाला आणि दगडी पुतळयाप्रमाणे बाह्य भान त्याचें पूर्णपणे नाहीसें झालें. कांहीं वेळानें तो भानावर येअून मजकडे वळून बसला नि येवढेंच म्हणाला 'मी तुझ्या स्नेह्याला भेटलों–तो तुला तारेनें अुत्तर पाठवील'. यानंतर दोन तासांनीं त्यानें सांगितले कीं, तुम्ही आपल्या कार्यालयीं दूरध्वनीनें (telephone) शोध करावा–तेथें तार

आली असावी. तार आलेलीच होती. ती तार तेथून घरीं आणली गेली. ती त्यानें तशी न अुघडलेलीच माझे हातीं दिली नि त्यांत माझे प्रश्नाचें अुत्तर होतें. त्यानें माझें घर सोडलें नव्हतें. अितकेंच नव्हे तर आम्ही बसलो होतो ती खोलीहि त्यानें सोडली नव्हती. अगदीं लहानपणापासून त्यानें या गोष्टीचा अभ्यास केला होता".

या अुदाहरणांवरून मनाची भौतिक जगतावरच नव्हे तर देश नि काल यांवरहि कशी अप्रतिहत सत्ता चालू शकते हे स्पष्ट होतें. मुंबअी नि अिंग्लंडमधील अंतर हजारो मैलांचें आहे. येथून तेथें तार जाण्यास दीड दोन तास लागले ते वजा जातां त्या योग्यानें त्या अंतराचें कांहीं मिनिटांत आक्रमण केलें आणि मरत्या मांजराचे मृत्यूसमयींच्या तीव्रतम अिच्छाबलामुळें न्यूयार्क ते लंडनमधील हजारो मैलांचें अंतर त्या मांजरी मनाला आक्रमावयास कांहीं मिनिटांचाच अवकाश पुरूं शकला. या गोष्टी मनाची अप्रतिहत सत्ता कशी चालू शकते याचें प्रत्यंतर आहेत. ही नि अशींच अनेकशः घडणारीं अनेक स्थळींची नि वेळींचीं अुदाहरणें निःसंशय निर्णित करतात की, या चित्शक्तीचें नि त्या शक्तीनें प्रेरित केलेल्या मनाचें क्षेत्र, द्रव्य, काल नि देश यांच्या कक्षेंत येअू शकत नाही. अितकेंच नव्हे तर त्यांचेपेक्षां अनेक पटीने श्रेष्ठ नि त्यांचेवर पूर्ण सत्ता चालविण्याचें सामर्थ्य त्याच्यांत आहे.

(७) अिंग्लंडमध्यें आर्बाडिन नगरीं १९३४ या वर्षीं विज्ञानशास्त्र-प्रगतिमंडळाच्या अधिवेशनाचे अध्यक्ष या नात्यानें सर जेम्स जीन्स या प्रख्यात गतिशास्त्रज्ञ आणि खगोलशास्त्रज्ञ गृहस्थांचें भाषण झालें. त्यांनीं "विज्ञानशास्त्र तत्वज्ञानाचे ध्येयाकडे वळलें आहे." असें स्पष्ट सांगितलें. त्यांतील कांहीं विशेष महत्वाचा असा सद्योपयुक्त भाग खालीं दिला आहे. "......देश आणि काल यांना जगांतील अस्तित्वधारी वस्तूंच्या गणनांत घालतां येत नाहीं, आणि प्रो. अीनस्टीनच्या सापेक्षवादाच्या नव्या सिद्धांतामुळें तर निसर्गांतर्गत वस्तूंमध्यें त्या दोन गोष्टींचा अगदीं सुद्धां समावेश करतां येत नाहीं. देश नि काल आणि देश–कालांपासून अुत्पन्न झाल्याशा दिसणाऱ्या गोष्टींना यत्किंचितहि बाह्य अस्तित्व नाहीं. देश, काल नि देशकालोद्भूत गोष्टी या केवळ आपल्या मनाच्या विचार-

जगतातील आपले कल्पनाजन्य आकार आहेत. या व्यतिरिक्त वास्तवतेमध्यें यांना मुळीच अस्तित्व नाही. अर्थात् या देश–कालाचें महत्व त्यामुळे नष्ट होत नाही. याच देशकालाच्या आत्मकल्पित आकाररूपी भांड्याच्या साहृयानेंच आपणाला बाहृय जगताच्या ज्ञानाचें आकलन करतां येणें शक्य होतें. बाहृय जगतापासून आपल्या मनाला होणारे ज्ञान हे सर्व ज्ञानेंद्रिया-कडून आणलेल्या सवेदनांपासून होतें. त्या अिंद्रियांना होणाऱ्या सवेदना बाहृय जगताचा नि अिंद्रियांचा संबंध जोडणाऱ्या बाहृय जगतातील वस्तूपासून जो अेक प्रकारचा विद्युत्प्रवाह निघून अिंद्रियावर येअून आदळतो त्यामुळे अुत्पन्न झालेल्या असतात.......पदार्थविज्ञानशास्त्राचे पूर्वी असे ह्मणणे होते की, जगत्‌रूप विषय आपल्या मनाच्या बाहेर आणि द्रष्टा निरपेक्षपणें स्वतंत्र-रूपांत अस्तित्वांत आहे. तें जाणणाऱ्याच्या जाणण्यापूर्वी आणि जाणणाऱ्याचे जाणणे थांबल्यावरहि सनातनपणें असणारें असे आहे. विद्युदणूचा स्वभाव पदार्थविज्ञानशास्त्री मंडळीच्या अपेक्षेप्रमाणे दिसून आला असता तर हेंच मत अद्यापहि टिकलें असते. परंतु विद्युदणूची क्रिया नि स्वभाव अपेक्षेपेक्षा निराळेपणें असल्याचें दिसून आलें. आणि त्यामुळे जुने पदार्थविज्ञानशास्त्र वितळून जाअून नव्या पदार्थविज्ञानशास्त्राचा जन्म झाला आहे. या नव्या शास्त्राने पुढें आणलेला सिद्धांत असा आहे. ज्या निसर्गाचा आपण अभ्यास करीत असतो तो निसर्ग परीक्षणार्थ बाहेर अस्तित्वांत असणारे ‘ कांहीतरी ’ नसून तो केवळ आपल्या ज्ञानक्रियेचे स्वरूप आहे. विषयी-विषय ( sub-ject-object ) सबंधातील तो विषय नसून तो दोन्हीमधील संबध आहे. वास्तविकत: विषयी नि विषय याचेमध्ये स्पष्ट मर्यादारेषा अशी मुळीच नसून ते दोन्हीहि मिळून अेकच वस्तु आहे. विषयी-विषय अथवा द्रष्टा नि दृश्य ही परस्परनिरपेक्ष दोन निरनिराळी सत्वें नसून ते दोन्हीहि अेकाच वस्तूची दृष्टिकोनामुळें दिसणारी दोन रूपें आहेत......बाहृय जगत् आणि आपल्या मनोमय कल्पना या दोन्हीचीं स्वरूपें अेकरूपच आहेत. ती दोन्हीं दोन नसून अेकच आहेत. आणि प्रयोग करतां करतां हें मान्य करणें भाग पडतें कीं, जगताचें स्वरूप मानसिक कल्पनाप्रवाहाव्यतिरिक्त कांहीच निराळें नाही. जगत् हें अेक प्रत्यक्ष वस्तुरूप स्वयंसापेक्ष असें स्वतंत्र स्वरू-

पानें अस्तित्वातच नाही. द्रष्टा नि दृश्य ही अेकाच संपूर्ण वस्तुतत्वाची दोन अंगे आहेत......आपण आपले स्वतःचे कृत्यामाठी स्वतंत्र आहोत, ही भावना जीवमात्रात आहे. पण जुनें पदार्थविज्ञानशास्त्र केवळ जडवादी असल्यामुळे नियतिवादाचा–दैववादाचाच–पुरस्कार त्याला करावा लागला होता. त्या जडवाद्याच्या जडात्मक विश्वांत स्वतंत्रतेला स्थलच नाही. पण या नव्या पदार्थविज्ञानशास्त्रात जडवाद्याच्या पारतंत्र्याला जागा नसून शक्य तर स्वातंत्र्यालाच जागा आहे. आणि त्यामुळे हे जग मानवी जीवनाला सुलभता देणारे, सुखकारी नि अुपयुक्त असे आहे—जडशक्तीच्या अभंग, बेड्यानी जखडलेल्या पशूचा तबेला नाही असे ठरू शकतें".

याप्रमाणे पूर्वीच्या पदार्थविज्ञानशास्त्राचे हे जड जगत्, या नव्या शास्त्राने आपल्या मनाचे कल्पनानिर्मित स्वरूपाचेंच जवळ जवळ आहे असे ठरविले–सिद्ध केले आहे. आणि या दृष्टीने तत्वज्ञानमय ध्येयवादाकडे ते मार्गाला लागले आहे. द्रव्य नि मन ही अगदी अेकरूप–अेकच आहेत, असे जरी अद्याप पूर्णपणे ठरलेले नाही तरी अेका संपूर्ण वस्तुतत्वाची ती दोन अंगे आहेत येवढें तरी निश्चितपणे ठरले असे ह्मणावयास चिंता नाही. डेकार्टेच्या वेळेपासून निर्माण झालेल्या द्वैतवादाला मात्र आता ठाव अुरलेला नाही. **आतां या सर्व गोष्टींचा असा निष्कर्ष निघतो कीं देश-कालाच्या मर्यादेंत जोंपर्यंत आपण आहोंत तोंपर्यंत आपण सर्वजण स्पष्टपणें निरनिराळ्या व्यक्ति आहोंत. आणि देश नि काळाच्या मर्यादेबाहेर आपण पडलों तर मात्र आपण सर्वजण अेकाच महान् चैतन्यशक्तिप्रवाहामधल्या अेकरूपतेंतील रस आहोंत असें निश्चयानें म्हणावयाला पाहिजे आहे.**

---

## ७. अीश्वर आहे काय?

जगांतील भौतिक सत्पर्षींचीं मते. —(केसरी ३१–७–३६)

(८) जगांतील निरनिराळ्या विज्ञानशास्त्रांतील पंडितांची अीश्वर-विषयक काय मतें आहेत हे संशोधून श्री. सदरलंड यांनीं संग्रहित केलीं आहेत. आणि तीं 'मॉडर्न रिव्हयू'नें जुलैच्या अंकी छापली आहेत. त्यांचा अनुवाद पुढें दिला आहे.

(१) **आल्बर्ट आअिन्स्टीन** (गणितशास्त्री)—माझा अीश्वरावर विश्वास आहे. स्पायनोझाची अीश्वरविषयक कल्पना मला मान्य आहे. विश्वाची सुयंत्र व्यवस्था हेंच अीश्वराचें व्यक्तस्वरूप होय असें मी मानतों. सृष्टीच्या सर्वव्यापारांतून सहेतुकता दृष्टोत्पत्तीस येते. जगत् हे केवळ घुणाक्षर न्यायानें निर्माण झालेलें नाही. तें व्यवस्थित नि अेकजिनसी आहे. ही श्रद्धा म्हणजे सर्व शास्त्रीय कार्यांचा पायाच आहे.

(२) **जे. अेस्. हाल्डेन** (पदार्थविज्ञानशास्त्री)—जड सृष्टि ही चैतन्यमय सृष्टीचें अेकांगी नि अपुरें स्वरूप असून, चित्सृष्टि हीच खरी सृष्टि होय. पदार्थविज्ञान नि रसायन या दोन शास्त्रांनी विश्वाचें कोडें आपण अुलगडूं असें शास्त्रज्ञांना गेलीं कित्येक वर्षें वाटत होतें. पण आतां ती समजूत ढासळली आहे. जडवादाच्या स्वप्नांतून शास्त्रज्ञ जागे होत चालले आहेत. जडवाद यापूर्वी सिद्ध झाला नाही नि यापुढेंहि सिद्ध होण्याचीं चिन्हें दिसत नाहीत. आधुनिक शास्त्राच्या अितिहासांतील सर्वांत मोठें अपयश कोणतें असेल तर हें कीं, जीवाचें पृथक्करण पदार्थविज्ञान नि रसायन शास्त्र यांचे द्वारें करणें. अुदाहरणार्थ आपलें शरीरच घ्या. त्याचें वरील शास्त्रांच्या दृष्टीनें पृथक्करण केल्यास काय आढळतें? साबणाच्या आठ वड्या करण्या-अितकी चरबी, स्त्रियांचे चार पांच आंकडे करण्यास लागण्याअितकें लोखंड आणि चार पांच चौरस अिंच जागेंत रंग देण्याअितका चुना! सर्वांचें मूल्य ·७३ डालरांच्या वर जाणारा नाहीं. विश्वाचें केंद्रस्थान जडवस्तु नव्हे किंवा तिची शक्ति नव्हे तर मन, प्रेरणा, हें होय. जडसृष्टि नि चेतनसृष्टि यांच्या मध्यें मोठें अंतर आहे. तें विसरतां कामा नये.

(३) **सर आर्थर अेडिंग्टन** (खगोलशास्त्रज्ञ)—जडवादाचे देव्हारे अेकोणिसाव्या शतकांत माजले होते. जग म्हणजे अेक यंत्र आहे. आणि त्याचा अुलगडा जीवनशास्त्राच्या योगें करतां येअील असें मानलें जात होतें. पण अर्वाचीन शास्त्रीय ज्ञानानें वरील कल्पना अुध्वस्त केल्या आहेत. **विश्वाचें स्वरूप चैतन्यपूर्ण आहे, असा सिद्धांत नव्या शास्त्रीय शोधांनीं सिद्ध झाला आहे. पूर्वीचा नास्तिकवाद नष्ट झाला आहे. चेतना ही आद्य महत्वाची गोष्ट आहे. तिच्यावर धर्म आधारलेला असतो. तो चळणार नाहीं.**

(४) **कर्टले अेफ्. मॅथर** ( भूगोलशास्त्री )--जगाकडे जडवादी दृष्टीने पहाण्याचा काल पूर्वी होता. आतां तो गेल्या कांही वर्षांत पार पालटला आहे. **अेकस्या परमाणूमध्येंहि जी शक्ति चलन पावत असते, तिचें क्षेत्र चेतनेच्या क्षेत्रांतलि आहे–जडाच्या नव्हे, हें अधिकाधिक विचारानें नि सत्यज्ञानानें कळून येत आहे. जग म्हणजे प्रचंड यंत्र नव्हे तर प्रचंड विचार आहे, चिच्छक्ति आहे. सर्व प्रयोग नि सर्व अनुभव असेंच सांगत आहेत कीं, विश्व चैतन्यमय आहे. जड नाहीं** मनुष्यमात्राला व्यक्त स्वरूप देणारी प्रत्येक गोष्ट माझ्या मते अीश्वर होय. अीश्वर चांगला आहे काय? शिव-कल्याणप्रद आहे काय? कल्याणप्रद माणसें असू शकतात असें जर तुम्ही मानीत असाल, तर ही निर्माण करणारी शक्ति, म्हणजेच अीश्वर, कल्याणप्रदच मानली पाहिजे. कार्याअितकें तरी कारण शिवस्वरूपी असलेच पाहिजे.

(५) **आर्थर अेच्. काम्पटन** ( पदार्थविज्ञानशास्त्री )—जग हें आपोआप विकसित झालेले आहे हें मत आतां खंडित झालेलें आहे. **जगाचा कांहीं हेतु आहे आणि त्याच्या पाठीमागें असलेली अशी अेक शक्ति आहे हें मान्य करावें लागतें.** माणसाचें विचार म्हणजे जड सृष्टीच्या नियमानुसार अणूची होणारी घटना असें सिद्ध होत नाही. मनुष्याला अिच्छा-स्वातंत्र्य आहे. देहापलीकडे विचारशक्ति म्हणून त्याला अेक शक्ति आहे.. **अेखाद्याचा मेंदु नष्ट केला तरी त्याची जाणीव तशीच राहील हें**

**शक्य वाटतें. मृत्यूनंतरहि जाणीव राहत असेल असें सिद्ध नसलें तरी सूचित करतां येतें.**

(६) **रॉबर्ट अे. मिलिकन** (पदार्थविज्ञानशास्त्री)—ओीश्वर म्हणजे विश्वाचे अेकात्मक स्वरूप. पृथ्वीचा विकास युगानुयुगे करता करता ती मानवाचे निवासस्थान बनविणें आणि आपले गुणसामर्थ्य त्याचे ठायी निर्माण करणें ही ओीश्वराची कल्पना भव्य वाटते.

(७) **सर जेम्स जीन्स** (गणित नि खगोलशास्त्रज्ञ)—जग ह्मणजे यंत्र नव्हे या विचाराच्या प्रणालीवर बहुतेक शास्त्रज्ञाचे अेकमत होत चालले आहे. जडसृष्टि निर्माण करणारे, तिच्यावर प्रभुत्व चालविणारे मन आहे असा ग्रह दृढ होत चालला आहे. गणिती माणसाच्या विचारासारखे विश्व आहे हे वर्णन अपुरे असले तरी बरेचसे बरोबर आहे. **जड सृष्टीचा शास्त्रापुढें लोप होतो. जडत्वांतील कांहींच उरत नाहीं: विश्वाच्या बुडाशीं जें सत्तत्व आहे तें ह्मणजे मन, चेतना, जाणीव.**

हिंदुस्थानांतील जगद्विख्यात शास्त्रज्ञ सर सी–रमण यानीहि असेच आस्तिक्यवादी मत प्रकट केले होते. सर ऑलिव्हर लॉज, सर फ्रॅन्सिस, यंग हज्बंड, आदिक चौदा शास्त्रज्ञानीहि "**दि ग्रेट डिझाअिन**" या पुस्तकात असाच आपला शास्त्रपूत सिद्धांत व्यक्त केला आहे.

आता आणखी अेक महत्वाची साक्ष येथे घ्यावयाची आहे सर्व जगातील मनुष्यप्राण्याचे मनावर धार्मिक समजुतीचा सर्वसाधारणपणें प्रचंड प्रभाव पडलेला आहे पण त्यातल्यात्यात मुसलमान समाजाचे मनावर तुलनात्मक दृष्टीने विचारापेक्षा विकारांचा नि विवेकापेक्षा हट्टाग्रही भावनाचा चटकन् पगडा बसतो. नि ह्मणूनच मुसलमानाची धर्ममताधता जगाला सर्वत्र अधिकाधिक त्रासदायी, आणि हानिकारक झालेली आहे. तेव्हा अशा मुसलमानी मनावर त्यांचे धर्ममतांचा किती पगडा बसलेला असेल याची सहज कल्पना करतां येण्यासारखी आहे. त्यांचे कुराणांतील सांगीप्रमाणें "मनुष्यप्राणी मेला ह्मणजे जगाचे अभावानंतरच्या 'परमेश्वर-न्यायदिना'पर्यंत आपल्या थडग्यांत मृतावस्थेंत असतो. आणि त्या दिवशी सर्वांना आपल्या सामर्थ्यानें ओीश्वर जिवंत करून मुसलमानांना स्वर्ग नि

मुसलमानेतर काफरांना नरकवास देअून जगाचें नाटक संपवीत झोपी जाअील." असें आहे. अशा समजुतीचा पगडा बसलेल्या अेका विज्ञानशास्त्राभ्यासी मुसलमान गृहस्थाची विशेष महत्वाची अशी साक्ष येथें दिली आहे.

ऑक्सफर्डला अिंग्लंडमध्यें अेम्. अे. झालेल्या सय्यद मेहेदी अिमाम नांवाच्या मुसलमान गृहस्थानीं भागलपुरला रघुनंदन सभागृहात अेका शाळेत 'आमचे अदृश्य जगत्' या विषयावर श्री. बसिरुद्दीन सेशन्स जज्ज याचे अध्यक्षतेखाली व्याख्यान दिलें त्यात ते सागतातः--

"पूर्वीच्या पथार्थविज्ञानशास्त्राच्या शिकवणुकीमुळें भौतिक विश्व नि त्याचे मूलमत्व या विषयीच्या कल्पना सर्व विज्ञानशास्त्राच्या नव्या नव्या शोधानी सर्वस्वी पालटून गेल्या आहेत. पूर्वीच्या विज्ञानशास्त्राचे कल्पने-प्रमाणे हे सर्व विश्व जड परमाणूच्या सयोगाने निर्माण झाले आहे असे वाटत होतं तो परमाणु अेका अज्ञात अशा शक्तीच्या केंद्रीकरणानें बनला आहे असें आता सिद्ध झाले आहे. सध्याच्या द्रव्याचे मूलस्वरूप विद्युदणु आहे असे ठरून तो विद्युदणु दुसरे काहीहि नसून अेका विश्वव्यापी सत्वातील विशेष स्पदनकेंद्र आहे. आणि याप्रकारे सर्व विश्व स्पदनमय आहे. या स्पंदनक्रियेमध्ये कमी अधिक प्रमाणाच्या अनेक श्रेणी आहेत अेका प्रमाणांतील स्पदनलहरींचा आघात झाला तर ते स्पर्शज्ञान ठरते, तर दुसऱ्या प्रमाणातील स्पदनलहरी डोळ्याना स्पर्श करतात नि तो आघात प्रकाशाची कल्पना देतो. तिसऱ्या प्रमाणातील स्पदनलहरींचा–आघात मेंदूपर्यंत पोचून ते शब्दज्ञान ठरते, तर चौथा तसाच भिन्न प्रकारचा आघात रुचि अुत्पन्न करतो आणि पांचवा वासाचें स्वरूप धारण करतो. भोवतालून येणाऱ्या विविध आघातांना शब्द, स्पर्श, रस, रूप, नि गंध याची स्वरूपे देण्याचे कार्य आपला मेंदू करतो. आपला मेंदू होणाऱ्या जागतिक आघाताना विविध रूपे देतो. अर्थात् भौतिक जगत् जें आपण पाहतों ती आपल्या मेंदूनें केलेली निर्मिति आहे. बाह्य जगाचें स्वरूप ह्मणजे केवळ स्पंदनात्मक शक्ति येवढेच; या व्यतिरिक्त दुसरे कांही नाहीं. बाह्य जगताचे आघात आपल्या स्थूल देहाच्या स्थूल अिंद्रियापर्यंत पोंचतात. त्यांना अेका विशिष्ट प्रमाणाच्या कक्षेंतील आघातांची जाणीव करून घेतां येते. त्या कक्षेबाहेर अधिकाधिक गतीचीं स्पंदनें जी भोवतालीं चाललेलीं

असतात त्यांची जाणीव करून घेण्याची शक्ति आपल्या अिंद्रियांना नाहीं. आपल्या अिंद्रियांना समजू शकतील अशा स्पंदनगतीच्या कक्षेपेक्षां कमी वा अधिक गतीची स्पदनें आपणास न कळून त्याचे स्पर्श–रूप–रसादिक गुण-संक्रमण आपल्या अिंद्रियांना करता येत नाही. आपले दृश्य जगत् अेका विशिष्ट प्रमाणांत आपण समजू शकणाऱ्या स्पदनकक्षेच्या मर्यादेंतीलच आहे. 'अ' (alfa) 'आ' (beta) आणि 'अी' (gamma) किरणे आपले डोळे पाहूं शकत नाहीत, पण आपण काही अितर शास्त्रनिर्मित साधनामुळे समजू शकतो. परंतु त्यांहिपेक्षां सूक्ष्म स्पंदनें आपणाला मुळीच समजू शकत नाहीत......"

"दिव्य दृष्टि प्राप्त करून घेतलेल्या पुरुषानें (clairvoyant) आपली दृष्टिशक्ति, श्रवणशक्ति, स्पर्शशक्ति आदिक वाढविलेल्या असतात. त्यांनी आपल्या ज्या आध्यात्मिक शक्ति वाढविलेल्या असतात त्यायोगे त्याला ती सूक्ष्मातिसूक्ष्म वा अुच्चातिअुच्च गतीची स्पदने जाणण्याचें सामर्थ्य प्राप्त होतें—सामान्य देहाची स्थूल अिंद्रियें मात्र तीं जाणण्यास पूर्ण असमर्थ असतात. या स्थूल जगांतील स्थूल गोष्टीप्रमाणेंच सूक्ष्म जगातील सूक्ष्म देहादिकांचें ज्ञान त्याला होत असतें. आपल्या जाणीवेच्या कक्षेंत न येणारे पण सूक्ष्म रूपांत असणारें आणि याच स्थूल जगत असल्या स्थलीच वावरणारे सूक्ष्म जगत् नि त्यांतील देहादिक आपण जसें या जगांतील स्थूल जगत् पाहतों, व्यवहारतो, त्याचप्रमाणें तो बघू शकतो—व्यवहारूं शकतो. त्या जगांतील स्पंदनें अितकीं तीव्र गतीची असतात कीं, त्याची जाणीव करून घेण्याचें सामर्थ्य आपल्या या स्थूल अिंद्रियांना मुळीच नाही. परंतु आपल्या ज्ञानशक्तीचे विशेष प्रकारें वर्धन केलें असता तें जगतहि भासमान होअू लागते.

जसें या स्थूल जगांतील त्याहून श्रेष्ठ गतिमान असलेलें सूक्ष्म जगत् त्या दिव्यदृष्टिवाल्याला दिसू शकतें. त्याचप्रमाणें या आपल्या स्थूल देहामागें असलेलें आपलें सूक्ष्म शरीरहि पहातां येतें तें सूक्ष्म शरीर अत्यत सूक्ष्म अशा विद्युदणूंच्या सांखळीनें या स्थूल शरीराशी बांधलेलें असतें. जोंपर्यंत ही विद्युदणूंची सांखळी टिकून राहते तोपर्यंत मनुष्य आपले सूक्ष्म शरीरासह या स्थूल शरीरांत राहून व्यवहार करूं शकतो. जेव्हां ही सांखळी मरणाचे वेळीं तुटते त्यावेळी हें स्थूल शरीर निर्जीव होअून पडतें आणि तें

सूक्ष्म शरीर स्थूल शरीरापासून सुटें होअून मुक्त होतें, नि सूक्ष्म जगांतील व्यवहार करावयास समर्थ होतें.

सध्यां विज्ञानशास्त्र या स्थूल जगताच्या मागें असलेल्या सूक्ष्म जगताचें ज्ञान करून घेण्यासाठी धडपडत आहे. गूढविद्याशास्त्र या जगापलीकडील सूक्ष्म नि सूक्ष्मातिसूक्ष्म जगाचा शोध लावू पहात आहे. गूढविद्याशास्त्र ह्मणते की त्यापलीकडील अतिसूक्ष्म जगतांतील व्यवहारासाठी त्याला अुपयुक्त असे अतिसूक्ष्म अिंद्रिय अवश्य असतें. विज्ञानशास्त्री या स्थूल जगताचे मागील आध्यात्मिक जगताचा शोध करीत आहे. दोन्हीहि शास्त्रेच आहेत आणि या दोघाचाहि शोध सर्व विश्वाच्या मूळाशी असलेल्या सूक्ष्मातिसूक्ष्म आत्मजगतासाठीच चालू आहे आणि ती दोन्हीहि नेथें अेकत्र होतील."

जडवाद्यानासुद्धां याप्रमाणे जडवाद सोडून चेतनाशक्तीचे अस्तित्व कसें अपरिहार्यत्वानें मान्य करावे लागतें आणि आता विज्ञानशास्त्राच्या विविध शाखांतील शास्त्रज्ञांना जगाच्या चिन्मय स्वरूपाला कशी मान्यता द्यावी लागते हें येथपर्यंत पाहिले. यापुढें ही चेतनाशक्ति वा जीवशक्ति ही देहधारणक्रिया का करते, देहधारण केल्यापासून देहपतनापर्यंत कशाकरितां धडपडत असते, हे पहाणें आपल्या विषयानुरोधानें ओघप्राप्तच झालेलें आहे. देहधारण केल्यापासून तो देहत्यागापर्यंत विविध प्रसंगांत, निरनिराळ्या काळी, वेगवेगळ्या शरीरावस्थेत नि अनंत प्रकारच्या ज्या क्रिया देहद्वारा ही जीवशक्ति करते त्या सर्व क्रियांमधून असणाऱ्या कोणत्या हेतूचा धागा गुंफलेला असतो हे पाहिल्यास आपल्या या वरील प्रश्नाचें अुत्तर आपल्याला बिनचुक मिळेल. प्रश्न जरी अत्यंत महत्वाचा असला तरी त्याचे अुत्तर महत्वाच्या मानानें मुळीच कठीण नाही.

"दुःखांना टाळीत वा दूर लोटीत सुखाची प्राप्ति" हा अेकमेव हेतु सर्व आयुष्यभर प्रत्येक देहधारी जीवाला प्रत्येक क्रिया करण्याला प्रवृत करीत असतो. यावांचून दुसरी कोणतीहि प्रेरक अिच्छा कोणत्याहि जीवाला क्रिया करण्याला प्रवृत करूं शकत नाहीं. कधीं कधी कांहीं महदात्मे या जगांतील सुखांना लाथाडीत नि दुःखाचे डोंगर आपल्यावर कोसळून घेत महान् ध्येया-

प्रीत्यर्थ प्रयत्नरत झालेले असतात. अशा स्थळी वरील 'सुखाचे यत्नार्थ' हे विधान चुकले आहे असे वाटण्याचा सभव आहे. त्याचे स्पष्टीकरण असें की, असल्यामहदात्म्याची सुखाची सामान्य कल्पना नसते. जसे अितरांना शारीरिक वा अिंद्रियभोग्य सुख नि तदुत्पन्न मनाच्या मनोरजनाचे सुख पाहिजे असते, तसे त्याचे नसते. त्याच्या सुखाचे अधिष्ठान उच्च ध्येया-प्रीत्यर्थ प्रयत्नापासून मिळणाऱ्या बौद्धिक समाधानाचे द्वारा प्राप्त होणाऱ्या आनदात असते. दुसऱ्या शब्दात सागावयाचें तर सुखकल्पनेची परिणतावस्था आनदरूपात होअून त्या श्रेष्ट स्वरूपी सुखार्थ व आनदार्थ ते प्रयत्नशील असतात असे दिसून येअील. तेव्हा आपल्या वरील विधानाला ही गोष्ट विस-गत नसून पुष्टिकारकच आहे. दु:खविरहित सुख मिळविण्याकरिता अनेक स्थली, अनेक प्रकारच्या क्रिया घडतील पण हेतु मात्र अेकच असतो. ही जी अनिवार्य, निरपवाद, तीव्रतम नि अविनाशी अशी अिच्छा जीवाला सर्व आयुष्यभर क्रियाशील ठेवते तीच जन्मापूर्वी नि मृत्यूनतर पुनर्देहधारणाला त्या जीवाला प्रेरित केल्यावांचून कशी राहील? देहधारण करून दु:ख-विरहित सुखार्थ प्रयत्न करीत राहणें ही गोष्ट, ही प्रयत्नधारा, हा प्रयत्नप्रेरक अिच्छाप्रवाह, अनिर्बंधपणे असाच प्रवाहित होत राहणार हा प्रवाह तेव्हाच स्वाभाविक नि सहजपणें थाबेल की जेव्हा मिळत्या सुखाचा वियोग झाल्यानें पुन्हा सुखाकडे धावण्याची आवश्यकता अुत्पन्न होणार नाही, अशा सुखास्तव त्याच्या समुद्रात जाअून अनत सुखमयतारूप बनेल. तोपर्यंत तो प्रवाह चालू राहणें हेंच स्वाभाविक, तसे न होणें हेंच अस्वाभाविक आहे. विज्ञानशास्त्र-वेत्त्यांच्या द्रव्याप्रमाणेंच जगात चैतन्यशक्तिहि आहे, किंबहुना जड ही भासमयता असून सर्वच चेतन आहे, हें जसे शास्त्रीय पद्धतीनें अपरिहार्यपणें ठरलें तसें हें वरील निगमन अितर प्रमाणानेंहि सिद्ध झाल्यावांचून पूर्णपणें सिद्ध मानले जाणार नाही. आणि प्रमाणाभावीं केवळ तर्कपद्धतीनेंच निघ-णारें पण सिद्ध करता न येण्यासारखें नि म्हणून तें लगडे असें मानण्याकडेच पुष्कळांची प्रवृत्ति होअील. म्हणून आतां क्रमाक्रमानें अधिकाधिक निर्विवाद प्रमाणांच्या शोधनाला हात घालू.

---

## ८ जन्ममरणपरंपरेच्या अस्तित्वशोधनार्थ निर्विवाद प्रमाणशोधन.

जडामध्ये जडवस्तूंना चालना देणाऱ्या शक्ति सूक्ष्म असतात. सूक्ष्म शक्ति स्थूल जडांना चालना देणाऱ्या असतात. झाडावरून फळ पडते तें ज्या आकर्षणशक्तीमुळे पृथ्वीकडे खेचले जातें ती शक्ति सूक्ष्म असते. अखाद्या जड वस्तूत जेव्हा काही बदल होतो तेव्हां तो बदल घडवून आणणारी सूक्ष्म शक्ति असते, जी कार्यावरून अनुमानिता येते, जी प्रत्यक्षपणे दिसू वा समजू शकत नाही. ही सूक्ष्म शक्ति द्रव्याच्या सूक्ष्म रूपावर जो परिणाम घडविते त्याचे द्रव्यात्मक स्थूलरूप हे कार्य होय. तेव्हा जेथें स्थूलरूप दिसेल तेथें तेथे सूक्ष्मशक्तीचे झालेलें कार्य स्थूल रूपांत दिसत आहे असेच समजलें पाहिजे ऑक्सिजन नि हैड्रोजनचे सूक्ष्म कण काही विशिष्ट प्रमाणात नि विशिष्ट पद्धतीने परस्परात मिसळून त्याला पाणी हे रूप येते. पुष्कळ सूक्ष्म रूपात असणाऱ्या हैड्रोजन ऑक्सिजनला स्थूल पाण्यापासून निराळे करता येणार नाही त्या सूक्ष्म घटकावयवात जर बदल झाला तर त्यामुळें बनलेल्या स्थूल रूपाचेहि स्वरूप बदललेच पाहिजे. बीजात असलेल्या सूक्ष्मशक्तीवरच वृक्षाचे विशेष स्वरूपाचें प्रकटन अवलंबून असतें प्राणिजगतातील विविध स्थूलरूपें ही सूक्ष्मदर्शक यंत्रानी दिसणाऱ्या जीवाणूत अनुस्यूत झालेली असतात मनुष्यप्राण्याचें स्थूल शरीर त्याच्या सूक्ष्म शरीराशी पूर्णपणे संबद्ध असते. अितकेच नाही तर स्थूल-शरीरातील प्रत्येक बदल वा फरक हा सूक्ष्म शरीरात होणाऱ्या हालचालीने वा फरकानें होत असतो. सूक्ष्म शरीरांत जर काही बिघाड झाला तर स्थूल शरीरांतहि बदल झाल्यावाचून रहात नाही. स्थूल शरीर हे सूक्ष्म शरीराचेंच व्यक्तीकरण असल्यामुळे त्या सूक्ष्म शरीराचा जन्म, वाढ, बिघाड, नि मृत्यु हीहि सूक्ष्म शरीरांतील फेरबदलावरच अवलंबून असतात. जोपर्यंत सूक्ष्म शरीराचें अस्तित्व आहे तोंपर्यंत त्या त्यां स्थितीला अनुरूप असे स्थूल देह ते घेत राहणारच. आतां सूक्ष्म शरीर म्हणून जें आपण म्हणतों तें काय आहे तें आपण पाहूं. स्थूल द्रव्याच्या अत्यंत सूक्ष्म

परमाणूंचे बनलेलें, प्राणशक्तीनें युक्त असलेलें, आणि विचारशक्तीचें अिंद्रिय असें जें मन त्या मनाच्या सूक्ष्म रूपासह जिवंत सूक्ष्मबीजरूप शरीर म्हणजे सूक्ष्म शरीर होय. ज्याप्रमाणें वटवृक्षाची सर्व जीवनशक्ति, वर्धन-शक्ति नि फलनशक्ति अेका लहानशा बीजांत साठविलेली असते, त्याच-प्रमाणे हेहि होय. श्रवणेंद्रिय, चक्षुरीद्रिय, घ्राणेद्रिय, स्पर्शेंद्रिय, नि रसनेंद्रिय यांसह चित्त बुद्धि नि अहंभाव (जीवाची 'मी' ही वृत्ति) ही सर्व वर दिलेल्या मन शब्दांतच अंतर्भूत समजावयाची आहेत. वर जी प्राणशक्ति म्हणून म्हटली, ती शक्ति देहधारणकामी श्वासप्रश्वासक्रिया, पचनक्रिया, चलनवलनक्रिया, अभिसरणक्रिया, आदिक शरीरक्रिया ज्या शक्तीने चालतात ती क्रिया होय. या सर्व अिंद्रियशक्तिसहित मन, प्राण, आणि ज्याना हिंदुतत्वज्ञानशास्त्रांत तन्मात्रा म्हणतात, ते द्रव्याचें अत्यंत सूक्ष्म परमाणु मिळून हें सूक्ष्म शरीर बनलेले असते.

ज्याप्रमाणें अेखाद्या वृक्षाच्या गुणदोषाचें बीजांत सूक्ष्म ग्रहण झालेले असतें, त्याप्रमाणेच स्थूल देहधारणकाली घडलेल्या वा घडणाऱ्या सर्व बऱ्या बाअीट, लहानमोठ्या संस्काराचे, कल्पनाचे नि वृत्तीचे ठसे या मनावर वठलेले असतात. स्थूलदेहधारणाच्या काली सर्व आयुष्यांत मनाकरवी नि शरीराकरवी जी जी विविधकृत्यें झालेली असतील त्या सर्व कृत्यांचा अेकत्रित परिणाम हा त्या मनांमध्यें पुढील आयुष्यासाठी प्रवृत्ति नि अिच्छा-रूपानें साठविला जातो.

आपण मनानें नि शरीरानें जी जी गोष्ट करतों, जो जो विचार करतों, त्यांचा अति सूक्ष्म ठसा आपल्या मनामध्ये संग्रहित केला जातो, नि त्यालाच संस्कार ह्मणतात. तो अनुकूल कालापर्यंत लुप्त झाल्यासारखा राहतो आणि वेळ येतांच अिच्छारूपानें पुन्हां मनामध्यें अुद्भवतो. अशा संस्कारांपासून अुद्भवणाऱ्या अिच्छांना वासना ह्मणतात. कोणतीहि वाअीट वा चांगली गोष्ट अेखादा मनुष्य अगदी आरंभी भोंवतालच्या परिस्थितीच्या दाबानें करावयाला आरंभ करतो नि पुढे जसजसा काल अधिक जाअून ती ती कृति ह्मातून अधिक अधिक वेळां घडत जाते तसतसे त्या कृतीचे ठसे अधिकाधिक पक्के नि प्रबळ होत जातात. आणि पुढें ती गोष्ट करणें त्या व्यक्तीचा

स्वभावच बनून जातो. कोणत्याहि अेखाद्या व्यसनांत माणूस याप्रमाणें फसला गेल्यावर मनावर झालेल्या प्रबल संस्कारप्रवाहाच्या वेगांत सांपडल्यानें त्या व्यसनाचा अंत:करणपूर्वक तिटकारा वाटून सुद्धां वेळ येतांच तो मनुष्य अवशतेने—स्वत:च्या अिच्छेविरुद्ध—त्या व्यसनकार्याकडे ओढला जातो. दारूबाज, चोर, व्यभिचारी लोकांना त्यांच्या कृत्यांचा कधीं कधी नि अेखादे अुदाहरणांत तर सतत पश्चात्ताप होत असूनसुद्धा वेळ येताच ते पुन्हां त्याच ओघात जणू ढकलले जाअून अुडी घेतात. अेखाद्या चांगल्या—वाअीट गोष्टीचा अभ्यास जितका अधिक तितके संस्कारबल प्रचड वेग धारण करणारें असतें. नि सस्काराचा वेग जितका प्रचड असेल त्या त्या मानाने त्या त्या गोष्टीकडे मनाची धाव कमी अधिक तीव्र वेगाने जात असते. हें व्यवहारांत थोड्या बारकाअीनें पाहणाऱ्या निरीक्षकाचे लक्षात आल्यावाचून राहणार नाहीं. शरीराकडून घडणाऱ्या प्रत्येक लहान मोठ्या कृत्यांचें मूल कारण त्या मनाच्या सस्कारात निगूढ झालेले आढळून येअील. ज्या ज्या गोष्टीमुळें नि पद्धतीनें शरीर जीवन धारण करते त्या त्या सर्व गोष्टी नि पद्धति त्या त्या मनातील अत्यत प्रबळ अिच्छा व्यक्त नि प्रकट करण्याची साधने असतात. ज्या ज्या अवयवाचा अुपयोग नाहीसा होतो, नि अुपयोग हेतुत: केला जात नाहीं, त्या त्या अवयवाची शक्ति नष्ट होअून तो अवयवहि तो अुपयोग नाहीसा झाला तर काही पिढ्यानी हळूहळू लुप्त होअून जातो असे प्राणि-शास्त्र सागतें. हातांचा अुपयोग न करता हात अुच करून ठेवणारे तपस्वी लोक पुष्कळांनी पाहिले असतील. ते वर ठेवलेले हात कांही दिवसांनीं सुकून जाअून निकामी होतात. सहा महिने अेखादा मनुष्य अंथरूणावर जर अुताणा पडून राहिला तर त्याची चालण्याची शक्ति पायातून नष्ट होते. ज्याप्रमाणे बाह्य अवयव हे मनांतील अिच्छाची वा वासनांची द्योतकें आहेत, त्याचप्रमाणें अेकंदर शरीररचनासुद्धां मनुष्याच्या स्वभावाची, शीलाची, अिच्छाशक्तीची, विचारांची द्योतक ठरते. तेव्हां बाह्य स्थूलरूप हें आंतल्या सूक्ष्मरूपाचें व्यक्त स्वरूप आहे असेंच समजले पाहिजे. जीवांचा हा अंत:स्वभावच पुनर्देहधारणा करवितो वा स्थूलदेहरूपानें क्रमाक्रमानें वारंवार व्यक्त होत राहतो. मनुष्य मरतो तेव्हां देहधारी जीव या

जन्मीच्या सर्व संस्कारांच्या समुच्चयात्मक संस्कारसमूहासह सूक्ष्म देह-रूपानें बाहेर पडतो. नष्ट होत नसून तो सूक्ष्म रूपांत अस्तित्वांत असतो. सर्व आयुष्यभर झालेल्या सर्व प्रकारच्या संस्कारसमूहांतून जो संस्कार अितर सर्व संस्कारांना दाबून अत्यत प्रबलपणें मरतेवेळी मनात प्रकट होअील त्या संस्काराच्या अनुरोधे स्थूल देह सोडणाऱ्या सूक्ष्म शरीराला गति मिळते—त्याचें पुढील भवितव्य त्या प्रबल सस्काराकरवी घडविले जातें. अाणि या अंतिम वेळच्या प्रबल संस्काराच्या प्रकाराप्रमाणें पुढील देहधारणाचा अुपक्रम त्या सूक्ष्म शरीराकडून केला जातो—तसा देह-धारण करावयाला तें समर्थ होते. अंतिम संस्कारप्रबलता त्या सूक्ष्म शरीराला त्या संकल्पानुसार अिच्छेप्रमाणें अनुकूल परिस्थिति नि वस्तुस्थिति निवडून व्यक्त करण्यास सामर्थ्य देते.

अेखाद्या अळयांत, अेखाद्या ऋतूत नि सारखेच खत पाणी देत शेजारी शेजारीं दोन प्रकारच्या झाडांची बीजे लावली तर अून तेच, पाणी सारखेंच, भूमि नि अळे अेकच नि सारखेच खत असूनसुद्धां, प्रत्येक वृक्ष-बीज आपल्या अंतर्गत सूक्ष्मबीजशक्तीच्या जातीची वाढ होण्याला अनुकूल अशीच द्रव्ये आपणाकडे आकर्षून घेअून आपल्याच प्रवृत्यनुरूप वृक्षरूप धारण करील. अगदी त्याचप्रमाणें हे आहे. या 'अनुकूलाकर्षणा'च्या ( natural selection ) निसर्गनियमाप्रमाणे मरत्या मनुष्याचा वासनादेह झाडाच्या बीजाप्रमाणेंच भोवतालच्या जागतिक परिस्थितीतून आपल्याला अनुकूल असलेलें स्थल शोधून नि अनुकूल परिस्थिति निर्माण करीत आपल्या व्यक्ती-करणाकरितां खटपटत राहील. जन्मघेत्या व्यक्तीला अनुकूल परिस्थिति देण्याचा मुख्य भाग अुचलणें हेच काय तें मातापितर करीत असतात. जन्म-घेता जीव आपल्या संस्कारप्रवाहाच्या प्रकाराप्रमाणें आपणास अनुकूल नि अनुरूप मातापितर नि परिस्थिति 'अनुकूलाकर्षणा'च्या नियमाप्रमाणें स्वभाववशतः निवडील अथवा अवशतेनें तशा स्थलाकडे वा परिस्थितीकडे तो ओढला जाअील. कल्पना करा की, अेखाद्याचे मनाचे संस्कारांत उत्कृष्ट गायक होण्याचा संस्कार अत्यंत प्रबल आहे. तर अशा वेळीं तो जीव ती अिच्छा पुरी करून घेण्याची सुसंधि मिळेल अशा मातापितरांचे पोटी नि परिस्थितीत निश्चयानें जन्म घेण्यास जाअील.

पुनर्जन्माविरुद्ध अेक मोठा प्रश्न ह्मणून अुभा केला जातो. नि तो हा कीं, जर असा पुनर्जन्म वा पूर्वजन्म असेल तर त्याची आठवण कां राहत नाहीं. प्रश्न हा व्याघ्रमुखी आहे. प्रश्न करणाऱ्याला ' आपण हा अेक रामबाण टाकला ' असे वाटते. आणि प्रश्न अैकताच साधारणतः विचार केलेला निरीक्षक नसेल तर त्यालाहि हे अनिवार अस्त्र अंगावर आल्याची भीति वाटते. काहीना स्मृतिशीलता हीच काय ती आयुष्याची अेकमेव नि निरपवाद स्थिति आहे असें वाटून ते म्हणतात की, जर मरणवेळी आपली स्मृति थांबली तर तेथे आपण नष्ट होतो हे निश्चित. कारण पुढें राहतो अशी स्मृतिच नाहीं—असती तर स्मृति राहिली असती.

स्मृति असणें हा जीवंतपणांतील अनेक गुणापैकी अेक गुण आहे. तो जीवनाचा अेकमेव नि निरपवादपणे सांपडणारा गुण नव्हे. अगदीं गाढ झोपेंत आपली स्मृति पूर्णपणें—त्यावेळेपुरती तरी—नष्ट झाल्यासारखी असते. तेव्हां स्मृति नसली की, नष्ट झालें हें म्हणणे खोटें ठरते. दुसरें असे की प्रश्नकर्ता हा अितरांप्रमाणेंच जन्मला. लहानाचा मोठा झाला. जन्मताच अबोध बालक होता. हे कांही त्याला नाकारता येणार नाही. मग स्मृतीचा हा नियम जर त्याच्या या आयुष्यापुरता पूर्ण व्यापक मानला तर त्या जन्मकालच्या अबोध स्थितीपासून तो ज्या वेळेपर्यंतची स्मृति नाही त्या वेळच्या क्षणापर्यंत तो जिवंत नव्हता—मेलेलाच होता—नि त्यानतर स्मृतीच्या कालापासून तो जिवत-पणे अस्तित्वांत आला असे तो प्रश्नकर्ता स्वतःसंबधी मान्य करील का ?

तिसरी गोष्ट अशी की, ज्या वेळेपासून स्मृति आहे असें प्रश्नकर्ता म्हणत आहे त्यावेळेपासून तों प्रश्न करत्या वेळेपर्यंत त्याला त्या मध्य-कालांतील सर्व गोष्टी—अगदी बारीक सारीक क्षणापर्यंतच्या सर्व यच्च्यावत् गोष्टी—पूर्णपणें स्मरतात कां ? किवा कांही स्मरतात नि पुष्कळशा विस्म-रणांत गेल्या आहेत. हें विचारतां त्याला पुष्कळशा विस्मरून कांही स्मरतात हेच मान्य करावें लागेल. आणि अशा अुत्तरानंतर त्याला विचारलें कीं, जितक्या गोष्टी नि त्या गोष्टींच्या वेळा स्मरतात तेवढ्याच गोष्टी नि वेळापुरता तूं जिवंत होतास. बाकी वेळी नि गोष्टीत तूं मृत्युवश झाला होतास असें मानणें युक्त होईल कां ? तर त्याला त्याचें काय अुत्तर देतां

येअील बरें? अर्थात् या प्रश्नानंतर विस्मृति हें मृत्यूचें चिन्ह नाहीं-जीवन असून सुद्धां विस्मरणशीलता येअू शकेल हीच गोष्ट त्याला स्वीकारावी लागेल. मनुष्याची स्मृतिशक्ति ही अमर्याद नाहीं. आपल्या अेका जीवनांतीलहि लहान मोठ्या घटनांचा, कृत्यांचा, विचाराचा आपले ज्ञानावर, स्वभावावर, शीलावर, वर्तनावर निश्चित परिणाम झालेला आहे ही गोष्ट अगदी स्पष्ट दिसण्यासारखी आहे. तसेंच मागील जन्मांतील सर्व गोष्टींच्या संस्काराचे संपूर्ण ठसे आपल्या मनस्थलांत वडलेले निश्चित असले पाहिजेत. मग त्यांची आठवण असो वा नसो.

आणि तरीहि अेखाद्या जिज्ञासूला ती पूर्वजन्मस्मृति जागृत करून घेण्याची अिच्छा असेलच तर पातंजल योगशास्त्रानें त्याहि स्मृतिसंपादनाचे मार्ग मांगून ठेवलेले आहेत. आणि कांहीं कांही व्यक्तीना क्वचित्काळी लहानपणी पूर्वजन्म आठवल्याची अुदाहरणेंहि घडलेली आहेत नि घडत आहेत. ती अुदाहरणें पुढील योग्य स्थली दिली जातीलच. आपल्याला रात्री आकाशांत अनंत तारे दिसतात. पण सूर्योदय होतांच सर्व दिसेनासे होतात. त्यावेळी जर कोणी ते तारे दिसत नाहीत तेव्हा नष्टच झाले असे ह्मटलें तर तें जसें वेडेपणाचें ठरेल तसेंच मनाच्या मनाकाशांत पूर्वजन्माच्या स्मृतीची बारिक टिबें अंधुकपणें पण त्या त्या जन्मांतील सर्व घटनांची स्मृतिबीजें साठविलेली अशी निश्चितपणें अस्तित्वांत असलीच पाहिजेत. पण चालू जन्मांतील प्रत्यक्ष जगाच्या अनुभूत स्मृतिप्रकाशाच्या प्रखरतेपुढे ती पूर्वस्मृतीची अंधुकपणें लिकलिकणारी टिबे दिसेनाशी झाली तर त्यांत काय आश्चर्य? म्हणून तीं स्मृतिटिंबे नि ती अुत्पन्न करणारे पूर्वजन्मच नाहींत असें म्हणणें वस्तुस्थितीला धरून होअू शकणार नाहीं.

ज्या गोष्टीचा अभ्यास आपण फार काल, मन लावून, सातत्यानें नि दीर्घ प्रयत्नानें करतो त्यांत आपल्याला प्रावीण्य मिळणे ही गोष्ट आपल्या सततच्या अनुभवाची आहे. प्रावीण्य मिळाल्यानंतर त्या विषयाचा अभ्यास किती तास केला, केव्हां केव्हां कोणकोणत्या प्रकारचे प्रयत्न कोणत्या कोणत्या स्थानीं कसकशा स्थितींत केले हें जरी परिपूर्णपणें आपणास आठवलें नाहीं, तरीहि सर्व प्रयत्नांतील अेकहि क्षणाचा प्रयत्न वाया न जातां त्या सर्व

प्रयत्नांच्या अेकत्रितपणाच्या शक्तीचें आजच्या प्रावीण्यांत रूपांतर झालें आहे ही गोष्ट प्रत्येकजण मान्य करील. ते प्रयत्न तितक्या प्रमाणांत नि तितकें काम झालें नसतें तर आजचें हें प्रावीण्य कधीहि प्राप्त झालें नसतें ही गोष्ट त्या प्रवीणाला नि त्याचे प्रावीण्य जाणणाऱ्याला सारखींच मान्य असतात—असावयाला पाहिजेत यांत तिळमात्र संशय नाहीं. ही गोष्ट मान्य केल्यावांचून गत्यतर नाही. आणि त्याचबरोबर ही गोष्ट मान्य केली पाहिजे कीं, कोणत्याहि गोष्टीवर, विषयावर, कलेवर दीर्घ नि दृढ प्रयत्नपूर्वक प्रबल व्यासंग झाल्यावाचून ती ती गोष्ट, विषय वा कला यांचेवर प्रभुत्व मिळूं शकत नाही हें सिद्ध आहे. मग प्रश्न असा की ज्या ज्या व्यक्ति लहानपणींच अेखाद्या विषयात, गोष्टीत वा कलेत अप्रतिम प्रावीण्य दाखवितात नि तसें प्रावीण्य संपादन केल्याचें या आयुष्यांत प्रमाण दिसत नाही अशा स्थलीं हें प्रावीण्यसंपादन केंव्हां संपादिलें गेलें? आपण पहिल्यानें असल्या असामान्य सामर्थ्याची अुदाहरणें पाहून मग त्या गोष्टीच्या निर्णयाकडे वळूं.

---

## ९ जन्मसिद्ध अलौकिक सामर्थ्याचीं अुदाहरणें

(१) भगवान् श्रीरामकृष्ण परमहंस यांना वयाच्या चौथ्या वर्षापासून निर्विकल्प समाधि अनुभवाला येअुं लागली होती. ही गोष्ट सांगोपांगीं नाही. बंगालमध्यें ही गोष्ट सर्वप्रसिद्ध आहे. याच महापुरुषाचे त्रिखंडप्रसिद्ध स्वामी विवेकानंद हे शिष्य होते. भगवान् श्री-रामकृष्ण परमहंसांना पुढें अेक महायोगी भेटले होते. त्यानी त्यांची ती अवस्था सहजसाध्य आहे असें पाहून "जी स्थिति प्राप्त करून घ्यावयास मला ४० वर्षांचा दीर्घकाल अखंड प्रयत्न करावे लागले ती तुला सहज स्वाभाविकशी आहे" असे आश्चर्याचे अुद्गार काढले.

(२) गणिताचे मोठमोठाले प्रश्न अत्यंत सहज सुलभपणें सोडवण्यास ५ वर्षें वयाचा मॅझियामालो नांवाचा अेक धनगराचा मुलगा होअून गेला.

(३) आकडेमोडीवाचून झेला कोलबर्न नांवाचा ८ वर्षें वयाचा मुलगा गणितांतल्या मोठमोठ्या समस्या सहजपणें सोडवीत असे. अेका वेळीं

८ ला ८ नें गुणावयाचें नि त्याला पुन्हां ८ नें गुणावयाचें याप्रमाणें १६ वेळां केले तर किती संख्या होईल ह्मणून प्रश्न करतांच क्षणाचाहि विलंब न लावतां त्यानें १५ आकड्यांची सख्या २८१४७४९७६७१०६५६ अशी चटकन सांगितली. त्याचें अुत्तर सर्वस्वीं बिनचुक होतें. असेंच त्याला अेकानें अेकदा ४८ वर्षांत किती मिनिटें होतात हें विचारतांच २५२८८८०० मिनिटें होतात ह्मणून अुत्तर दिलें.

(४) मोझर्ट नांवाच्या अेका बाळगायकानें आपले वयाचे ४ थे वर्षी अेक अुत्कृष्ट काव्य लिहिलें आणि ८ वे वर्षी अेक सुंदर संगीत नाटक लिहिलें.

(५) श्रीमत् आद्य श्री-शंकराचार्य वेदशास्त्रांत यांनी ८ वे वर्षा-पर्यंतच्या वयांत पारगतता मिळवून १६ वर्षांचे आंत भगवद्गीता, ब्रह्मसूत्रें, नि दशोपनिषदें यांवर भाष्यें लिहिली नि जगांतील असामान्य नि अद्वितीय तत्वज्ञानी ह्मणून श्रेष्ठतम स्थान ते मिळविते झाले.

(६) कुमार मोहिनीमोहन कुशारी, वय वर्षें १०, याला बीज-गणितांतील कठिण कठिण अुदाहरणें अगदी लहानपणीच मनांतले मनांत सोडवण्याची शक्ति प्राप्त झाली. तो कोणत्याहि शाळेंत गेला नाही. या वर्षी, ह्मणजे वय वर्षें १० सन १९३४ या वर्षी, कलकत्ता विश्वविद्यालयाने गणित विषयांतील त्याच्या आश्चर्यकारी प्रगतीच्या असामान्यत्वामुळें अेम्. अे. च्या परीक्षेस बसण्याची अनुमति दिली आहे. त्याला अिंग्रजी, बंगाली नि संस्कृत या भाषा चांगल्या अवगत आहेत. आणि ही प्रवीणता कोणत्याहि शाळेंत न जातांच त्याचे अंगीं प्रकट झालेली आहे.

(७) कुमारगंधर्व श्रीशिवपुत्रस्वामी नांवाचा ७ वर्षें वयाचा मुलगा नुकताच प्रसिध्दीस आला आहे. हा अेवढ्या लहान वयांत अितका शास्त्रोक्त पध्दतीनें निरनिराळे राग कर्णमधुरपणें गातो कीं, लोक नागा-प्रमाणें गुंग होअुन डुलत असतात. त्याच्या गाण्यावर लुब्ध होअून लोकांना नाटक-बोलपट आदींचा विसर पडतो. कोणत्याहि नव्या बांगडीचे ध्वनि-लेखांतील (फोनोंतील) गाणें अैकतांच तो पुन्हां तें गाणें तंतोतंत जसेंच्या

तसेंच गाअून दाखवितो. प्रवीण गायकाला सुद्धां अेखादें नवें गाणें अैकतांच जसेंच्या तसें तंतोतंत म्हणतां येणें कठिण जातें. पण ती गोष्ट हा कुमार गंधर्व सहज लीलेनें करून दाखवतो. तो कसे गातो याचें कितीहि वर्णन केलें तरी कल्पना देतां येणें शक्य नाही.

(८) दक्षिणेंत मद्रासचे बाजूस अेके गांवी (आमच्या ध्यानांतून तें नांव गळाले आहे नि पुन्हा प्रयत्न करून सुद्धां मिळू शकले नाही) अेका ब्राम्हणदापत्याला अेक जन्मयोगिनी मुलगी झालेली आहे. तिचेकडे येणाऱ्या वृद्ध वृद्ध नि विद्वान् मडळीना सुद्धा आपल्या ज्ञानदानाने ती चकित करते असे टाअिम्समध्यें प्रसिद्ध झालें होते. या प्रसिद्धीच्या वेळी तिचें वय १० वर्षांचें होतें.

(९) आम्ही स्वतः श्रीकाशीस असता अेक गोष्ट पाहिलेली येथें उल्लेखल्यावाचून राहवत नाही. श्रीमत जमखिडीकर यांचे श्री-काशीतील वाड्यासमोर अेक अुत्तर हिदुस्थानीय कुटुंब राहत आहे त्याचे पैकी अेका मुलाचे नाव रामकृष्ण औदिच्य असे आहे. त्याचे वय हा वृत्तात लिहिते वेळी १०-१२ वर्षांचें असेल (१९३६ यावर्षी). जन्मापासून त्याच्या कपाळावर V अशा आकाराची बरोबर मध्यभागी नाकाचेवर गधाचे स्थली तावडी खूण होती. हा पांच सहा वर्षांचा झाला तेव्हांपासून त्याला गाअीगुराचा लळा असल्याचें दृष्टोत्पत्तीस येऊ लागले. हा घरात बहुधा नसावयाचा. शेजारपाजाऱ्यांचे गाअीबरोबर गुराख्याचे गुरात मिसळून त्याचेसह रानात जावयाचा. पहिल्या पहिल्याने गुराख्याना त्याला गुराकडून काही त्रास होअील-होअू लागेल म्हणून भीति वाटावी. पण पुढें अनुभवाने त्याना हे भय वाटेनासें झालें. गाअीच्या स्तनाला तोंड लावून दूध प्यावें, त्यांना आंजारावे, गोंजारावे, त्यांना पाण्या-वर न्यावें, रानात चराअी करावी, वळवावें, अेकत्र करावें, संध्याकाळीं गांवाकडे हाकावें अित्यादि गोष्टी तो अितक्या स्वयंस्फूर्तीनें, निर्भयतेने नि बिनबोभाटपणें करी की, गुराखी हळूंहळूं गुरांची स्वतः काळजी न घेतां या मुलाचेवर सर्व भार टाकून मजेनें छायेंत खेळत बसूं लागले. पहिल्या पहिल्यानें घरची मंडळी हा कोठें गेला, चुकला तर नाही ना? गंगेंत तर नाही पडला? कोणी अुचलून तर नाही ना नेला? अित्यादि शंकेने वेडे होअून जात. नंतर

कांहीं दिवसांनी तो कोठें जातो हें कळून आल्यावर त्याला ते धाक दाखवून मनाअी करूं लागले. त्याला मार बसू लागले. पुढें पुढें तर वडील भाअू आदिक घरची मंडळी गुरासारखी त्याला बडवीत. श्रीकाशीला थंडी फार कडक पडते. खिडक्या लावून सुद्धां दोन तीन जाड घोंगडया घेतल्यावांचून अूब येत नाहीं. तशा थंडींत गच्चीवर रात्रीच्या रात्री शिक्षा म्हणून त्याला अुघडा टेवीत. पण या सर्व शिक्षा सोसूनहि सकाळ होतांच पुन्हां घरच्या मंडळीना झुकांडी देअून हा गुरागाअीच्या मेळयांत जावयाचाच. कांहीं काळांनीं गुराख्याना 'हा' आला असतां याला येअूं देअू नका, हुसकून द्या' म्हणून घरच्या मंडळीनी सांगून त्याचे गुरांबरोबर जाणें बंद करविलें. या मुलाने घरून पळून जाअू नये म्हणून दोन्ही पायांत जड साखळदंडाच्या बेडया घातल्या. तरी त्याचा नाद जाअीना. गुराखी येअूं देअीनात तेव्हां त्यानें आसपासच्या वा दूरच्या ज्या कोणत्या घरी गुरें ठाणबंदी असतील तेथे जाअून त्यांची सेवा करावी, त्यांना चारा घालावा, त्यांना पाणी पाजावें, आजारावे, गोजारावें, नि सर्व वेळ त्यांच्या सहवासांत काढावा. खायला वेळेवर नाही, मार बसावयाचा, थंडीत कुडकुडत सर्व अंग गारठून जावें अशा कष्टांत रात्रीच्या रात्री घालवाव्यात, पायांत बेडया पडलेल्या असावयाच्या, अशा अत्यंत कष्टमय जीवनाशीं झगडून सुद्धां नि असे हाल आणि कष्ट सहन करावे लागत असूनही त्यांना न जुमानतां गोसेवेंत हें विलक्षण प्रेम असलेला हा कुमार अद्याप त्याच नादांत तेंच कष्ट भोगीत तेंच व्रत चालवीत आहे. त्याच्या कपाळावरची ती तांबडी गंधासारखी खुण गेल्या अेक दोन वर्षांपासून पुसट होत होत दिसेनाशी झाली आहे. या मुलाला अितकें गुराचें वेड लागण्यासारखी जन्मापासून अेकहि प्रकारें अनुकूल परिस्थिति मिळाली नाही. अुलट हें गुरांचें वेड आहे तें जावें म्हणून अनन्वित छळ नि हाल त्याला सोसावे लागत आहेत.

(१०) व्हिअेन्नामधील 'दि अेशियाटिक वर्ल्ड' नांवाच्या एका प्रसिद्ध पत्रीं आस्ट्रियांत टिरोल प्रांतांत राहणाऱ्या अेका रोझविथ रॉटरलिच नांवाच्या पंधरा वर्षांच्या असामान्य मुलीचा वृत्तांत प्रसिद्ध झाला आहे. चित्रकला नि काव्यसामर्थ्य हीं असामान्यपणें तिच्यांत प्रकट झालीं आहेत.

साधीं चित्रें काढीत नसून रंगित तैलचित्र ती काढीत असते. तिचे वडील रेव्हेन्यू खात्यांत अेक अधिकारी आहेत. तिची माता घरांत कलाकुसरीचें काम करते. तिच्या पूर्वजांपैकीं हिरातिमस राश नि फान आल्टन हे प्रख्यात कलावंत होअून गेले. ती रोझविथ नांवाची मुलगी आपले वयाचे तिसरे वर्षांपासून लहानपणी अैकलेल्या काल्पनिक गोष्टीतली चित्रें काढूं लागली. आपल्या वयाच्या ८ व्या वर्षीं तिनें आपल्या भावांसह आपलें तैलचित्र अितकें सुंदर प्रकारचें काढून रंगविलें की, तिच्या मातापितरांना आश्चर्य वाटू लागले. त्या व्यवसायांतील तज्ञांना ज्या अडचणी अडवतात नि कठिणता भासतात त्या अडचणी नि कठिणता या लहान मुलीच्या दृष्टीनें जणू मुळी अस्तित्वांतच नाहींत. आणि ती मुलगी आपलें काम अितक्या सहज लीलेनें नि त्वरेनें करते कीं, नामांकित तज्ञहि विस्मित व्हावेत. दुपारीं ही अेकदां चित्रें काढावयाला नि रंगवायला बसली की, कठिणशीं चित्रें सुद्धां अेका दुपारच्या वेळांत वीस वीसपर्यंत काढून पुरी करते. कोणत्याहि चित्रकाराची धाटणी तिला नवीन वा परकी वाटत नाही. पण विशेषतः तिचे चित्रणकामाची तुलना तज्ञ लोक पूर्वीच्या अेका प्रख्यात आर्थर राख्याम याच्याशी करतात .ती १२ वर्षांची होअींपावेतो तिची शेकडों चित्रें अिन्स ब्रुकमध्ये प्रदर्शनांत आली. तिला कल्पित गोष्टीतील दृश्यांची चित्रें काढण्याचें काम देण्यांत आलें आहे. तिच्या नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या चित्रामुळें ती व्हिअेन्नामधील कलाभिज्ञ मडळांत फार प्रख्याति पावली आहे.

(११) म्हैसूर संस्थानांतील अेका सेवानिवृत्त पोस्टमास्तरला कुमार नागराजन् नांवाचा अेक मुलगा असून त्याचें वय यावेळी (जानेवारी १९३६) १४ वर्षांचें आहे. तो अुत्कृष्ट अिंग्लिशमध्यें व्याख्यान देतो, शेक्सपिअरचीं नाटकें समजावून देतो, अितकेंच नव्हे तर धर्म, वेदान्त, विश्वबंधुत्व आदिक विषयांवर अधिकारीपणानें व्याख्यानें देतो. त्याचे वडिलांबरोबर तो दिल्ली, आग्रा, कानपूर, दरभंगा, मुबअी, कोल्हापूर अशीं व्याख्यानांची फिरती आटोपून धारवाड, हुबळी, म्हैसूरमध्यें जाणार आहे नि मग अिंग्लंड आदिक युरोपीय देशांत फिरून व्याख्यानें देणार आहे. अुपनिषद्वचनाधारें मानवधर्माचें विशदीकरण सुगम नि सरसपणें करणाऱ्या या बालकाला पाहून आश्चर्यच वाटण्यासारखें आहे.

(१२) जगद्विख्यात नृत्यकलाकोविद विमलेंद्र बोस हे स्वयंसिद्ध नर्तक आहेत. हिंदुतत्वज्ञानांतील नृत्यशास्त्र हाच त्यांचा गुरु. त्यांना कोणीहि शिकविलें नाहीं. या शास्त्रावांचून त्यांनीं देशी वा परदेशीपैकीं कोणत्याहि पद्धतीचें अंधानुकरण केलेलें नाहीं. त्यांचें वय १९३६ या वर्षी २४ वर्षांचें आहे. यांचे अंगची नृत्यकला त्याचे वयाचे ५ वे वर्षी प्रकट होअू लागली. यांनीं आपल्या नृत्यकलेनें हिंदुस्थानलाच नव्हे तर युरोपलाहि वेड लावले आहे. युरोपमध्यें स्पेनच्या नृत्यकलेची प्रख्याति असून तिचेंच अनुकरण सर्वत्र होत असे. पण आतां या दैवीकलासंपन्न बोसांनी युरोपियनाना हिंदुनृत्य-कलेचे अनुयायी बनवलें आहे.

(१३) झांशीजवळ बुंदेलखंडांत गारोथा या गांवी अेका जन्मांध मुलाला आपल्या वयाच्या २ऱ्या वर्षींच अप्रतिम स्मृतिशक्ति प्रकट झाली आहे. रामायण अगदी तोंडपाठ ह्मणतो. रामायण वा महाभारत यातील कोणताहि श्लोक त्याला ह्मणावयाला सांगताच तो अगदी शुद्धोच्चारानें म्हणून दाखवतो. गीतेंतील कठिण श्लोक सुद्धां अगदीं अस्खलित नि शुद्ध रीतीनें तो म्हणून दाखवतो. या मुलाला पाहण्यास सारखी गर्दी लोटलेली असते. संत सुरदास याचा तो अवतार असावा असें तेथील भाविक लोकाना वाटत आहे.

(१४) अमेरिकेंत आर्थर ग्रीनवुड नांवाचा मुलगा नुकताच अुदयास आला आहे (१९३५). तो वीस महिन्यांचा होओीपावेतो अेक शब्दहि बोलत नसे. त्यानंतर अेके दिवशीं त्याला वाचा फुटली. पहिल्याने तो जें बोलला तें अेक व्याकरण शुद्ध वाक्य. दुसऱ्या वर्षी तो वाचू लागला. त्याची बुद्धि अितकी तीव्र कीं लघुलिपीप्रमाणें त्यानें आपली अेक स्वतंत्र गानलिपी बसविली. वियद्वाणी (रेडियो) द्वारा गायन अैकतांना आवडतील त्या पदांची गान-लिपींत लिखाणें लिहून घेअून तीं तो पदें पाठ करतो. आणि हें सर्व तीन वर्षांचें आधीं झालेलें आहे. तिसऱ्या वर्षी तो फ्रेंच भाषा शिकला. आणि टंक लेखकावर (टॉअिपरायिटरवर) बसून चार पांच रिमें भरतील अितकें लिखाण त्यानें टंकलिखित करून टाकलें. परभाषा स्वायत्त करण्यापेक्षांहि त्याचा टंकलेखकावरचे हस्तचापल्याचा पराक्रम अधिक महत्वाचा आहे असें पट्टीचे

टंकलेखकहि ह्मणूं लागले आहेत. गणितांतहि त्याची गति आश्चर्यकारी आहे. वृत्तपत्रकारांना त्याचा सुगावा लागतांच बरेच वृत्तपत्रांचे बातमीदार त्याचेकडे धावले. त्यावेळीं ७॥ वर्षांचें हें विलक्षण पोर त्यांना म्हणतें "वर्तमानपत्रीं प्रसिद्धीला मोल देणारा मी नाहीं बरें कां?" ते बातमीदार या अुद्गारानें चकित झाले.

(१५) आस्ट्रेलियांत अेक गानकुशल मुलगी जन्मास आली आहे. तीविषयी असें म्हणतात कीं, ती सर्व जगाला आश्चर्यचकित करून सोडील अशी आहे. तिचें नांव मेरी हार्ट. सिडने ओस्टेनफॉड या गांवीं तिनें सारंगी वादनांत सर्व वादनप्रवीणांवर कडी केली. तिच्या आणखीहि सात बहिणी अशाच विलक्षण गानप्रवीण आहेत. कोणाला पेटी, कोणाला सारंगी, कोणाला अितर वाद्यें अशा प्रकारें वादनकुशलता त्यांना स्वयंस्फूर्तीनें प्राप्त झालेली आहे. मेरी बोलू लागण्याआधींच गानलिपी वाचू लागली होती. आपल्या वयाच्या चौथ्या वर्षी आस्ट्रेलियाच्या गायनपरीक्षणमंडळाच्या परीक्षेंत सर्वोत्कृष्ट ठरून त्यांतहि अद्वितीयतेचा मान तिनें मिळविला होता. तिची अडीच वर्षांची बहीण पामेला अिनें आपल्या गायनानें श्रोत्यांना आश्चर्यमुग्ध केलें. असें हें मेरी नामक कन्येचें वृत्त आहे.

---

## १० या असामान्य घटनांची कारणमीमांसा

याचप्रमाणें जगाच्या पाठीवर कमी अधिक मानानें प्रत्येक देशांत प्रत्येक शतकांत अद्वितीय सामर्थ्याची, ज्ञानाची, नि कलाप्रावीण्याची अत्यंत लहान वयांतच जी प्रतिभा वा तेजस्विता दिसते ती समस्या जर पूर्वजन्म मानला नाहीं तर दुसऱ्या कोणत्याहि कार्यकारणपरंपरेच्या अुलगड्याचे प्रयत्नानें सुटूं शकत नाहीं. आनुवंशिक गुणसंक्रमण ह्मणावें तर त्या कुलांत असल्या ज्ञानाची वा प्रतिभेची, सामर्थ्याची वा कलानैप्युण्याची व्यक्तता झालेली दिसून येत नाहीं. जर अनायासें आपोआप अशा व्यक्ति जन्माला येतात असें म्हणावें तर निसर्गामध्यें प्रत्येक गोष्ट कार्यकारणपरंपरेच्या निरपवादी नियमानेंच घडत असते, असें विज्ञानशास्त्रच प्रतिज्ञा-

पूर्वक सांगते नि अनुभवहि असाच आहे. कोणाहि मनुष्याला परिश्रमांवांचून अेखादी कला, विद्या, ज्ञान साध्य होअू शकत नाहीं. आणि जेथें कांहीं साध्य झालेलें दिसत असेल तेथें ती साध्यता प्रयत्नावांचून असू शकत नाहीं. असा आपला अनुभव आहे. मग लहानपणींच असाधारण गुण–विद्या–कला–सिद्धि जेथें प्रकट होत असेल, तेथे ती सिद्धि या जन्मी कमावलेली दिसत नसेल तर पूर्वजन्मीचीच ती कमाअी असली पाहिजे असें, दुराग्रह सोडल्यास, मान्य करणें भागच आहे. मानवी जीवन निसर्गत: पंचज्ञानेंद्रियांच्या विषयसुखेच्छेनेंच भरलेले असावयाचें हा सर्वसाधारण नियम आहे. ज्याला त्या विषयसुखापेक्षांहि बौद्धिक अुत्कर्षानें मिळणाऱ्या सात्विक आनंदाची महती कळून तो आनद मिळविण्याची अिच्छा होते, विषयसुखेच्छेपासून आपली सोडवणूक करून घेण्याकरिता जन्मचे जन्म जे धडपडत असतात नि तरीहि त्या अनिवार नि प्रबलतम विषयसुखेच्छेच्या तडाक्यांतून सुटका करून घेण्यांत अयशस्वी ठरतात ते बहुधा बौद्धिक श्रेष्ठतम सुखाच्या वाटयाचे वाटेकरी होअू शकत नाहींत. आणि भगवान् श्री रामकृष्ण परमहंस, श्रीमद् आद्यशंकराचार्य, वा दक्षिणेंतील मागें अुल्लेखलेली ब्राह्मणकन्यका या वा यासारख्या अद्वितीय भाग्यशाली महदात्म्यांना अगदीं लहानपणापासून ती सिद्धि मिळालेली असावी हा निसर्गाचा पक्षपात वा जागतिक कार्यकारणपरंपरेच्या निर्घृण नियमाचा अपवाद नसून ती सिद्धि पूर्वकाली अर्थात् या जन्मीं अभ्यास झालेला दिसत नसल्यानें पूर्वजन्मकालीच–मिळवलेली असली पाहिजे, यांत तिळमात्र शंका नाहीं. जी गोष्ट या आध्यात्मिक ज्ञानाची तीच गोष्ट अितर अुदाहरणांतील अद्वितीयतेची. वर अुदाहरणें वर्णित केल्याप्रमाणें मोठमोठया गणितज्ञांना सुद्धां जीं अुत्तरें आंकडेमोडीवांचून देतां येणार नाहींत तीं अुत्तरें प्रश्न संपतांच लागलींच देतां यावींत हें त्या बुद्धीचें अलौकिक गणितप्रभुत्व पूर्वकमाअीवांचून मिळविणें अत्यंत अशक्य–सर्वथैव अशक्य–आहे. त्याचप्रमाणें गायनशास्त्राची गोष्ट. सर्व रागांची शास्त्रोक्त माहिती व्हावयाला नि ते ते राग सहज सुलभतेनें म्हणतां यावयाला सबंध जन्म घालवून सुद्धां समर्थ होणें दुरापास्त आहे. मग जन्मत: लहानपणींच ती प्रवीणता येणें ही गोष्ट

कशी शक्य होणार ! पण ती तशी अलौकिक गानप्रवीणतेची प्रत्यक्ष सिद्धि अगदीं बालपणींच प्रकट झालेली प्रत्यक्ष दिसत असतेवेळीं समंजसपणाचे वैज्ञानिक दृष्टीने नि कार्यकारणभावपरपरेचा निरपवाद निसर्गनियम लक्षांत घेतां ही स्थिति पूर्वजन्मांतच कमावलेली असली पाहिजे असें मानण्यावांचून सुटका नाही. त्याचप्रमाणें नृत्यकला, विविधभाषाज्ञान, चित्रकला आदिक गोष्टी, ज्याविषयी वरील अुद्धृत घटनांत असामान्य ज्ञानघटनेची बाल-पणांतील अुदाहरणें आपणाला पहावयाला सापडतात. त्या अुदाहरणांतील त्या त्या गोष्टी, प्रचड प्रयत्नाभावी कोणालाहि प्राप्त होणें निसर्गनियमा-विरूद्ध आहे हे कोणालाहि अमान्य करतां यावयाचें नाहीं. मग हा प्रचंड प्रयत्न या जन्मीं झालेला निश्चित नाही हें स्पष्ट असल्यावेळी तो प्रयत्न त्या पूर्वीच्या काळीच झाला असला पाहिजे, हें मानल्यावांचून गत्यंतरच अुरत नाही. याच संबंधांत आणखी अेका गोष्टीचा अुल्लेख पुराव्यासाठी करून नंतर निराळ्या दृष्टीच्या विचाराकडे वळूं.

लहान मूल जन्मतांच त्याचा मेंदू संस्कार घेण्याला असमर्थ असतो. श्वासोच्छ्वासक्रिया, दूध पिणें, अित्यादि कांहीं थोड्या क्रियांव्यतिरिक्त अितर कोणतीहि समजस क्रिया करावयास वा अितरांची क्रिया समजावयास तें बालक पूर्णपणें असमर्थ असतें. मातेचें ममत्वहि त्याचे मनावर प्रतिबिंबित होअून त्याची अुलट ममत्वरूप प्रतिक्रियात्मक वृत्ति बाल मनांत अुदित व्हावयाला बरेच दिवस जावे लागतात. मग हर्ष, शोक, भय, द्वेष अित्यादि मनोविकार समजण्याला नि व्यक्त करण्याला तें बालक सरतेपदी पहिले दहा दिवसांत तरी पूर्णपणें असमर्थ असतें. हें कोणालाहि सहज समजण्यासारखें आहे. भोंवतालच्या परिस्थितीची जाणीव नि अितर माणसांच्या क्रियेचा अर्थ समजून तदनुगामी भावभावना बाल वयाच्या मनावर अुमटावयाला बराच काळ लागतो यांत कांहींच आश्चर्य नाहीं. परंतु तान्हया मुलाच्या जन्मकालाशीं नि पुढील तान्हेपणाच्या अगदीं आरंभकालाशीं ज्या ज्या मातांचा नि महिलांचा संबंध आलेला आहे त्यांना त्यांना लहान बालक झोपेमध्यें हसतें, दचकतें अित्यादि गोष्टी माहीत आहेत. दचकण्याचे संबंधांत कदाचित् भोंवतालच्या अनपेक्षितपणें झालेल्या मोठ्या शब्दाचा वा ध्वनीचा

नाद त्याला दचकवित असेल असें कारण कल्पून देतां येअील. पण झोपेंत बालक हसतें तें कां? याचें कारण या जन्मांतील कोणत्याहि घटनेशीं संबंध लावून सांगतां येत नाही. हास्यक्रिया ही व्यवहाराच्या समंजसपणाच्या स्थितीची द्योतक आहे. पण बालकाला जन्मकालानंतरच्या पहिल्या कांहीं थोड्या दिवसांत भोंवतालील परिस्थितीनें हास्यवृत्ति अुत्पन्न व्हावी अितकें ज्ञान होणें अशक्य असतें. नवशरीरांतील नवा मेंदू हास्यवृत्ति समजण्या-अितका अद्याप परिणत झालेला नसतो. नवे संस्कार व्हावयाचे असतात. नवा मेंदू जवळजवळ कोऱ्या कागदासारखाच असतो. नवीन संस्काराच्या जाळ्यांत त्या बालकाची स्मृति अद्याप अडकली गेली नसल्यानें पूर्वस्मृति कांहीं प्रमाणांत जागृत असते. आणि पूर्वायुष्यातील हास्योत्पादक स्मृतिचित्रें त्याचे पूर्वस्मरणसमर्थ मनापुढें येतांच बालकाच्या नवमुखकमलावर त्या हास्य-मयतेची छटा अुमटते. हें सत्य निश्चितपणें या जन्मीच्या मनोवृत्तीचें दर्शक नसतें. 'मुलाला सटी खेळवते' असें बायका या हास्यविषयक गोष्टीविषयीं सांगत असतात. सटी ही प्रारब्धलेखक देवता आहे असें मानलें आहे. पूर्व-जन्माची संस्कारसमष्टि ह्मणजेच ही प्रारब्धलेखक देवता आहे असें समजले पाहिजे. नि या दृष्टीनें बायकांचें अुत्तर न कळतच पूर्ण अर्थगर्भ आहे असे लक्षांत येतें. अत्यंत तान्हया बालकाचें हास्य हें पूर्वस्मृतीचा अेक अत्यंत प्रबलतर पुरावा आहे. नि ही पूर्वस्मृति पूर्वजन्मकाळची मानली नाहीं तर कोणती मानावयाची?

घटनापूर्वकथन (prediction) नामक पुस्तकांत श्री. आर्थर लॅमरले हे लिहितात—"मानवी जीवनांतील विषमता नि बाह्यस्वरूपी अन्यायग्रस्तता हीं जगांत कां आहेत? याचें अुत्तर अगदीं सरळपणें आणि समाधानकारक रीतीनें सोडवणाऱ्या 'पूर्वजन्मसिद्धांता' वांचून दुसरें कोण-तेंहि अुत्तर मला समर्पक नि योग्य वाटत नाहीं. अशा प्रकारच्या संशयोच्छेदी अुत्तरावांचून मानवी आयुष्य हें निराशेनें भरलेलें, ज्याचें कोडें अुलगडण्यास बुद्धीला मार्गच सांपडूं नये असें, आणि समर्पक अुत्तर काढण्याचे प्रयत्नांना न सुटणारें असें अेक मोठेंच कोडें होअून बसतें.....मासफील्ड नामक जगन्मान्य कवि (Poet Laureate) आणि तत्वज्ञानी काव्यनिर्मिति

आपल्या कवितेंत 'हे हात-पाय, हे डोळे-कान, हे डोकें-पोट, हें धूलीमय शरीर हीं सर्व मला सहस्त्रशः वेळां मिळालेलीं आहेत; प्रत्येक वेळीं मला मातापिता नवनवे मिळत गेले, या जीवाने हें जगत् सोडलें नि पुन्हां या जगांत प्रवेश केला असें सारखें चाललेले आहे. थीबसमध्यें होतों, ट्रॉय मी पाहिलेले आहे, बाबिलोनमध्येंहि मी वास्तव्य केलें आहे !' असें म्हटलेलें आहे."

"जीवन ही अेक मोठी शाळा आहे केवळ अेका वर्षांतच या शाळें-तील विद्याग्रहण करतां येत नाहीं. अनेक वर्गांतून जावें लागतें. आणि प्रत्येक वेळी निरनिराळ्या जन्माने या जगांत अधिकाधिक ज्ञानसंग्रह करीत वरवर जावें लागतें."

"सांप्रतच्या विज्ञानशास्त्रांच्या नवनव्या प्रमेयानें माझी ही श्रद्धा नाहीशी झाली नाही. डार्विनची अुत्क्रांतीची अुपपत्ति आतां विज्ञानशास्त्री मानीत नाहीत. मातापितर आपल्या संततीला केवळ देहसामग्री देतात. मानसिक नि बौद्धिक शक्ति त्याचेकडून मिळत नाहीं. किंबहुना बुद्धिमान लोकांना बुद्धिमान संतती निर्माण करण्याची शक्ति नसते असेंच पुष्कळ अनुभवास येतें. अलौकिक बुद्धिसामर्थ्ययुक्त पुरुषाच्या जन्माचें कारण सांगतां येत नाहीं. आपण त्या प्रभावशाली व्यक्तीच्या चरणाशीं आदरपूर्वक भक्ति-भावानें बसण्यास सिद्ध होतों. वाद्यकलाकुशल यहुदी बीट्होवेन, मोझार्ट, नाथोव्हेन, अशा व्यक्ति पाहतां तशा व्यक्तिनिर्मितीचें कोडें नुसत्या आनु-वंशिकतेनें सुटू शकत नाही. दैहिक आनुवंशिकता आम्हीं नाकारीत नाही—आणि मानसिक नि बौद्धिक आनुवंशिकता आम्हीं मानीत नाहीं—ती मानतां येत नाही. जसें सामान्यांच्या कुलांत असामान्यांचे जन्म झाले आहेत त्याच-प्रमाणें थोर कुलांत खल पुरुष नि हीन जीव जन्माला आले आहेत".

"या बाह्यतः कारण न दिसणाऱ्या गोष्टींविषयीं पक्षपाताचा दोष देवाकडे देतां येत नाहीं—निसर्गहि असे अस्वाभाविक चाळे करूं शकत नाहीं. ख्रिस्ती पुराणांतल्या कथा घेअून जर त्याच्या दृष्टीनें मानवी जीवनाकडे पाहिलें तर त्यांत न्याय नि प्रेम यांना कोठेंच स्थान दिसत नाहीं. त्यांत देव हा छळ करण्यासाठीं मनुष्याला निर्मितो आणि मनुष्य हा असहाय्य नि

निरुपायग्रस्त बळी ठरतो. **परंतु पुनर्जन्मसिद्धांत मात्र या अंध नि क्रूर अवस्थेपासून सोडवून बुद्धीला पटणारा नि वास्तवतेनें नटणारा मार्ग दाखवून देतो** आणि जन्मजन्मीच्या प्रयत्नांनीं नैतिक नि आध्यात्मिक प्रगति करून घेण्याचा अुपाय मानवी प्राण्याच्या हातांत आणून ठेवतो".

"या पुनर्जन्मसिद्धांताच्या विरुद्ध स्मृतीचा प्रश्न हा सर्वांत मोठा अडथळा आहे. माझ्यासंबंधी म्हणाल तर मी, जी आठवल्यास मला पूर्वीचा कोणताहि जन्म आठवता येअील अशी, अेक विशेष गोष्ट आठवणीत आणण्याचा प्रयत्न केला. **आणि माझ्या पूर्वजन्मींच्या कांहीं आठवणींचीं स्मृतिचित्रें माझे मनापुढें स्पष्टपणें अुभीं झालीं**.........माझ्या संबधानें म्हणावयाचें तर माझ्या मनाला पुनर्जन्मसिद्धांताने पूर्ण समाधान देअून माझ्या मनोदृष्टीपुढें मानवी जीवनाची अनेक नि विविध प्रकारची कोडी स्पष्ट अुकलली गेली. जीवन हें अमरपणें सतत नव नवे अनुभव मिळवित श्रेष्ठतेच्या परमसीमेकडे चाललें आहे. हे कळण्याने माझे मनाला प्रोत्साहित केलें आणि माझे मनाला संशयित स्थिति नि अंध श्रद्धा यांपासून मुक्त करून निर्भय बनविले आहे."

---

## ११ प्रत्यक्ष मरणकालीन आठवणी नि देखावे

मरणकाळीं काय काय घडतें हें कळणें पुष्कळ दुरापास्त आहे. मरत्या मनुष्याचे आप्तअिष्ट मरूं घातलेल्या माणसाचेवर वैज्ञानिक साधनानें मरणकालीं कसें नि काय काय घडतें हें पाहूं देण्याचे प्रयोग करूं पाहणाऱ्यांना संमति देणें हें अस्वाभाविक आहे. तसे प्रयोग आजपर्यंत फार क्वचित्च झाले आहेत. "डेथ अँड अिटस् मिस्टरी अॅट दि टाअीम ऑफ डेथ" (मरण नि मरतेवेळीचें गूढ) या नांवाचें अेक पुस्तक अेका फ्रेंच ग्रंथकारानें लिहिलें आहे. तें मिळूं शकलें नाहीं ह्मणून त्यांत जर मरणकाळची वैज्ञानिक दृष्टया कांहीं माहिती दिलेली असली तर ती आह्माला वाचकांसाठीं अुपस्थित करतां आली नाहीं, याचें वाअीट वाटतें. पण अितर कांहीं स्थलींहून मिळालेली तद्विषयक माहिती खालीं दिलेली आहे. मरते वेळीं

प्रत्यक्षत: जीवाचें देहत्यागाचें कार्य कसें घडतें हें अेका फ्रेंच विज्ञानशास्त्रज्ञानें प्रत्यक्ष सूक्ष्म यत्रसाहयानें पाहिलें आहे. नि त्यानें ते प्रत्यक्ष काय घडतें तें अुल्लेखित करून ठेवलें आहे.

**मृत्यूसमर्याचा देखावा:—**मनुष्य मरत असतां काय घटना घडते याचे फ्रेंच डॉ. बरडॉक यानी अेका विशेष प्रकारच्या छायाचित्रयंत्रानें (कॅमेरा) छायाचित्रें घेतलेली आहेत. मरतेवेळी देहांतून धुक्यासारखा अेक पदार्थ वाहेर पडतो नि तो हळूहळू मरत्या मनुष्याचे देहाचे काही अतरावर त्या देहाचीच प्रतिकृतितुल्य आकृति धारण करून तरंगत असलेला दिसतो. ही आकृति हळूहळू वट्ट नि स्पष्ट होते. आणि काही तासानी दूर जाअून अदृश्य होते. असे या छायाचित्रावरून दिसून आलेले आहे.

डॉ. डंकन मॅकड्गल या गृहस्थानें मृत्यूच्या क्षणीं माणसाचें वजन घेण्याचे प्रयोग केलेले आहेत. त्यानें अेकंदर सहा प्रयोग केले. त्या सहांपैकी चार प्रयोगांत त्या माणसाचें वजन मृत्यूक्षणी दोन औंस अेकदम कमी झाल्याचें दिसून आलें. कोणत्याहि दृश्य कारणावाचून हा फरक दिसून आला. असें का व्हावें याचे कारण अद्याप कोणी दिलेले नाही. (बहुधा स्थूल शरीरातून सूक्ष्म शरीरासाठी स्थूल द्रव्याच्या ज्या तन्मात्रा वा अत्यंत सूक्ष्म सार खेंचलें जाते त्यामुळे हे वजन कमी झालेले असावें-लेखक). (कॅरिग्टनकृत 'Story of Psychic Science'-धर्मजागृति १९३३ वरून.)

कधी कधी कांही माणसाना जन्मत:च कांही विशिष्ट शक्ति प्राप्त झालेल्या असतात त्याचप्रमाणें अँड्रयू जॅकसन डेव्हिड 'डेथ अँड आफ्टर लाअीफ' (मृत्यु नि पश्चात्-जीवन) पुस्तकाचा कर्ता ह्याला अदृश्य सृष्टि प्रत्यक्षपणेंच दिसत असे. तो लिहतो "समजा अेखादा मरणारा मनुष्य मरणाचे दारीं अुभा आहे नि त्वरेनें त्याच्या मरणाची क्रिया सुरू आहे अशा वेळी त्याचे पाय गार पडतात. सूक्ष्म दृष्टीचा अुपयोग करून त्याचे डोक्याचे वरचे अंगास पाहिलें असतां तेथें अेक वर्तुलाकार आकृति दिसते. ही आकृति माणसाचे अंगातून निघालेली, फार विरळ नि सूक्ष्म द्रव्याची असते. तिचा रंग सोनेरी असतो नि तिच्यांत स्पंदन चालू असते. लगेच गुडगे नि हाताचीं

कोपरें येथपर्यंत देह गार झालेला आढळतो. ही आकृति अधांतरीं जरा अुंच गेलेली दिसून येते. पुढें मांड्या गार पडतात नि खांद्यापर्यंत हातहि गार पडतात. त्यावेळीं आकृति जरा अुंच न जातां केवळ फुगीर दिसूं लागते. मग छातीहि थंड पडूं लागते. आणि ती आकृति अधिक वर जाअून खोलीच्या पाटअीशी पोचलेली दिसते. त्यावेळीं श्वास बंद पडतो. नाडीहि थांबते नि ती आकृति लांबट होअून माणसाच्या आकाराची दिसूं लागते. ही आकृति खालच्या बाजूनें मरत्या माणसाचे मस्तकाशीं अेका सूक्ष्म द्रव्याच्या धाग्यानें बांधलेली असते. मस्तकाचें स्पंदन चालू असतें. पण तें अगदी सूक्ष्म असतें. समुद्राच्या हेलकाव्यासारखें तें असतें. त्यामुळें शरीराचे अितर भाग जरी मृत झालेले असतात तरीहि विचारक्रियेचें अधिष्ठान जें मस्तक तें सुयंत्र असते. मस्तक नि हवेंत तरंगणारी आकृति यांचेमधील जोडणारा बारीक धागा चिन्मय असतो. पुढें आकृति वर जाते. कांही क्षण गेल्यावर मरत्या मनुष्याचे मुद्रेची रूपरेषा त्यांत अुमटते. मग मान सांधेहि प्रकट होतात नि त्याचप्रमाणें अितरहि अवयव दिसूं लागतात. ही सबंध आकृति चकाकू लागते. केवळ देहाचीं जर कांही व्यगें असलीं तर ती त्यांत नसतात. ही आकृति अद्याप मस्तकाशीं त्या सूक्ष्म धाग्याने संबंधून असते. पुढें विद्युत्तत्व बाहेर आल्या-सारखें होअून तो धागा तुटतो नि हा सूक्ष्मदेह आपल्या नियत गतीकडे जाण्यास मोकळा होतो.'' (क्यारिंगटन्स स्टोरी ऑफ सायकिक सायन्स पृष्ठ ३३४)

---

## १२ मृत होऊन पुन्हां जिवंत झालेल्याचा अनुभव

हिंदुस्थानांत मृत व्यक्ति कांही महात्म्यांच्या कृपादृष्टीनें वा अन्य कांही घटनांनी जिवंत झाल्यावर आपापले अनुभव त्यांनीं सांगितल्याचीं अुदाहरणें बरींच आहेत. पण हिंदुस्थानांतील लोकांचा पुनर्जन्मतत्वावर दृढ विश्वास असल्यामुळें त्यांच्या अनुभवाला त्या निश्चेष्ट स्थितीतील कल्पना-सदृश्यें ह्मटलें जाण्याचा निश्चित संभव आहे. म्हणून ज्यांना पुनर्जन्मतत्वा-विषयी भानहि नाही नि 'धूलीभूतस्य देहस्य पुनरागमनं कुतः' (धुळीत मिळा-लेल्या देहाचें पुन्हां येणें कुठून होणार ?) असें समजणाऱ्या युरोपीय वर्गांतील मृतावस्थेंतून पुन्हां जिवंत होणाऱ्या व्यक्तीच्या अनुभवाचें वृत्त अधिक विश्व-सनीय वाटणें अधिक स्वाभाविक असल्यानें नुकतेच घडलेले अेक वृत्त खालीं दिलेलें आहे. सॅलफर्डमधील पोर्टलंड अव्हेन्यू २५ येथील वाल्टर वॉरस हा मोटारवाहक होता. तो आपल्या तीन सोबत्यांसह ब्यारो येथे रुबी लीग मॅच पहावयाला गेला होता. तो परत येतांना निराळ्या मार्गानें येत असतां त्याची गाडी ऋबेला पोचण्याचे सुमारास वॉरस याची प्रकृति अेकाअेकीं बिघडली. बरोबरचे सोबती घाबरून जाअून पाहतात तों त्याचें शरीर अगदी ताठ झाले. श्वास नि हृदयक्रिया सर्वस्वी बंद झाली. हा मेला अशी त्यांना निश्चिति वाटली.

ऋबे स्टेशनवर त्याचा कृत्रिम श्वासोच्छ्वास चालू करण्याचा प्रयत्न केला गेला नि तो पुन्हा देहांत आला. पण पुन्हां थोड्याच वेळांत पुनश्च त्याचा जीव गेला. तेव्हां त्याला स्टेशनच्या वेटिंग रूममध्यें नेलें. तेंथें त्याला परत शुद्धीवर आणले. त्यावर पुन्हा जीव गेल्यासारखें झाले. तरी पुन्हां प्रयत्न झाला नि याप्रमाणें तिसऱ्या वेळी तो नीटपणें शुद्धीवर येअून डॉक्टर नि शुश्रूषक मंडळीना त्याला जिवंत ठेवण्यांत यश मिळालें. दुसऱ्या दिवशीं त्याला घरी जाअूं दिलें.

### याचीच कुतूहल वाटणारी साक्षी

वॉरस आपला विलक्षण अनुभव सांगूं लागला. "डॉक्टरचे शेजारी मी अुभा असलेला मला अंधुकसें आठवतें. मला शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न

तो डॉक्टर करीत असतां मी कौतुक करीत बाजूस अुभा आहेसें मला वाटले. माझें शरीर वेटिंग रूममध्यें पडलेले मला दिसत होतें. तो डॉक्टर कृत्रिम प्रकाशानें श्वासोच्छ्वास चालू करण्याचें काम करीत असलेला मला भासत होता नि माझ्या दंडांत कायसेसें सुअीटोचीनें (अिंजेक्शननें) घातलेलें मला भासलें. तें जणूं कांही अेक स्वप्नासारखें होतें. पण तेथें अुभ्या असलेल्या मंडळीत मी अुभा असलेला मात्र मला स्पष्ट आठवतें. आणि ती मंडळी मला शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न करीत होती असें मला स्पष्ट दिसत होतें. ते जे माझेकडून—माझे जड देहाकडून—करवून घेत होते तें होअूं देअूं नये असें मला वाटत होतें. मी मेलों होतों असें मला वाटत नाहीं."

तिसऱ्या वेळीं तो पुन्हां शुद्धीवर आला. त्यावेळी मात्र त्याला मुळीच स्मरण राहिलें नव्हतें. तो तिसऱ्या खेपेला शुद्धीवर आल्यावर त्याचे सर्व अवयव अर्धे निर्जीव झालेले होते. त्यांचेवर ताबा यावयाला फार वेळ लागला. या मनुष्याची प्रकृति चांगली धष्टपुष्ट होती. कांही वावडेंचिवडें खाल्ल्यानें प्रकृति बिघडली असावी असें त्याला वाटलें.

---

## १३ मरतांना काय होतें ?

मनुष्याला मरणानंतर कोणती अवस्था प्राप्त होते हा प्रश्न मनुष्य-प्राण्याअितकाच जुना आहे. मनुष्याला ज्ञानेंद्रियांनी या गोष्टीचें ज्ञान होणें शक्य नसल्यानें कोणी कितीहि ज्ञानी आणि तत्ववेत्ता असला तरी या गोष्टीचा विचार करूं लागला ह्मणजे त्याची अंधारात चांचपडल्यासारखी स्थिति होते. मनुष्य किंवा कोणताहि **प्राणी मरण पावतांना** त्याच्या अंगांतील चैतन्य नाहीसें होतें. आणि या चैतन्यशक्तीची अंधुक छाया मरते वेळीं शरीरांतून बाहेर पडून नाहीशीं होतांना दिसूं शकते. ही शक्ति पुढें कोठें जाते अित्यादि प्रश्न शास्त्राच्या आटोक्याबाहेरचे आहेत हें जरी खरें असलें तरी जीवन आणि **जीवनानंतरची अवस्था** यांमधील पडदा जो मृत्यु यासंबंधीं जास्त माहिती मनुष्याला मिळूं

लागल्यामुळें मरणानंतरच्या अवस्थेविषयीं शास्त्रशुद्ध तर्क बांधणें संभवनीय झालें आहे. अेका क्षणांत मृत्यु घडून येतो, असें जरी आपण ह्मणत असलों तरी जन्माप्रमाणें मृत्यु ही निरनिराळ्या अवस्थांची साखळी आहे. जीवन नि मरण यांमधील टप्प्यावर शास्त्रांच्या साहाय्यानें जास्त जास्त प्रकाश पडत आहे. **मूर्च्छावस्था** प्राप्त करून देणाऱ्या औषधांनीं मनुष्याला जी अवस्था प्राप्त होते ती मरण्यापूर्वी येणाऱ्या अवस्थांपैकींच अेक आहे. हिला जरी आपण अेक प्रकारची झोंपच आहे असें समजत असलों आणि मनुष्याचा श्वासोच्छ्वास या अवस्थेंत चालू असतो तरी गुंगीच्या औषधाचा परिणाम स्थिर असेपर्यंत मनुष्याला कोणत्याहि अुपायानी शुद्धीवर आणणें हे शक्य असत नाही, हें लक्षांत घेतले पाहिजे. मनुष्याला कधी कधी 'क्याटेलेप्सी'ची (फेपऱ्याचा प्रकार) अवस्था प्राप्त होते. या अवस्थेंत साध्या **झोंपेप्रमाणें अिच्छाशक्ति** तर नाहीशी होतेच, पण गुंगीप्रमाणें ज्ञानसंवाहक शक्तीहि नाहीशी होते. या अवस्थेंत मनुष्याच्या छातीचे ठोके पडावयाचे बंद होतात. श्वासोच्छ्वास बंद होतो. शरीरांतील रक्त वहावयाचें थांबतें. मनुष्याच्या मरणपूर्व ज्या अवस्था आहेत त्यांपैकीं ही अेक अवस्था आहे. ही अवस्था हिप्नाटिझमनें अथवा स्वेच्छेनें प्राप्त करून घेतां येते. या अवस्थेंत मनुष्याचे अवयव ताठ नि बधिर होतात. काही कांही जादुगार मनुष्यावर हिप्नाटिझमचा प्रयोग करून त्याला अेका खुर्चीवर डोकें ठेवून नि पाय दुसऱ्या खुर्चीवर ठेवून निजवितात आणि त्याच्या अंगावर ६-६ माणसे अेकदम अुभी करतात, हें पुष्कळांनीं पाहिलें असेल. पण या अवस्थेंतून मनुष्य अगदी सुरक्षितपणें बाहेर पडूं शकतो. **शस्त्रक्रिये** (ऑपरेशन) **मध्यें गुंगीचें** औषध दिल्यानंतर कांहीं कांहीं रोग्यांचे छातीचे ठोके पडावयाचे थांबतात नि शस्त्रक्रियेनंतर ही स्थिति कित्येक तासपर्यंत टिकून राहते. नंतर 'अड्रेनलिन'नें त्यांची हृदयक्रिया चालू करण्यात येते. या सर्व अवस्था थोड्या फार प्रमाणांत मरणावस्थाच आहेत आणि तरी सुद्धां या अवस्थांतून लोक परत येअूं शकतात आणि नंतरहि कित्येक वर्षें त्यांचा जीवनक्रम सुरळितपणें चालतो. ह्मणून गुंगीचीं औषधें किंवा 'हिप्नाटिझम' यांचा जास्त अभ्यास केला तर मृत्यूविषयीं

आपल्याला अधिक माहिती मिळणें शक्य आहे. हीं सर्व माणसें **मृत्यूच्या गुहेंत** थोड्या फार अंतरावर जाऊन परत आलेलीं आहेत.......... मूर्च्छावस्थेंत मनुष्याच्या ज्ञानेंद्रियावर किंवा अितर अवयवांवर काय परिणाम होतो हें पाहण्यापेक्षां त्याच्या मनावर, बुद्धीवर, **अंतःकरणावर कोणते परिणाम** होतात हें पाहिलें पाहिजे. या अवस्थेंतून पार पडलेल्या लोकांना हा प्रश्न टाकला तर ते "कांही नाहीं, नुसता अंधेर होता," असेंच अुत्तर देतात. कारण अेक तर ही अवस्था त्यांनी हेतुतः प्राप्त करून घेतलेली नसते. आणि दुसरें असें. त्यांना आलेले अनुभव ते विसरून जातात. पण प्रयोगासाठी ह्मणून गुंगीचें औषध घेणारी प्रत्येक व्यक्ति प्रत्येक गोष्टीकडे लक्ष पुरवीन अशा आत्मविश्वासानें त्यांत पडते नि तशांना गुंगी यावयास वेळ लागतो. गुंगी आल्यावर मनुष्याचीं ज्ञानेंद्रियें क्रमाक्रमाने त्याला अनपेक्षितपणें सोडून जाअूं लागतात. दृष्टि जास्त वेळ राहील असें सर्वांना वाटतें. पण हीच शक्ति सर्वाआधीं त्याला सोडून जाते. श्रवणशक्ति मात्र सर्वांत अधिक वेळ टिकते नि परतहि पहिल्यांदा येते. गुंग होअून पडलेल्या मनुष्याला पुष्कळ वेळां आपल्याभोंवतीं काय चाललें आहे हें स्पष्ट अैकूं येतें. पण अितकेंच काय तर कधी कधी अितर वेळी अैकू येतें त्यापेक्षां तीक्ष्णपणें अैकू येतें. या शुद्धींत नि मनुष्याच्या सर्वसाधारण शुद्धींत जरी थोडासाच फरक असला तरी या अवस्थेंत मनुष्य बेशुद्ध आहे असें आपण समजत असतां पुष्कळ वेळां आपल्यापेक्षांहि तो जास्त शुद्धीवर असतो हें लक्षांत ठेवलें पाहिजे. यानंतरची पायरी, म्हणजे हिप्नाटिझमची अवस्था, प्रत्येक मनुष्याला प्राप्त करून देणें शक्य आहे. ही मनाची अेक अवस्था आहे. या अवस्थेंत मनुष्याला गाढ झोंप लागल्यासारखी दिसते आणि कधी कधीं हृदयाचे ठोकेहि बंद होतात. याचा अर्थ असा कीं त्याच्या मनाचे त्याच्या शरीरावरील लक्ष पूर्णपणें अुडालेलें असतें. तें अितकें कीं त्याच्या शरीरावर शस्त्रक्रिया केली तरी त्याचा त्याला पत्ता लागत नाहीं. किंवा त्याचीं मनें त्याच्या शरीरावर अितकीं अेकाग्र झालेलीं असतात कीं आपल्या शरीरावरील घाव अिच्छेनें तीं बरे करूं शकतात. मग ही अवस्था **शुद्धीची कीं बेशुद्धीची ?** अर्थातच पूर्ण शुद्धीची. ज्याकडे हीं माणसें लक्ष

देतील त्याचें त्यांना आपल्यापेक्षांहि वेगानें आकलन करतां येतें. आपल्याला ज्या गोष्टी कळूं शकत नाहीत त्या गोष्टी त्यांच्या आटोक्यांत असतात. कारण त्यांची जागरूकता आणि अेकाग्रता करण्याची शक्ति त्यांच्या देहावरच केंद्रित होअून थांबलेली नसते. क्ष किरणाच्या डॉक्टरांना आपल्या देहाविषयीं समजणाऱ्या गोष्टी हिप्नटाअिझ्ड झालेली माणसें सहज सांगू शकतात. यांत आपल्याला वाटते तितके नवल नाही. आपल्याला अदृश्य, असाध्य नि कल्पनेनेच गम्य अशा पुष्कळ गोष्टी या माणसांना सहज दिसू नि अैकू येअू शकतात. आपल्याला कल्पनाहि नाही अशा पुष्कळ गोष्टीचें ज्ञान त्यांना होअू शकते. हिप्नटाअीझड् माणसें लाबवरच्या खोलीत बारीक आवाजांत चाललेलें भाषण अैकू शकतात, असे सिद्ध झालेले आहे. आपल्या साध्या डोळयांना **मायक्रासस्कोपच्या कांचेवर** कांही दिसू शकत नाही. पण हिप्नटाअिझड् माणसे त्या काचेवरील वस्तूचे जणू काय ते मॅग्निफाअीड काचेतूनच पाहत आहेत असें सूक्ष्मपणें वर्णन करूं शकतात. हें जरी विचित्र वाटत असले तरी याने सूचित केली जाणारी गोष्ट फारच विचित्र आहे. या सर्व गोष्टीचा नि मृत्यूचा काय संबंध आहे ? पुष्कळ संबंध आहे. या सर्व गोष्टीनी मृत्यूच्या अगम्य मार्गावर पुष्कळच प्रकाश पाडला आहे. आपल्या डोळ्यामुळें नि त्याला जोडलेल्या मेंदूपर्यंतच्या ज्ञानवाहिकांमुळें आपणाला दिसतें असे आपण समजतों. पदार्थ फार लहान असेल तर त्यावर या डोळ्यांतील यत्राची मात्रा चालत नाही. मग हिप्नटाअीज्ड माणसाला तेच पदार्थ कसे दिसतात ? हाच प्रश्न कानासंबंधीचा. केवळ वातावरणांतील लाटा कानापर्यंत पोचून ज्ञानवाहिन्यांद्वारां मेंदूला पोचतात. अितकाच संबंध असेल तर कानाला अैकूं येणार नाहीत अशा गोष्टी हिप्नटाअीझड् माणुस कसा अैकूं शकतो ? 'या सर्व गोष्टी खोटया आहेत. असें होणेच शक्य नाहीं' असें म्हणून हा प्रश्न झिडकारता येण्यासारखा नाही. या गोष्टीचा पूर्णपणें विचार केलेले लोक असेच म्हणतील. पण यातील पुरावा अितका सबळ नि सत्य आहे कीं, विचार करणाऱ्या माणसाला यावर विश्वास ठेवणेंच भाग आहे. आणि यावर विश्वास ठेवावयाचा म्हटला म्हणजे यापासून निघणाऱ्या अविश्वसनीय वाटणाऱ्या पण तर्ककठोर असणाऱ्या प्रमाणांवरहि

विश्वास ठेवलाच पाहिजे. जगांतील अेक अत्यंत **मोठे तत्वज्ञ प्रो. बर्गसन** यांनी या संबंधांत काढलेले अुद्‌गार मननीय आहेत. ते म्हणतात या पुराव्यावरून स्पष्ट दिसतें की ज्ञानेंद्रियें ही केवळ ज्ञानवाहक माध्यमें आहेत त्यांच्यावाचून मनुष्यांना ज्ञान करून देणारी साधनें आहेत. म्हणजे आपण नि आपली शरीरे ही आपण समजतो त्याप्रमाणें अेक नसून आपले शरीर नि ज्ञानेंद्रियें ही आपला सर्वसाधारण व्यवहार जगाशी चालावा म्हणून आपण वापरीत असलेलीं आपलीं अुपकरणे आहेत. आपण प्रयत्न केला तर आपल्याला त्यांच्या मर्यादेच्या बाहेर पडून त्याना अगम्य अशा गोष्टीचे आकलन करून घेणें शक्य आहे. आपली ज्ञानेंद्रियें ही अेकमेकांपासून भिन्न नि निरनिराळ्या क्षेत्रांत अुपयुक्त आहेत असे आपण समजतो. पण ती तशी नाहीत असें शास्त्रीय प्रयोगांनी सिध्द करण्यात आलें आहे. अुदाहरणार्थ घ्राणेंद्रियांचें साह्य दृष्टीला होअू शकतें म्हणून ज्या शरीराचा आपण अुपयोग करतों नि ज्यांत आपलें वास्तव्य आहे ती शरीरें म्हणजे आपण नाही हे सिद्ध होतें. म्हणून कांही अुपायांनी आपला वस्तूकडे पाहण्याचा दृष्टिकोण बदलूं शकतो. त्यांच्या साह्यावांचून तेंच ज्ञान मिळविणें शक्य होतें.
**टेलिपथी नि मानवी जीवन.** म्हणजे आतां आपण टेलिपथीवर आलों. टेलिपथीची आतां बहुतेकांना माहिती झाली आहे. मात्र टेलिपथीला आज जी मान्यता देण्यांत येते ती मात्र वरील पुराव्यावरून नव्हे, तर बिनतारेच्या प्रसारामुळें लोकांना टेलिपथी असणें शक्य वाटूं लागलें आहे म्हणून. पण नीट विचार केला तर रेडियोचा नि टेलिपथीचा कांहीं संबंध नाही असें दिसून येअील. रेडियोसंदेश जेथून पाठविण्यांत येतील तेथील प्रापनशक्तीवर ते अवलंबून असतात. टेलिपथीचे संदेश हे जर बिनतारी लाटांचा अेक नवीन प्रकार असतील तर त्यांतील बहुतेक स्पष्ट नि विश्वसनीय संदेशांचा अुगम हजारो मैलांवर असलेल्या मरणोन्मुख माणसांतच असतो असें कां? आपलें शरीर हें जर या संदेशांचें ट्रॅन्समिटिंग स्टेशन असतें तर अेवढे अुज्वल संदेश शरीर आजारानें खंगलें असतां नि पुष्कळ वेळां अर्धमृत अशा स्थितींत असतां, कित्येक वेळां बेशुध्द अवस्थेंत असतां, कितीतरी लांबवर पाठविण्यांत येतात तें कसें? त्यापेक्षां आपल्या शरीराच्या बंधनांतून आपलें मूळ स्वरूप मुक्त होत असतांना त्याची ज्योत जास्तच

चमकावयाला लागते हेंच जास्त संभवनीय दिसतें. आपल्या शरीरांत आपला वास असतांना बाहेरील गोष्टीचें ज्ञान करून घ्यावयाला आपल्याला ज्ञानेंद्रियाचें साहच घ्यावें लागतें. हे योग्यच आहे. घरात वसलें असतांना रत्नखचित आकाशाची शोभा न्याहाळावयाची असल्यास आपण नाही का घरच्या खिडकीशी येत ? पण घराबाहेर पडल्यानतर आपल्याला ती खिडकी थोडीच बरोबर न्यावी लागते ? (स्वराज्य ७-८-३६)

---

## १४ मृतात्म्यास स्वतंत्र अस्तित्व आहे काय ?

सामान्य जनाचा साधारण असा समाज आहे की, मनुष्याच्या शरीरांतील आत्मा अथवा ज्यास आपण प्राण म्हणतो तो केवळ वायुरूप असून तो वायु बाहेर निघून गेला म्हणजे त्या देहास मृत्यु आला असें आपण समजतों. अर्थात् प्राण म्हणजे जर वायु तर या शरीरातील वायु नित्याचा बाहेर पडून बाहेरच्या वायूंत मिसळला की, समुद्रात पडणाऱ्या जलबिंदू-प्रमाणें त्याचे स्वतंत्र अस्तित्व नाहीसें झाले. साधारणपणें असाच समज प्रचलित असून शरीरातील प्राणवाचक ज्या शक्ति त्याच्या नावाचाहि अर्थ असाच आहे. अन् या सस्कृत धातूचा अर्थ श्वासोच्छ्वास करणे ( to breathe) असा असून त्यास प्र, अप्, वि, अुद् नि सम् हे अुपसर्ग लागले म्हणजे प्राण, अपान, व्यान, अुदान, समान हे प्राण्याच्या शरीरातील पाच प्रकारचे वायु झाले. या पांच वायूंवरच प्राण्याचे जीवन अवलंबून असते. म्हणून त्यांस पंचप्राण म्हणतात. मग प्राण म्हणजे वायु तर वायु शरीरांतून निघून बाहेर पडल्यावर त्यास स्वतत्र अस्तित्व असते की काय ? आर्यतत्वज्ञानांत आत्मा हा पूर्ण स्वतंत्र मानला असून तो अविनाशी, अविकारी आणि जीर्ण झालेले वस्त्र टाकून जसें आपण नवें धारण करतों, त्याप्रमाणें जरेनें जीर्ण झालेला देह टाकून देअून देही म्हणजे आत्मा हा दुसरा देह धारण करतो असा सिद्धांत मानला आहे. मग जीर्ण देह टाकून देअून त्यांतून जो आत्मा, तेज किंवा प्राणशक्ति बाहेर पडते त्यास आर्यतत्वज्ञानाप्रमाणें स्वतंत्र अस्तित्व असलें पाहिजे. कांही पाश्चिमात्य तत्वज्ञान्यांनीं नि गूढविद्यासंशोधकांनी याविषयीं बरीच वर्षे

प्रयोगात्मक संशोधन चालविलें आहे. ब्रिटनमध्यें जे गूढविद्यासंशोधक मंडळ आहे त्याचे डॉ. नंडोर फडूर हे अध्यक्ष आहेत. मृतावस्थेनतर आत्म्यास स्वतंत्र अस्तित्व आहे कीं नाहीं याविषयी त्यांनी आतापर्यंत जें प्रयोगात्मक संशोधन केलें, त्यांतून काय फलप्राप्ति झाली ही गोष्ट त्यांनी प्रसिद्धिली आहे. या प्रयोगास चार अुपकरणें लागतातः--

(१) काचेची खोली. यांतील वायु सर्वस्वी काढून टाकलेला असतो. मृत्यूनंतर प्रेतामधून जो वायु किंवा तेज बाहेर पडते ते त्यांत दृश्य होते.

(२) प्रयोगाच्या वेळी जर कांही ध्वनि बाहेर पडेल तर त्याचे लिखाण (रेकार्ड) घेणारें विद्युद्यंत्र.

(३) प्रयोगाच्या वेळी (त्या काचेच्या खोलीतील) वातावरणांत यत्किंचित् फेरपार झाला तर त्याचें परिमापन करणारे यंत्र (थर्मोग्राफ).

(४) प्रेताच्या दृश्य स्वरूपात जसजसे फेरफार होतील तसतसे त्याचें चित्र घेणारें यंत्र (अिन्फ्रारेड सिनेमॅटोग्राफ फिलम).

डॉ. फडूर यांचें असें म्हणणें आहे की, प्राण्यास मृत्यूनंतर विशेष अवस्था प्राप्त होते, ही गोष्ट खरी आहे. याची सामान्य माणमास पुराव्या-सह निश्चिति पटवून देणें शक्य व्हावें म्हणून आम्ही प्रयोग चालविले आहेत. अिंग्लंडमध्यें जी 'सायकिकल रिसर्च अिन्स्टीटयूट' आहे तिचे सदस्य नि डॉ. फडूर हे पिशाच्च योनीचें अस्तित्व गृहीत धरून चालणारे नाहीत. किंवा ती योनी नाही असें त्यांचें निश्चित मतहि नाहीं. संशोधनात जें काही निष्पन्न होओील ते मानावयाचें अशा धोरणानें चालणारे ते आहेत.

वरील अुपकरणांत जी काचेची खोली सांगितली तशा प्रकारची खोली घेअून त्यांत ते जिवंत अुंदीर सोडतात. या काचेच्या खोलीस पारा नि संपुटित वायु यांनीं भरलेल्या कांहीं कांचेच्या नळया जोडलेल्या असतात. या खोलींतील वायु पूर्ण काढून टाकल्यमुळें त्या पोकळींत जी आर्द्रता अुत्पन्न होते त्या आर्द्रतेचें परिवेष्टन मृत अुंदराच्या शरीरांतून कांहीं शक्ति (मग त्यास प्राण, वायु, तेज कांहीं म्हणा) बाहेर पडते, त्या शक्तीसभोंवतीं पडते.

यावरून असें सिद्ध होते की मृत्युपश्चात् दुसरी विशिष्ट सृष्टि आहे अशी ज्ञानप्रेरणा करणारी कांहीतरी साधनशक्ति जिवंत प्राण्याच्या ठिकाणीं असते.

दुसरा प्रयोग ध्वनिलेखकविद्युद्यंत्रावर करतां येतो. मेणाच्या तबकडीवर या ध्वनीची स्थायी नोंद या यन्त्राच्या योगें होतें. वरील संस्थेनें कांहीं जिवंत माणसांच्या शब्दांचें लिखाण (रेकार्ड) घेऊन ठेवण्याचा क्रम चालू ठेवला आहे. त्याचा अुद्देश असा की, पुढें मागें त्यांतील कोणी माणुस मृत झाल्यावर त्यांच्या शब्दाचे लिखाण घेता आल्यास दोन्ही शब्दांत सादृश्य आढळून येतें की नाहीं हे समजावे.........तांबड्या रंगाच्या अलीकडच्या किंवा नीळसर रंगाच्या पलीकडच्या किरणलहरींनी (Infra red or ultra violet) फिल्मवर छायाचित्रें घेण्याची जी अुपकरणे आहेत त्यावरून प्रयोग करून पाहिला, त्यावरून चर्मचक्षूस न दिसणाऱ्या वस्तूंचें छायाचित्र घेतां येणे ही गोष्ट शक्य कोटीत आली आहे. **वातावरणांत होणाऱ्या फेरफाराचें मापन करणारा थर्मोग्राफ याच्या प्रयोगावरून मृतात्म्यास चैतन्य असतें असें सिद्ध होतें.** डॉ. फडूर यांचें संशोधन अद्याप चालू असून या विषयात अद्भूत शोध जनतेस निश्चितपणें दाखवून देतां येतील असे त्याचें मत आहे. (विहार ८-८-१९३५)

---

## १५ मरणानंतरच्या अस्तित्वाचे पुरावे

(१) अिसवी सन १८६७ या वर्षी अेक मुलगी मरण पावली. तिचें वय त्यावेळी १८ वर्षांचें होते. तिच्या भावाचें तिच्यावर फार प्रेम असल्यामुळें तिच्या मरणानें त्याला फार दुःख झालें. हा भाअू अडत्या होअून गांवोगांव फिरूं लागला. सुमारें नअू वर्षांनीं घरापासून नअू दहा मैलावर असलेल्या अेका गांवीं व्यापारी कामासाठीं तो गेलेला होता. त्यावेळीं व्यापाराला तेजी असल्यामुळें तो आनंदांत होता. अेके दिवशीं दुपारीं आपल्या खोलींत आपल्या कामकाजांचा पत्रव्यवहार टेबलावर लिहीत असतां त्या मनुष्याला टेबलावर हात ठेवून आपल्या बाजूला कोणी बसलें असल्याचा भास झाला. त्यावेळीं खोलींत चांगलें अून पडलें होतें. लागलीच

त्यानें शेजारच्या व्यक्तीकडे पाहिलें नि आपली मृत बहीणच ही आहे असें ओळखून तिच्या नांवानें तिला हांक मारली आणि तिच्याजवळ तो जाणार तोंच ती प्रतिमा अदृश्य झाली. हातांत शाओीचा टाक, तोंडांत पेटविलेली बिडी, टेबलावर लिहिलेलें लिखाणहि वाळलेलें नव्हतें. हें सर्व निरखून पाहून त्याची निश्चिति झाली की आपण स्वप्नांत नाही—किंवा भ्रमांतहि पण नाही—चांगलें जागे आहोंत. मरणापूर्वीं जशी ती होती तशीच आताहि अगदीं जिवंत दिसत होती. जिवत माणसाचे अंगावर जसा घाम दिसत होता तसाच तिचेहि अंगावर दिसत होता. केवळ तिच्या मुद्रेवर अुजव्या बाजूला तांबडा ओरखडा अुठलेला त्याला दिसला. ती प्रतिमा अदृश्य झाली तेव्हां त्याला आपण घरी जावें असें वाटून तो पहिल्या गाडीनें घरी गेला. घरच्या मंडळीस हा चमत्कार तो सागू लागला. त्याच्या बापाचा त्याच्यावर विश्वास बसेना. पण जेव्हां गालावरील ओरखड्याचें वृत्त मंडळीस त्याने सांगितलें, तेव्हा त्याच्या आओीस कापरें भरले नि घेरी आल्यासारखें वाटूं लागले. जरा बरें वाटल्यावर ती सांगू लागली की, हा चमत्कार खरा आहे. मुलीला प्रेताच्या पेटीत घालण्यापूर्वीं (पाश्चात्यान शव पेटीत घालून पुरतात हें सर्वांना माहित आहेच) तिच्या अगावर कपडे घालतांना कपड्यांतील टाचणीसारख्या वस्तूचें तीक्ष्ण टोक घाओीत प्रेताचे गालावर ओरखडले गेलें. तो तांबडा ओरखडा होता. आओीला फार वाओीट वाटलें. पण अुपाय नव्हता. त्या ओरखड्यावर पांढरी पूड टाकून तो दिसेनासा केला होता. ही गोष्ट तिनें कोणालाहि सागितली नव्हती. यांत भावानें बहिणीस पाहिलें अितकेंच असतें तर कल्पनेचा खेळ ह्मणण्याला वाव राहिला असता. पण कोणालाहि माहित नसलेल्या त्या ओरखड्याच्या पुराव्यानें ती गोष्ट भ्रमाच्या नांवाखाली नाकारतां येणार नाहीं. ह्मणून त्या पुराव्याला सत्याचें दृश्य असेच ह्मणणें भाग आहे. (Myer's Human Personality.)

(२) बॅरन ड्रायडेन लिहितातः—माझे श्वशुर श्री. पोनोमारिफ हे बरेच आजारी राहून वारले. ते आजारी असल्यामुळें मी सहकुटुंब त्यांचेकडे राहण्यास गेलों होतों. मी तेथें राहण्यास गेल्यावर बऱ्याच दिवसांनी ते

वारले. माझें नि श्वशुरांचें थोडेसें मनांतून वाकडें होतें. मरते वेळीं सर्वांना जवळ बोलावून त्यांनीं आशीर्वाद दिले नि मग ते वारले. नववे दिवशीं क्रियाकर्मांतर व्हावयाचें होतें. त्याचे आदले दिवशीं मी माझ्या खोलीत निजावयाचे सिद्धतेंत होतो. माझी पत्नी निजली होती. मी दिवा मालविला तों खोलीत पावलें वाजल्यासारखें वाटलें. कोण आले म्हणून विचारलें पण अुत्तर नाहीं. मी काडी पेटविली तों माझेसमोर श्वशुर अुभे आहेत असें मी पाहिले. त्यांचे अंगावरील निरनिराळ्या जातीचे शिवलेले कपडे मी त्यांचे अंगावर पाहिले. त्यांस पाहताच मी "आपणास काय पाहिजे?" म्हणून त्याना विचारले. त्याबरोबर ते दोन पावले पुढे येअून मला नांवानें हाक मारून म्हणाले, "मी तुमच्याशी बरेपणानें वागलो नाही याची मला क्षमा करा. तुम्ही क्षमा करीपर्यंत मला परलोकी समाधान नाही." मी हात पुढें केला—त्यानीहि हात पुढे केला. आम्ही हस्तादोलन केले नि मी म्हणालों, "मी आपले कधीच वाअीट चिंतिले नाही. याला अीश्वर साक्ष आहे" त्याचा हात मला गार लागला. नतर ती प्रतिमा गेली नि पुढें अदृश्य झाली. दुसरे दिवशी अुपाध्यायास बोलावून अत्यविधि झाला. त्यावेळी फादर वेलिस हे अुपाध्याय होते. विधीला पुष्कळ मंडळी जमली होती. विधि संपल्यावर मी नि पत्नी दोघे अेकत्र अुभे होतो. अुपाध्याय येअून म्हणाले, 'आपल्याशी काही व्यक्तिगत बोलावयाचे आहे.' 'आम्ही दोघे कोणतीहि गोष्ट अेकमेकात स्वतत्र व्यक्तिगत समजत नाही. आपणांस काय बोलावयाचे ते निःशकपणें सांगा असे मी म्हटले. तेव्हा ते म्हणाले, "आपले श्वशुर रात्री ३ चे सुमारास मजकडे आले, मला त्यांनी विनंति केली की, मी नि जावअी यांचेमध्यें जें मनोमालिन्य झाले आहे तें नाहीसें करून पुन्हां सख्य करून द्यावें." या गोष्टीत मृत मनुष्य दोघांस स्वतंत्रपणें भेटून अेकाच गोष्टीसंबंधीं सुसंगतपणें बोलतो ही गोष्ट लक्षांत घेतां याला भ्रमशीलता न म्हणतां सत्य घटनाच समजली पाहिजे.

(३) अमेरिकेंत आयोनिया या नगराजवळ अेका घरांत मायकेल क्रानले या नांवाचा मनुष्य ता. २ फेब्रुवारी १८९१ या वर्षीं मेलेला आढळला. असल्या गोष्टीची शोधना करणारे अधिकारी जवळच होते. अपमृत्यु-

निरीक्षकाकडे प्रेत आल्यावर सर्व विधि होऊन प्रेत घरीं नेण्याची सिद्धता केली. प्रेत सांपडलें त्या ठिकाणची घाण अंगावरील कपड्यांना लागल्यामुळें प्रेतास नवे कपडे घालण्यांत आले नि जुने कपडे अधिकाऱ्यांच्या कार्यालयाच्या आवारांतच पडून होते. कानले याचे मुलानें प्रेत घरीं आणले. त्याची मुलगी घरीं होती. तिने प्रेत पाहिलेले नव्हतें. पण भाऊ पेटीसह प्रेत घेऊन घरी आला हें पाहून तिला घेरी आली नि ती बेशुद्ध झाली. कांही वेळानें ती शुद्धीवर आल्यावर बापाचे पूर्वीचे कपडे कोठें आहेत याचा ती शोध करूं लागली. ती म्हणाली, "बाबा नुकतेच मला भेटले. त्याचे कपडे काळे होते. सदरा पांढरा होता नि बूट कापडाचा होता. बाबांनी मला सांगितलें की, मी परगांवी गेल्यावर माझ्या अंगांत जें अेक करड्या रंगाचें खमीस होतें त्याच्या आंतल्या बाजूस मी अेक तांबडें कापड वेडेंवाकडें टाके घालून शिवलें नि त्या कापडाच्या खिशांत कागद घालून तो खिसा बंद केला आहे. त्या कागदांत पैशांच्या हुंड्या आहेत." ती पुन्हां बेशुद्ध झाली. शुद्धीवर येतांच तिनें कपडे आणण्याचा हट्ट धरला. मंडळींना हे सर्व भ्रमशीलतेचें वाटले. पण तिचा हट्ट न पुरविल्यास तिच्या प्रकृतीला अपाय होअील ह्मणून तिच्या म्हणण्याप्रमाणे करावे असें डॉक्टरानें सुचविलें. तेव्हां कानलेच्या मुलानें त्या अधिकाऱ्याच्या कार्यालयांत जाऊन त्या कपड्यांचा शोध केला. अधिकाऱ्याने ते कपडे कापडांत गुंडाळून ठेवले होते. कपडे आहेत असें त्यानें कळविलें. त्या मुलानें सर्व वृत्त सांगितलें तेव्हां त्या अधिकाऱ्यानें ते कपडे सोडले. त्यावेळी तें खमीस नि तांबड्या रंगाचा खिसा सांपडला नि तो फाडून बघतां त्यांतील कागदांत पैशांच्या हुंड्या सांपडल्या. या गोष्टीची सत्यता बघण्यासाठी तो मुलगा, ती मुलगी, तो डॉक्टर, तो अधिकारी नि अितर लोक यांच्या साक्षी घेऊन त्या गोष्टीच्या सत्यतेविषयीची निश्चिति पटवून घेतलेली आहे.

(४) वरील सर्व गोष्टी मायर्सच्या 'ह्यूमन परसनॅलिटी' (मानवी व्यक्तित्व) या पुस्तकांतून 'मरणोत्तर स्थिति नि परलोकविद्या' या विषयींच्या श्री. भागवत यांचे पुस्तकांतील अुताऱ्यावरून घेतलेल्या आहेत. असेच अनेक पुरावे ज्यांना हवे असतील त्यांनीं वरील मायर्सच्या पुस्तकांत

नि अितरत्र प्रसंगोपात्त अितर पुस्तकांतून दिलेले वाचावेत. परंतु आणखी अेक महत्वाचा पुरावा दिल्यावांचून पुढे जाववत नाहीं. तो पुरावा म्हणजे प्राध्यापक भिसे यांचे अनुभवाचा होय. डॉक्टरांचें पूर्ण नांव शंकर आबाजी भिसे हे होय. हे महाराष्ट्रीय गृहस्थ आज अमेरिकेसारख्या पाश्चिमात्य यांत्रिक नि भौतिक सुधारणाच्या कल्लोळांत सापडलेल्या देशांत अेक विख्यात संशोधक, यंत्रशास्त्रज्ञ नि विज्ञानशास्त्री म्हणून सुप्रसिद्ध झाले. याचा मरणोत्तर स्थितीवर विश्वास असला तरी सत्यान्वेषणासाठीं हे सतत सिद्ध असत. खरे विज्ञानशास्त्रज्ञ असेच असावयास पाहिजेत. पाश्चिमीय देशांत मरणोत्तर स्थितीचा शोध लावण्यासाठी स्थापन झालेल्या ' स्पिरिच्युआलिस्ट अलायन्स ' नि ' सायकिकल रिसर्च सोसायटी ' नांवाच्या संस्थेचे सभासद होअून त्याच्या सशोधनप्रयोगाचे वेळी हे अुपस्थित असत. ते स्वतःच अेका लेखात म्हणतात की, ' सत्यसशोधकाच्या पूर्वग्रहरहित मनानें नि परलोक-विद्येचा कट्टा विश्वासक या नात्याने मी त्या संशोधनप्रसंगी अुपस्थित राहिलों होतो तरी त्यांतील अेकहि कसोटीमुळें कोणताहि माध्यम ( medium ) माझे समाधान करूं शकला नाही. ' असे असूनहि त्यांची अितकी अचल श्रद्धा मरणोत्तर स्थितीवर का बसली याविषयी कारण देतांना ते म्हणतात, " तें कारण अिंग्लडमध्यें वा अमेरिकेंत सांपडावयाचे नाही. मरणोत्तर जीवांना पश्चात् राहणाऱ्या जिवलगांशीं अनेक प्रकारें संबंध राखतां येतो ही गोष्ट निर्विवाद आहे. असें माझें ठाम मत होण्याचें कारण ' **ज्याची मीमांसा अखिल विज्ञानशास्त्रालाहि करतां येणार नाहीं** ते कारण म्हणजे हिंदुस्थानात असताना मला व्यक्तिशः आलेला अनुभव होय. माझे असे व्यक्तिगत अनुभव पुष्कळ आहेत. त्यापैकी कांही वेचक अनुभव येथें देतो." ते २८ वर्षें हिंदुस्थानाबाहेर होते. २० वर्षें अिंग्लंडमध्ये नि पुढें ८ वर्षें अमेरिकेंत होते. हें लिखाण त्यांनी १९२६ या वर्षी न्यूयार्कमधील अेका वर्तमानपत्रासाठी लिहिलेलें होतें नि त्याचा अनुवाद चित्रमयजगत्मध्यें आलेला आहे. त्यांतून हें वृत्त येथें दिलेलें आहे.

यांनीं अेका वस्तूचें दुसऱ्या वस्तूंत रूपांतर करून दाखवण्याचे नि असलेच असे अनेक चमत्कार केवळ विज्ञानशास्त्रज्ञानाच्या बळावर करून

दाखविले. हे मायादर्शनाचे खेळ राजेरजवाडे, संस्थानिक, हजारो युरोपियन, नि हिंदुस्थानीय लोक, शास्त्रवेत्ते, वैज्ञानिक, स्थापत्यविद्याविशारद, जादुगार अित्यादींनीं पाहिले. पण कोणालाहि त्याचा अुलगडा करतां येत नसे. अिंग्लंडमध्येहि हे प्रयोग होअून मोठमोठ्या वैज्ञानिकांनी याची कारणमीमांसा आपणाला देतां येत नाही अशी शरणचिठ्ठी दिलेली आहे. कित्येकांनी याना कल्पनेबाहेर पैसे देअू केले. पण त्याचे हे खेळ पैशासाठी नव्हते केवळ शास्त्रीय ज्ञानानें घटकाभर मौज म्हणून हे खेळ ते करीत असत. पुढे हे सर्व त्यांनी सोडून दिले. त्यानंतर त्यांनी मानवी जीव नि जीवित यांतील रहस्य अुलगडण्याचे प्रयत्नांत वेळ घालविला.

ते सांगतात कीं, हिंदुस्थानांत असतांना त्यांनी कांही वर्षे योगाचा अभ्यास केला नि चित्ताची अेकाग्रता करून अज्ञात गोष्टी जाणणें, लोकाच्या मनांतील सांगणें, यावर भर दिला त्याकरिता अुपासतापास, तपसाधने आदि करून चित्तैकाग्रता साधल्यानें त्याना थोडेबहुत यशहि त्यात प्राप्त झाले. पुढे ते स्वतःच्या पद्धतीनेंच अेकाग्रता साधूं लागले. त्यामुळें अेखाद्या माणसाचे अेक वा दोन्हीहि हात त्याच्या कपाळावर ठेवून त्याच्या मनातील मुख्य विचार कोणता हें ते सांगत असत. सन १८९६–९७ या वर्षी हे प्रयोग त्यानी पुष्कळ करून दाखविले नि त्यावेळची प्रशस्तिपत्रेहि त्याच्याजवळ आहेत. शेवटचा प्रयोग श्रीमंत सयाजीराव महाराज गायकवाड यांचे राजसभेत झाला. याचा परिणाम त्यांच्या मेंदूवर होअूं लागला. तशा प्रयोगानंतर त्यांचें डोके सणाणून दुखूं लागे. पुढें डॉक्टरांच्या सांगीवरून तो छंद त्यांनीं सोडून दिला नि मनःशक्तीचा अुपयोग ते शास्त्रीय शोध लावण्याकडे नि तत्वज्ञानविषयांकडे करूं लागले. कोणत्याहि विद्यालयांत त्यांनीं स्थापत्यशास्त्राचा अभ्यास केला नाहीं. परंतु ते प्रयत्न करण्यास लागण्यापूर्वी याच शास्त्रांतील संशोधकाना जे कूट सोडवितां आले नव्हते ते यंत्रविद्येतील शोध त्यांना अेखाद्या तत्वज्ञाप्रमाणें चटकन् अुकलून काढतां येत असत. त्यांच्या या त्वरित शोध लावण्याच्या प्रकारानें आश्चर्यान्वित होअून कांही तज्ज्ञ मित्रांनी "तुम्हाला हे असले स्वतंत्र शोध अगदी स्वतत्र बुद्धीनें सोडवितां येतात तरी कसे? अेखादा बुद्ध तुम्हाला साहय करतो कीं काय?" असें विचारावें. अेकचित्तत्व साधून सुसूत्र विचार कर-

ण्याच्या त्यांच्या मन:शक्तीवाचून कोणताहि बुद्धात्मा वा प्रेतात्मा त्यांच्या साहयाला धावून येत नसे. त्याचे कांहीं शोध स्वप्नस्थितींतहि लागलेले आहेत. परतु हा सर्व अतर्मन:शक्तीचा गुण असावा. "टाअिप कास्टिग मशीन" (मुद्रणालयातील खिळे पाडण्याचें यत्र) सारखे यंत्रविद्येतील शोधाव्यतिरिक्त विद्युद्शास्त्र, लोहचुंबकशास्त्र, रसायनशास्त्र आदिक शास्त्रांत त्यांनी अनेक शोध लावलेले आहेत.

"येथपर्यंत भोदू माध्यमांचे किवा हस्तलाघवी हस्तकांचे कौशल्य-कपट मला कसें अुमगना येते नि त्या दृष्टीने या विषयात अधिकृतरीत्या काहीअेक सागण्याचा माझा कितपत अधिकार आहे हे सागितल्यानंतर अुपरोक्त गोष्टी मला माहीत असूनहि-अनुभवास पटलेल्या असूनहि-हिदुस्थानांतल्या माझ्या वैयक्तिक दृष्टया या शास्त्राचें जे अनुभवपूर्वक ज्ञान झालें नि ज्यामुळें प्रेतात्मे मनुष्यप्राण्याशी सभाषण करू शकतात त्या गोष्टीविषयी माझी जी निश्चिति पटली आहे त्याकडे मी वळतो.

---

## १६ कांहीं विश्वासार्ह अनुभव.

(अ) **अनुभव १ लाः—** यासंबधी लहानपणीं जो अगदी प्रथम अनुभव आला त्या वेळी मी अगदी ११ वर्षांचा मुलगा होतों. मुंबअी अिलाख्यातील अेका जिल्हयांत माझे वडील दिवाणी कोर्टात न्यायाधीश होते. माझे अेक चुलते वडिलांशी वरकरणी चागले वागत असत. परंतु वडील अेवढया पदाला चढलेले मत्सराग्नीने सहन न होअून आमच्या कुटुंबाचा नाश करण्याच्या दुष्ट हेतूने त्यानी भूतबाधेचे प्रयोग करण्यास आरंभ केला. माझी सर्वांत थोरली बहिण त्यावेळी १४ वर्षांची असून सशक्त असतांहि अेकाअेकी आजारी पडली. दिवस असो, रात्र असो तिला अेक काळा मुलगा अेकदम दिसू लागे नि तो दिसेपर्यंत ती बेशुद्ध होअून मूर्च्छेत जाअी नि तिला बोलणेंहि अशक्य होअी. पुढें माझे धाकटे भाअूहि निरनिराळीं लक्षणें होअून आजारी पडले नि आमचें घर म्हणजे आजाऱ्यांचें रुग्णालय होअन बसलें. नामांकित डॉक्टर बोलावूनहि कित्येक महिने झाले तरी

अुतार म्हणून पडेना. कांही वेळेला असें घडे कीं, स्वयंपाकघरांत भात सिद्ध करून ठेवावा नि अेकाअेकी तो तांबडा पडून खाण्याला अयोग्य होअून जावा. हा सगळा प्रकार वडिलांना न अुमगणारा नि घोटाळ्यांत पाडणारा होअून वडील तर अगदी त्रासून गेले होते.

जेव्हां औषधी अुपाय करूनहि आराम पडेना तेव्हां ही भूतबाधा आहे असें समजून वडिलांनी कांही माध्यमांना या संबंधांत विचारण्यास आरंभ केला. तरी आराम वाटेना. परंतु अेके रात्री अेक चमत्कारीक प्रकार घडून आला. रात्रीची १० वाजण्याची वेळ होती. शेजारच्या खोलीत आअी नि वडिल अेका माध्यम बाअीशी बोलत होते. आतां तिच्या अंगांत येअून त्या अवस्थेंत ती त्यांना कांही सांगत होती. अद्याप मला कांही सांगतां यावयाचे नाहीं कीं अमक्या गोष्टीनी प्रेरणा झाली. पण मी अंथरुणावर ताडकन् अुठून बसलों नि अेकाअेकी तडक तसाच त्या बाअीकडे गेलों आणि अशी भोंदुगिरी करून फसविण्याच्या प्रयत्नासाठी तिची चागलीच कानअुघाडणी केली. त्या वेळीं वडिलांनाहि मीच प्रथम सागितलें की माझी बहीण नि भाअू आजारी पडले आहेत त्याचें कारण दुसरें तिसरें कांही नसून ज्याला तुम्ही सद्‌गुणी समजतां त्या माझ्या चुलत्यानें दुष्टावा करून आपल्यावर चेटुक केलें आहे. असल्या गोष्टीची वडिलाना कल्पनाहि नव्हती आणि प्रथम प्रथम तर त्यांचा विश्वासच बसेना. पण ते विशेष गोंधळून गेले होते कीं या पोराला ज्या गोष्टी समजावयाच्या नाहीत त्या गोष्टी हा अितक्या विस्तारानें वर्णन करून सांगतो कशा? मी त्यांना सांगितलें की आमच्या मुबअींतील घराजवळ अमक्या अमक्या ठिकाणीं करणी करून त्यांनी पुरून ठेवलेली आहे. मी सांगितल्याप्रमाणें तेथील नोकराला पत्र लिहून शोध करविला नि बरोबर त्याच स्थली ती गोष्ट त्याच्या आढळांत आली. आमच्या घरांत कोणालाच याची कल्पना नव्हती. ही चमत्कारिक शक्ति माझे भाअू नि बहीण पूर्णपणें बरे होअीपर्यंत जवळ जवळ तीन महिने माझे अंगांत संचार करित असे. या शक्तीचा विशेष असा होता कीं, ती अेकाअेकीं माझें अंगांत येअी, प्रत्येक वेळीं कांहीं क्षणच राहत असे. परंतु मौज अशी कीं, जरी असें अंगांत आलें नि त्यांत मी कांहीहि बडबडलों तरी त्याची मला पूर्ण जाणीव असे. मी

बोललेला शद्व न शद्व मला आठवत असे. माझ्याकडून सांगण्यांत आलेल्या कित्येक गोष्टी मी लहान मुलगा असल्यानें माझ्या बाल बुद्धीच्या आटोक्या-बाहेरच्या असत. परंतु माझ्या आओीबापांना त्यापासून पूर्ण बोध होत असे. माझी माझ्या वाचाशक्तीवर सत्ताच चालत नसे–माझ्या द्वारा दुसरा कोणी तरी धडधडा बोलत असे नि तें कशासंबंधी आहे हें मला समजत नसें. या प्रकारानंतर थोड्या मिनिटांनी मी पूर्णपणें स्वतःच्या भानावर आलों म्हणजे थोड्याच वेळापूर्वी हे असें कसें झालें–माझाच माझ्या शरीरावर दाब कसा राहिला नाही–याचें मला राहून राहून आश्चर्य वाटे. मन अुघडें करून सांगावयाचें तर हें कोडें अद्यापहि मला अुलगडलें नाहीं. माझी जाणीव जशीच्या तशीच राहूनहि शरीरावर कोणती शक्ति अेकाअेकी स्वामित्व गाजवीत असे याचें मला प्रामाणिक शास्त्रीय विवरण करतां यावयाचें नाही. अेवढेंच सांगू शकेन की, ती अेक अदृश्य शक्ति होती. विचार-संक्रमणांतला तो प्रकार असूं शकणार नाही. कारण त्यांतून बाहेर पडलेल्या गोष्टी वडिलांना वा दुसऱ्या कोणालाहि तेथें ठाअूक नव्हत्या.

मी न्यायाधीशांचा मुलगा असल्यानें माझ्या अंगीं संचारत असलेल्या त्या गूढ शक्तीची बातमी अल्पकालांत सर्वतोमुखी झाली आणि त्या जिल्हयांतील दूरदूरचे लोक हेतुपुरस्सर मला पाहण्यास येत असत. त्या अवस्थेंत असतांना मी त्यांच्या मागील गोष्टी बरोबर सांगत असे. अितकेंच नाही तर–पुढें होणाऱ्या गोष्टीहि सांगू शके नि त्या त्यांच्या प्रत्ययास येत असत. कांही माध्यमांनी वडिलांना सांगितलें होतें की याच्या अंगांत येत असलेला परलोकस्थ आत्मा अुच्च कोटीतला असून हेंच त्याची जाणीव राहण्याचें नि मागाहून गळाल्यासारखें न वाटण्याचें कारण असावें.

मी या देशांत (पाश्चिमीय) असतो तर माझ्या आओीबापांनीं यावर कितीतरी पैसा कमावला असता. परंतु हिंदुस्थानांत वातावरण निराळें आहे. हिंदु लोकांचा परलोकावर विश्वास असून या कल्पना धर्माशी नि आन्हिकाशीं निगडित झालेल्या आहेत. तरीहि अशा रीतीनें भुतें अंगात येण्याच्या गोष्टींना ते कधींहि अुत्तेजन देत नाहींत. कारण असल्या प्रकाराचीं कित्येक माणसें

हलक्या नि नीच भुतांचेटुकांचे हातीं लागून त्यांचेवर दुर्धर प्रसंग नि वेळी मरणहि ओढवण्याचा सभव असतो.

**अनुभव २ रा:—**त्या वेळेला मी साधारणत: १७ व्या वर्षांचा असेन. मुंबअीला आम्ही सगळी मंडळी अेकत्र राहत होतों. मुंबअीला माझे दोन जुळे भाअू असून त्या वेळी ते ११ वर्षांचे असावेत. ती मुले अगदी तान्ही होती तेव्हापासून आमच्या वडिलांनी सहादू या नांवाचा गडी ठेवला होता. ती मुलें पुढें ८ वर्षांची होअीपावेतों त्यानें त्याचा सांभाळ केला. पुढें त्यानें सैन्यांत नोकरी धरली. तेव्हा तो आम्हाला सोडून गेला. मे महिन्यातील अेके सकाळी, आम्ही सर्व घरची मंडळी घरामध्ये दुसऱ्या तळावर अेका खोलीत गोष्टी बोलत बसलों होतों. दोन्हीं जुळी भावडें जवळच खेळत होती. या वेळी सहादूची आठवण आम्हाला कशानें होणार? आमचें कांहीतरी घरगुती महत्वाच्या गोष्टीसंबधी बोलणें निघालेले होतें. अशा रीतीनें संभाषणाच्या भरात असतां मला अेकाअेकी माझ्यापासून साधारणत: १० फूट अंतरावर असलेल्या दरवाज्यांत अुभा असलेला आमचा पूर्वीचा गडी सहादू दिसला त्याची दृष्टि त्या दोन्ही मुलांवर खिळून गेलेली होती. मे महिन्यांतील दिवसाचा तो लख्ख प्रकाश पडलेला असल्याने मी त्याला निश्चित ओळखला. मी आपला त्याला "सहादू" म्हणून हांक मारतो आहे आणि "मुंबअीला केव्हां आलास" म्हणून विचारतोंहि आहे. मला 'सहादू' म्हणून म्हणताना अैकून अितर मंडळीहि तिकडे पाहूं लागली. तितक्या अवकाशांत सहादूनें माझ्याकडे अेक दृष्टिक्षेप केला नि तो अेकाअेकी दिसेनासा झाला. सहादूनें माझ्याकडे बघावें नि अुत्तर न देतां निघून जावें नि ज्यांचा त्याला अितका लळा लागला होता त्या मुलांनाहि तेथें तो आला असतां भेटूं नये याचा मला चमत्कार वाटला. मी ताडकन् अुठलों नि दरवाज्याकडे धांवलों पण सहादू तेथें होता कोठें? मला वाटलें जिन्याखालीं अितर चाकरांशीं बोलावयास तो गेला असेल. जिन्याखालीं खालच्या तळावर अेक चाकर दिवे पुसीत बसला होता. त्याला सहादूविषयी विचारतां त्याला सहादू आलेला वा गेलेला यांपैकीं कांहींच माहीत नव्हतें. मला मोठें आश्चर्य वाटलें. मी शपथेवर सांगेन कीं मी त्याला बरोबर पाहिला. यांत कसलाहि

भास होण्याचा वा सावली दिसण्याचा संभव मुळींच नव्हता. कारण अुन्हाळ्यांतील सकाळचा लख्ख प्रकाश पडला होता. विचारसंक्रमण वा कल्पनासाहचर्य अित्यादि जे कारणात्मक प्रकार समजले जातात त्यांनाहि तेथें थारा नव्हता. कारण आमचा निराळाच विषय चालला होता. त्यामुळें सहादूविषयी कोणाच्याच मनांत विचार येणे शक्य नव्हतें. तो कांही स्वप्नांतला प्रकार असूं शकणार नाही. कारण सहादूला मी हांका मारतो आहें, त्याच्याशी बोलतो आहें, हें सर्वांनीं अैकलें नि अवलोकिलें होतें. तेव्हां आम्ही तर्क बांधला की, सहादूचा जीवात्मा जडदेह धारण करून आपल्या प्रेमांतल्या लहान जुळ्या मुलांना पाहण्याला प्रकट झाला होता. मला ती आकृति दृग्गोचर होण्याचें कारण माझेमधील माध्यमाचे गुण माझ्यांत अंशतः अुरले होते. वडिलांनीं सहादूच्या भावाला पत्र लिहून शोध केला तेव्हां त्यांस अुत्तर आलें कीं, सहादूला मरून अकरा महिने झाले असून मरतांना तो मुलांची आठवण काढीत असे.

**अनुभव ३ राः**—माझी पहिली पत्नी हिंदुस्थानांतच १८९३ च्या जानेवारीत वारली. पाठीमागें तिची अेक ४ वर्षांची मुलगी होती. कांही महिन्यांनीं मी दुसरे लग्न केले. ती पत्नी साप्रत या देशांत ( अमेरिकेंत ) मजबरोबर आहे. त्यानंतर जी तीन वर्षें गेली, त्यांत ज्या ज्या वेळीं माझी दुसरी पत्नी मुंबअीत माझ्याजवळ असे तेव्हां तेव्हां तिची प्रकृति सुरेख राहत असे. परंतु जेव्हां ती मुंबअीपासूनच ३० मैलांवर असलेल्या आपल्या माहेरच्या गावीं जाअी त्या त्या वेळी ती हटकून आजारी पडावयाची आणि त्याला कांही दृश्य कारणहि नसावयाचें. तिच्या माहेरची मंडळी जाणून होती की, तिला माझ्या पहिल्या पत्नीपासून बाधा होत आहे. परंतु ही गोष्ट त्यांनी माझ्यापासून लपवून ठेविली होती. त्याला कारण येवढेंच कीं, त्यामुळें माझ्या भावना अुगीच दुखावयाच्या अथवा माझा त्यावर मुळींच विश्वास बसावयाचा नाहीं. कारण मी चांगला शिकला सवरलेला नि नुकताच अिंग्लंडहून आपली पहिली फेरी करून आलेला; आणि अिंग्लंडसारख्या जडवादी देशांत राहिलेल्यांमध्यें परलोकासंबंधीच्या गोष्टीवर ( त्यांच्या दृष्टीनें ) कोणता नि कोठचा विश्वास बसणार आहे ?

१८९७ च्या अुन्हाळ्यामध्यें (त्यावेळीं मी ३० वर्षांचा असेन) अेके दिवशी मी माझ्या पत्नीसह तिच्या माहेरीं गेलों नि तेथें दोन आठवडे राहण्याचा माझा बेत होता. जातांना ती अगदीं निरोगी आणि धडधाकट होती. परंतु दुसऱ्याच दिवशीं तिला ताप आला आणि त्याला कारण असें कांहीं नव्हतें. लगेच मी औषधी सुरू केली. परंतु आराम कोठचा पडतो? तेव्हां त्रासून जाअून मी तिच्या वडिलांजवळ मुंबअीला घेअून जाण्याची गोष्ट काढली. मी म्हटलें की मुंबअीस चांगल्या डॉक्टरांना तरी दाखवतां येअील. तेव्हां त्यांनीं भीत भीत माझ्या कानावर घातलें की, माझ्या पत्नीचें भूत तिला पछाडीत असल्याचें कांहीं मांत्रिकांकडून त्यांना कळलें असून तेथूनच ५० मैलांवर असलेल्या अेका देवळांत तोडगे केले जातात, तिकडेच घेअून जाणें चांगलें.

माझा परलोकविद्येवर पूर्ण विश्वास आहे ही गोष्ट माझ्या प्रथम पत्नीच्या पूर्ण परिचयाची होती. कारण येथें वर्णिल्याप्रमाणें तिला माझे त्यासंबंधीचे कांहीं व्यक्तिगत अनुभव माहितीतले होते. तिला हेंहि माहीत होतें कीं, मरणोत्तर प्रेतात्म्याचें काय होतें नि मृत मनुष्याचे अंत्य संस्कार, श्राद्धतर्पणें नि पुण्यतिथ्या करतो त्याचा त्या मृतात्म्याला परलोकीच्या प्रवासांत प्रगतिकारक असा कांहीं अुपयोग होत असतो काय अित्यादि गोष्टीचा शोध करून त्या जाणून घेण्याची माझी फार दिवसांची तीव्र अिच्छा आहे. शास्त्रीय संशोधक या नात्यानें मी तत्पोषक असे कांही पुरावेहि गोळा केले होते. तिचाहि परलोकावर विश्वास होता. तिचें दुखणें जेव्हां अति झालें होतें नि आपला अंतकाळ जवळ आला आहे असें तिनें जेव्हां जाणलें तेव्हां तिनें मरणोत्तर माझ्याशीं संभाषण करण्याचें नि परलोकस्थ आत्म्याला जर शक्य असेल तर माहिती गोळा करण्याचें कामांत साह्य करण्याचें मला अभिवचन दिलेलें होतें. माझ्या दुसऱ्या पत्नीला यांतलें कांहींच माहित नव्हतें. त्यावेळीं ती लहान म्हणजे (१७ वर्षांची) होती नि तिला असल्या गोष्टी सांगून अुगीच भिवविण्याचा माझा मानस नव्हता. घरांतल्याहि अितर मंडळींपैकीं कोणालाहि पत्नीनें दिलेल्या अभिवचनाची माहिती सांगितलेली नव्हती.

माझ्या श्वशुरांनीं जेव्हां माझ्या पत्नीच्या दुखण्याचें कारण मला सांगितले तेव्हां चटकन् माझ्या ध्यानी आलें की, माझी परलोकची पत्नीच हिच्या द्वारा माझ्याशी बोलण्याचा प्रयत्न करीत आहे, आणि मी वेळ न गमावतां बायकोसहित त्या देवळाची वाट धरली. हें देवालय समुद्रकिनाऱ्यावरील हरेश्वर नांवाच्या गावी होतें नि भूतबाधा झालेले दूरदूरचे लोक तेथें अुतार पाडून घेण्यासाठी येत असत. देवालयात त्याना दिवसातून तीन वेळां प्रार्थनेच्या नि पूजेच्या वेळेला अेका रांगेत बसविण्यांत येत असे. त्या वेळांत भूताला त्या माणसाचें अंगांत यावयास लावीत, त्यांना तें कां त्रास देत आहे हें सांगावयास लावीत, नतर त्याला हाकलून लावण्यांत येअी आणि पुन्हां याला केव्हांहि त्रास देणार नाही असें त्याचेकडून वचन घेण्यात येत असे. कांही गोष्टीत भूत पहिल्याच दिवशी अगांत प्रकट होत असे आणि कित्येक वेळां तर कित्येक दिवस दाद देत नसे.

माझी पत्नी नियमानें प्रार्थनेला अुपस्थित राहत असे. नंतर पांचव्या दिवशी तिच्या अगांत आलें. त्या वेळी माझी पत्नी बेशुद्ध पडली होती. पुढे काय प्रकार झाला हें तिला कांहीच समजले नाही. माझ्या प्रथम पत्नीचे जीवात्म्याने तिच्याकरवी आह्माला असे कळविलें की तुम्हीं दोघांनी तिच्यामागे राहिलेल्या लहान मुलीची काळजी घेण्याचें अभिवचन दिलें पाहिजे. तें झाल्यावाचून ती अशा रीतीने त्रास देण्याचें केव्हांहि थांबवणार नाही. मी तिला त्याप्रमाणे करण्याचें आश्वासन दिलें नि माझी बायको शुद्धीवर आल्यावर तसेंच करील अशी मी हमी भरली. त्यानंतर ती म्हणाली की पुन्हा अेकदां दुसऱ्याच दिवशी घरी गेल्यावर मी हिच्या अंगांत येणार आहे. परंतु देवळांत असतांना मात्र नाही कारण तिला कांही घरगुती व्यक्तिगत गोष्टी बोलावयाच्या होत्या.

दुसऱ्या दिवशीं घरी आल्यावर ठरलेल्या वेळीं तिचा जीवात्मा माझ्या द्वितीय पत्नीच्या अगांत आला आणि त्यावेळी माझे प्रथम पत्नीनें परलोकांतले कांहीं अनुभव मला सांगितले. त्याबरोबरच मी गोळा करीत असलेली माहिती बरोबर आहे कीं नाहीं? वचन दिल्याप्रमाणें माझ्याशी त्या लोकांतून संभाषण करण्यास वाट कां पाहिली? अित्यादि गोष्टीहि तिनें

विस्तारशः सांगितल्या. पुढें तिनें असेंहि सांगितलें की आतां यापुढें मी या बाअीला किंवा दुसऱ्या कोणालाहि अशा रीतीनें पीडा देणार नाहीं नि लवकरच मी पुन्हा मृत्युलोकीं जन्म घेणार आहे.

या प्रसंगानंतर माझी पत्नी लगेच त्या चमत्कारिक दुखण्यांतून अुठली नि तेव्हांपासून त्या निमित्तानें ती केव्हांहि आजारी पडली नाही किंवा तिच्या अंगांतहि आलें नाहीं. माझी अशी निश्चिति पटली की, माझ्याशीं बोलणारी माझी प्रथम पत्नीच होती. कारण तिनें ज्या व्यक्तिगत नि गौप्यांतल्या गोष्टी सांगितल्या त्यांची माझ्या दुसऱ्या पत्नीला गंधवार्ताहि नव्हती. सुदैवानें कर्मधर्मसंयोग जुळून जर मी या विषयावर पुस्तक लिहिलें तर (सुदैवानें डॉक्टरांचा असा अेक ग्रंथ अिंग्रजी हस्तलिखितांत लिहून झाला आहे.) तिचेकडून आलेले संदेश मी यांत आनंदाने अुद्धृत करीन. या शेवटच्या प्रसंगापासून पुढें तिचे संदेश मला येअू शकले नाहीत आणि तेव्हा मला असे वाटूं लागलें कीं ती पुन्हां या मृत्युलोकावर जन्म घेअून आली असावी. देवळांत जाण्याचा प्रसंग आल्याने कित्येक नव्या नव्या गोष्टी माझे पाहण्यांत आल्या. कित्येक लोकांची परलोकस्थ दुरात्म्यांकडून होणाऱ्या छळांतून प्रार्थनेच्या वेळीं मुक्तता झालेली मी अवलोकिली नि माध्यमाच्या शरीरांचा अुपयोग करून परलोकातल्या लोकांना मृत्यूलोकाशीं विचारविनिमय करितां येतो ही माझी समजूत दृढ होण्याला मला पुरावा अुपलब्ध झाला.

(आ) **मृत पिता मुलीच्या लग्नाला अुपस्थित झाल्याची घटनाः**—सन १९३५ जुलै ७ ला पाटणा नगरांत सर ज्वालाप्रसाद थिऑसफिकल हॉलमध्यें अेक मोठी सभा भरली होती. सभेला नगरांतील शिष्टसंभावित गृहस्थ पुष्कळ अुपस्थित होते. त्या प्रतिष्ठित नि विद्वानांच्या सभेंत सेवानिवृत्त सरकारी वकील रायबहादूर विनोदबिहारी मुजुमदार अेम्. अे. बी. अेल्. यांनीं आपल्या स्वतःच्या घरची नि स्वतःला आलेल्या असामान्य अनुभवांची घटना वर्णन करून सांगितली. ते म्हणाले "माझा वडील मुलगा भीषणपहारी हा १९२४ मध्यें वारला. गेल्या मार्चमध्यें त्याचे मुलीच्या म्हणजे माझ्या नातीच्या लग्नाचा समारंभ चालला असतां आपल्या अितर ६ स्नेह्यांसह तो प्रत्यक्ष येअून अुपस्थित झाला. त्या स्नेह्यांना तेथील असलेल्यांपैकीं वा प्रत्यक्ष मीहि

(रायबहादूर) ओळखूं शकलों नाहीं. या सातहि जणांनीं लग्नमुलीचे दुसरे बाजूस बसून आमच्या नि आमच्या कुटुंबियांचे समक्ष त्या समारंभांत भाग घेतला " मंडपाचे दुसरे बाजूला बसलेल्या आपल्या आअीस त्यानें हाक मारून कसें बोलावून घेतलें, तेथें अक्षता टाकणें अित्यादि क्रिया कशा केल्या, अित्यादि गोष्टी रायबहादुरांनीं अितक्या भावनाकुल होअून सांगितल्या कीं तेथें बसलेल्या आम्हा सर्वांच्या डोळ्याना अश्रू आले. अशा प्रत्यक्षपणें सर्वांसमक्ष मृतात्म्यांच्या भेटी झालेल्या घटना अत्यंत क्वचित् घडणाऱ्या असल्यामुळें असले पुरावे मिळणेंहि दुर्घट असतें. हें सर्व वृत्त 'अमृतबझार'मध्यें १८-७-३५ चे अंकी प्रसिद्धिलें आहे.

यापुढे आतांपर्यंत दिलेल्या पुराव्यांहूनहि अधिक प्रबलतर निर्विवाद पुरावे देण्यापूर्वीं येथे विविध देशांतील विविध कालच्या अनेकशः समाजांतील जनसाधारणाचा पूर्वकाली अमर अशा जीवात्म्यांच्या मरणोत्तर अस्तित्वा-वरील अभिमताचा पुरावा येथें अुल्लेखून ठेवणें अनाठायीं होणार नाहीं. लोकसमाजात या विषयासबंधी जी निश्चित ठाम मतें बनलेलीं असतात तीं त्या त्या समाजांतील तत्ववेत्ते, विचारक नि अध्यात्मवादी लोकांच्याच अुपदेशामुळे नि प्रतिपादित सिद्धातामुळें बनूं शकतात हे ध्यानांत घेतलें असतां सर्वत्र थोर थोर लोकांना ही गोष्ट कशी मान्य होती हें कळावयास सोपें जाअील.

(१) मुस्लीम मताचा मिश्र देशांत प्रादुर्भाव होण्यापूर्वीं त्या देशांत सर्वत्र पुनर्जन्मतत्वावर सर्व जनतेचा विश्वास होता. सर्व जनतेमध्यें अशा मताचा प्रादुर्भाव देशांतील तत्वज्ञ नि अध्यात्मवादीच करूं शकतात.

(२) ग्रीसचे प्राचीन दार्शनिक थेल्स, अंपिडौक्लीज, फिरिसाअिडस, प्लेटो, पायथागोरस आदिक तत्वज्ञ या आत्म्याचे अमरत्वतत्वावर नि पुनर्जन्म-सिध्दांतावर भर देणारे होते.

(३) रोमन जातीमध्यें सिसेरो, व्हर्जिल नि ओविड या कवींच्या कवितेमध्यें याच तत्वाचा पुरस्कार केलेला होता.

(४) प्रसिध्द योध्दा सीझर यानें असें अुल्लेखलें आहे कीं, "गॉल लोकांमध्यें पुनर्जन्मावर दृढ विश्वास होता. त्यामुळें त्यांच्यांत वीरावेश

अत्यंत प्रखर असून त्यांना मृत्यूची मुळीच भीति वाटत नसे." प्रसिध्द अितिहासकार गिबननें रोमच्या अितिहासावर जो अेक अितिहासग्रंथ लिहिला आहे त्यांत तो म्हणतो, "To the strength and fierceness of the barbarians they added a contempt for life, which was derived from a warm persuation of the immortality and transmigration of soul." (रोमन लोकांशी लढणाऱ्या लोकांना 'रानटी' हें अभिधान तो लावतो). "रानटी लोकांच्या सामर्थ्याला नि भयंकर आवेशाला या लोकींच्या जीवनविषयीचे तुच्छतेची जोड मिळाली होती कारण त्यांची आत्म्याचे अमरत्वावर नि जन्मपरपरेवर अत्यंत दृढ निष्ठा नि श्रध्दा होती."

(५) अमेरिकेंतील मेक्झिको, पेरु आदिक देशांतल्या पुरातन लोकात याच सिध्दांताचा प्रचार होता.

(६) 'रीअिनकारनेशन' पुस्तकाचा कर्ता वॉकर हा त्या पुस्तकात लिहितो, "युरोपात प्राचीन सर्व जातीमध्ये या सिध्दांताच्या सत्यतेवर दृढ विश्वास होता. द्रुअिड, सेल्ट, ब्रिटनमधील लोक अित्यादि जाति या सिध्दांतावर विश्वास ठेवणाऱ्या होत्या."

(७) जपान, चीन, सयाम, ब्रम्हदेश, तिबेट, अित्यादि देशातील लोक तर पूर्वकालापासून तों आतांपर्यंतहि याच सिध्दाताला मानणारे आहेत.

(८) हेगेल, शोपेनहोर, अिंग्लडमधील अर्वाचीन प्रख्यात तत्ववेत्ता ग्रीन आदिक पाश्चिमात्य प्रसिध्द दार्शनिक हे आत्म्याचें अमरत्व नि जन्ममरणपरंपरा प्रतिपादन करणारे आहेत.

हिंदुस्थानांत तर चार्वाकादिक कांही लोक सोडून प्रत्येक पंथाचे पुरस्कर्ते नि प्रवर्तक या सिध्दाताचे प्रतिपादन नि समर्थन करतात. हिंदुस्थानातील तत्ववाद्यांच्या नांवाची मालिका देण्याची आवश्यकताच नाही. जडवादाचा पुरस्कार करणारे पाश्चिमात्य देशातील वैज्ञानिक विचारक सुध्दां विचाराच्या परमसीमेला पोहोचण्याची खटपट करीत असतां शेवटीं जडामध्यें संवेदना नि संकल्पशक्ति ही सदासर्वदा अुपस्थित असतात म्हणूनच अेका

विशिष्ट धोरणानुसार क्रियाकरण चालू असतें असें त्यांना मान्य करावेंच लागतें. अितकेंच नव्हे तर आतां प्रगत विज्ञानवादी, "मनुष्य म्हणजे शरीर नव्हे–तो देहातीत जीवात्मा आहे नि हें जगत् जडमय नसून चैतन्यपूर्ण नि चैतन्यमय आहे, असें मानण्यापर्यंत येअून ठेपले आहेत हें पूर्वी आपण पाहिलेंच आहे आणि हें तेथें तेथें त्यांचे स्वतःचेच शब्दांत अुल्लेखलेलें आहे. आतां यापुढें सामान्यांनाहि अत्यंत प्रबलतम वाटणाऱ्या पुराव्यांचा प्रपंच करावयाचा आहे. खऱ्या विचारक नि विज्ञानशास्त्री लोकांपुढें यानंतर येणाऱ्या पुराव्यांपैकी अेखादा दुसरा पुरावा आला तरीहि प्रामाणिकपणें विचार करावयाचा तर तो त्यांना नाकारतां येणार नाही. अेक फळ पडलेले पाहून गुरुत्वाकर्षणाचा विश्वव्यापी नियम अुपलब्ध करणारा न्यूटन "तें अेकच अुदाहरण" म्हणून त्याज्य म्हणू शकला नाही. अेका अुदाहरणाचें कारण धुंडणे, ते कारण सर्व स्थळी लागू पडतें की नाही हें पाहणे, तें कारण खोटें ठरवून निराळे अधिक समर्पक कारण देतां येत नाही हे दिसणें, अितक्या गोष्टी झाल्यावर सापडलेलें कारण हेच विश्वव्यापी नियमाचें सत्यस्वरूप आहे हे ठरविणे ओघप्राप्तच आहे. तें नाकारणें म्हणजे अेक तर मूर्खता वा हटवादच ठरेल.

---

## १७ प्रबलतर कारणांचा प्रपंच

### पूर्वजन्मस्मृति.

प्रत्येक देशांत मधून मधून त्या त्या देशातील जातीच्या मनोरचनेनुसार कमी अधिक प्रमाणांत पूर्वजन्मस्मृति असल्याची अुदाहरणें सांपडतात. जी जाति अधिक सरळमनस्क नि कापटयहीन असेल त्या मानानें त्या जातींत ही स्मृति असल्याचीं अुदाहरणें अधिक दिसून येतात असें दिसतें. योगशास्त्रादिक भारतीय शास्त्रांत पुनर्जन्मस्मृति जागृत करण्याची जीं साधनें सांगितलीं आहेत त्यावरून कपटी, ढोंगी, मत्सरी, कृतघ्न, दुष्ट नि तत्समान अितर दुष्ट दुर्गुणांचा अभाव नि सरलता, निष्कपटीपणा, निर्भयता, कृतज्ञताबुद्धि, वीरवृत्ति अित्यादि गुणांच्यामुळें परिशुद्ध असलेलीं मनें ज्या जातीमध्यें

असतात त्या जातींत ही स्मृति अधिक प्रमाणांत जागृत होण्याचा संभव असतो. ब्रम्ही लोक हे पुष्कळ सरळमनस्क, निष्कपटी नि निर्भय मनाचे असतात. त्यांच्यांत अशी अुदाहरणें वारंवार दृष्टोत्पत्तीस येतात. ब्रम्हदेशचे राजांशीं ज्यावेळीं केवळ अपहारबुद्धीनें अिंग्लिशांनीं युद्धें केलीं नि शेवटीं तो देश त्यांचे साम्राज्याच्या पोटांत रिचवला गेला त्यावेळीं त्यांच्यामधील 'फीाल्डिंग हॉल' नांवाच्या अेका अिंग्लिश अधिकाऱ्यांनी 'The Soul of the People' दी सोल ऑफ दी पीपल' या नावाचें पुस्तक लिहिलें आहे. त्यांत त्या युद्धाचे वेळची राजकीय, धार्मिक, सामाजिक अित्यादि दृष्टीनें त्याच्या तेथील राहत्या काळांतील माहिती दिलेली आहे. ते तेथें असतां पुनर्जन्मस्मृतीची मुलें असल्याच्या पुष्कळ गोष्टी त्यांनी अैकल्यामुळें त्यांची सत्यासत्यता पाहण्याचा निश्चय करून कांही नव्या घटनांची चिकित्साबुद्धीनें पाहणी करून त्याविषयीच्या निर्भेळ सत्यतेची अुदाहरणें स्वत: पटवून नि पारखून घेतली. त्यापैकी कांही विशेष प्रकारच्या अुदाहरणांची सविस्तर माहिती त्यांचे वरील पुस्तकांत दिलेली आहे. जिज्ञासूनीं येथें दिलेल्या अुदाहरणांव्यतिरिक्त आणखी अधिक माहिती हवी असल्यास तें पुस्तक अवश्य बघावें. आम्हांला जी विशेष स्थळी घडलेली नि चिकित्सकांनी ज्यांच्या सत्यतेविषयीं निश्चिति पटवून घेतलेली आहे अशी कांही अुदाहरणें अुपलब्ध झालेली येथें द्यावयाची आहेत.

---

## १८ पूर्वजन्मस्मृतीचीं विश्वासार्ह अुदाहरणें

**घटना १ लीः—**भरतपूर संस्थानांत सालेमपुर नांवाच्या गांवी खैराती नांवाच्या ब्राम्हणाच्या प्रभु नांवाचे मुलाला पूर्वजन्मस्मृति झाल्याचें अुदाहरण दृष्टोत्पत्तीस आलें. त्या मुलाचें वय त्या वेळी ४ वर्षांचें होतें भरतपूरचे महाराजानें ती गोष्ट श्री. श्यामसुंदरलाल यांच्या निदर्शनाला आणून त्याची शोधना करावयाला सांगितली. १९२३ मध्यें नायब तहसिलदार यांनीं त्या मुलाचें वक्तव्य घेतलें. तो मुलगा सांगूं लागला, "माझ्या पूर्वजन्मीं मी हरबक्ष नांवाचा भरतपूर संस्थानांतील हथोंरी गांवचा ब्राम्हण होतों. मला धुरे नि

श्यामलाल नांवाचीं दोन मुलें आणि कोकिला नि भोली नांवाच्या दोन मुली होत्या. पूर्वीच्या मुलीच्या लग्नाचे वेळीं मी कांहीं पैसे घेतले होते पण दुसऱ्या मुलीचे लग्नाचे वेळी मी तसें कांहीं मनांत आणलें नाही. हत्योरी गांवी माझी अेक हवेली होती. स्वरूप जाटाचें घर माझ्या हवेलीलाच लागून होतें. त्याला अेक मुलगा नि अेक मुलगी होती. तेथें अेक बांधलेला पक्का दगडी मार्ग होता नि पक्कें अेक बाधीव तळें होतें. त्यांत अेक पक्कें घर बांधलेलें असून तळ्यावर अेक छत्री बांधलेली होती. त्या तळ्यांतील दुसऱ्या अेका घरावर घर होतें. गांवांत अेक पिंपळाचें झाड, जवळ असलेली पहारीवाली विहीर, दोन बोरीची झाडे असलेली कंकरवाली विहीर आणि तीन आंब्याची झाडें असलेली मूलियावाली विहीर अशा तीन विहीरी त्या गांवी होत्या. भोरे गावचा अेक गुजर माझा यजमान होता. त्या किल्यात अेक खोदलिपी आहे नि त्यांत अेक साप आहे. संवत् १९३४ (सन १८७८) मधील दुष्काळांत मी दोन बैलांची शेती करून होतों. मी, माझे वडील जिवत असतां, अेका बंगल्यांत वारलों. मरणानंतर मी काही थोडा काल देवलोकी राहिलों नंतर देवांनी मला मी मध्या आहे येथें जन्म घेण्यास सागितले. माझ्या बायकोचें नाव गंजी (डोक्याचे टकलावरून पडलेले नांव) नि माझ्या वडिलाचें नांव मुडे. माझे मामा बरगांवला असत. मूला जाट अेकदा आमच्या विहीरीत पडला नि मी त्याला वर काढून वांचवला होता."

महाराजांच्या व्यक्तिगत कारभाऱ्याकडे त्या नायब तहसिलदाराकडून हें वक्तव्य आलें. (हें सर्व सांगत असतां तो मुलगा मधून पोरपणानें हंसे नि अितर कांही बालिश बडबड करीत असे.) मी त्यांना सांगितलें कीं, त्या वक्तव्यार्ची पडताळ त्या स्थलीं जाअून पाहून घ्यावयास हवी. माझ्या सूचनेवरून तो मुलगा हत्योरीला तहसिलदारानें ता. २३ अेप्रील १८९३ मध्यें नेला. तेथून सर्व परिशोधनावरून त्यानें जें प्रतिवृत्त पाठवलें तें पहा:—

"महाराजांच्या कारभाऱ्यांकडून नि राजवाड्यांतील मंडळीकडून आलेल्या आज्ञेप्रमाणें मी त्या मुलाला (प्रभूला) घेअून बैलगाडींतून हत्योरीला गेलों. सूर्यास्ताच्या वेळीं आह्मीं तेथें पोहोंचलों. त्या गांवापासून थोडे

दूर अंतरावर गाडी थांबवून त्या मुलाला 'तें पक्कें नवें तळें कोठें आहे' म्हणून विचारलें. गांवचे खालचे भागाला तें नवें तळें आहे असें त्या मुलानें सांगितलें पण दिशा दाखविली नाही नि अंधार असल्यामुळें येथून तो दाखवूं शकला नाही. नंतर आह्मी गांवी गेलों नि रात्र तेथें बिऱ्हाडी काढली.

दुसरें दिवशीं सकाळी मी गांवचे प्रमुख स्थानिक बोलावून आणले.

(१) धर्मसिह फौजदार, वय वर्षे ६०.

(२) फौजदार अझमर्तसिंह—त्या गांवचे नंबरदार, वय वर्षें ५०.

(३) हरकात ब्राह्मण, वय वर्षें ४०.

गांवच्या त्या प्रमुखांपुढें त्या मुलाची परीक्षा घेतली. त्या मुलाने आपलें नांव हरबक्ष नि वडिलाचें नांव मुंडे होतें हें सांगितलें नि ते खरे ठरलें. नंतर तो ह्मणाला मला तीन भाअू होते. १ मी वारलो तेव्हां गिल्ला हा भाअू जिवंत होता. २ चुन्नी हा माझ्या मरणापूर्वीं वारला. तिसऱ्या भावाचें नांव आठवेना. मागाहून शोध करतां हरबक्ष (तो मुलगा) याला केवळ शिवबक्ष नांवाचा अेकच भाअू होता; चुन्नी नि गिल्ला हे चुलत भाअू होते, (त्याचे भोला नामक चुलत्याची मुलें) त्यापैकीं हरबक्षाने सांगितल्या-प्रमाणें चुन्नी हा आधी वारला होता असे आढळले. त्यानें सांगितलेल्य - आपल्याला श्यामलाल नि घुरे हे दोन मुलगे नि भोली नि कोकिल या दोन मुली होत्या, श्यामलाल माझ्यापूर्वीं वारला,—या सर्व गोष्टी बरोबर जुळल्या. आपल्या मुलीच्या लग्नाची पूर्वीं सांगितलेली माहिती सुद्धां अगदीं बारीक सारीक गोष्टीतहि बरोबर ठरली. हत्योरीला अेक पक्की हवेली होती. दगडी बांधीव रस्ता होता. शेजारीं स्वरूप जाट राहत होता. त्याला अेक मुलगा नि मुलगी होती. या त्यानें सांगितलेल्या गोष्टी बरोबर जुळल्या. हवेली आतां पडून गेली आहे. टेंकडीवरून येणारा तो रस्ताहि गांवा-पर्यंत आलेला आहे. त्यानें वर सांगितलेली कंकरवाली विहीर आतां कोरडी पडून अुपयोगांतून गेलेली आहे. हरबक्षाचे वेळीं सुद्धां तशीच होती. पूर्वीं तेथें बोरीचीं झाडें होतीं असें कळतें. तेथे सध्यां पिंपळाचें झाड

आहे. जस्त्रोयवाला विहीरीजवळ (मुलियावाला) पिंपळ नि आंब्याचीं झाडें मुलानें सांगितल्याप्रमाणें होतीं. पहारेवाली विहीरीजवळ पिंपळाचीं झाडें आहेत. या सर्व गोष्टी अगदी बरोबर जुळल्या. मी वडिलांचे समक्ष वारलों आणि गांवाबाहेर त्यांचा बंगला होता या गोष्टी जुळल्या नाहीत. तहसिलदाराच्या परिशोधनांत हरबक्ष गावांतील घरांत नि वडिलांमागून वारला असें दिसून आलें. दोन बैलांसह माझ्या शेतांत दुष्काळांत मी शेती करीत असें ही गोष्ट तंतोतत बरोबर ठरली. बायकोचें नांव गौवन होतें पण टक्कऊ पडल्यामुळे गजी नाव ठेवले होते हें खरें आहे. तेथें तो पुरोहित होता हेंहि खरे झाले. त्याचा मुलगा अद्याप त्याच गांवात पुजारी आहे. अितर गोष्टी सुद्धा बरोबर ठरल्या. त्याला त्याच्या घराकडे नेला. पहिल्यानें घराच्या रस्त्याचा थोडासा घोटाळा झाला पण लवकरच घराचा नीट रस्ता घेअून घरी गेला नि आपल्या पूर्वजन्मीचा मुलगा घुरे याचा हात धरला. त्याचे निकट सबध्याचीच नावे त्याला आठवत होती. गांवातील अितरांचीं नावे त्याला आठवली नाहीत." शेवटी तहसिलदार आपले प्रतिवृत्तांत ह्मणाला की, मुलाला पढविलेलें नसून त्यानें खरोखरीच पूर्वजन्मीच्या स्मृतीच्या आठवणीप्रमाणें आठवलेलें सागितले नि बहुतेक तें सर्व खरें ठरलें. नंतर नव्या जन्मांतील बापाची साक्ष घेतली. त्याच्या मुलाला पूर्वजन्मीची आठवण कधी नि कशी झाली नि त्या गांवी हत्योरीची माहिती असलेले कोणी आहेत काय? असें विचारले. पुढीलप्रमाणे बापाचें वक्तव्य आहेः——

खेरातीचे वक्तव्यांत तो म्हणतो, "अेकाअेकी मुलाला आठवण झाली नि ह्मणू लागला की, माझी मुले कष्टात आहेत. मी जाअून त्यांना खांद्यावर घेअून येतो. त्याला 'तुझीं मुलें कोठें आहेत? अुगीच कांहीतरी बडबडतोस' —असें म्हणून चूप केलें. आअीनें लोणी दिले तेव्हा म्हणाला 'काय कंजूषपणें लोणी दिले आहे. माझी पूर्वीची आअी खूप लोणी देत असे.' आअीनें तुझी पूर्वीची आअी कोठें होती म्हणून विचारतां 'हत्योरीला होती, माझें नांव हरबक्ष. मला प्रभु म्हणूं नका' असें म्हणाला. पुढें अेके दिवशीं आअीजवळ निजला असतां अेकाअेकीं दचकून अुद्गारला, 'अरे रामा! माझीं मुलें कष्टांत आहेत'. मी हत्योरीला कधीं गेलों नाहीं अथवा माझा त्या गांवाशीं

कांहीं संबंध नाहीं. मी प्रभूचा पिता आहे. मुलानें आपली पूर्वजन्मस्मृतीची गोष्ट मला नि त्याचे आईला पहिल्यानें सांगितली. पत्रिकेवरून पाहतां मूल त्यावेळीं ४ वर्षें ७ महिने १८ दिवसांचें होतें" **श्यामसुंदरलाल**

**घटना २ री.** यापुढें कडक शोधानें पूर्ण विश्वसनीय ठरलेल्या अशा घटना यावयाच्या आहेत. या घटनांच्या सत्यतेच्या सिद्धयर्थ परिशोधकांनीं चिकित्सापूर्वक त्या त्या घटना शक्य त्या प्रकारानें शास्त्रीय पद्धतीनें पडताळून पाहिल्या आहेत नि म्हणून त्यासंबंधीं जी प्रतिवृत्तें प्रसिद्ध झालीं आहेत, त्यांपैकीं कांहीच्या संपूर्ण प्रतिवृत्तांसह त्या घटना खाली दिलेल्या आहेत.

## जगदीशचंद्राचें वृत्त

# मृत्यूनंतर पुनर्जन्माची घटना.

**बरेली (युक्तप्रांत) नगरचे श्री कैकेयीनंदन सहाय बी. अे., अेल् अेल्. बी. हायकोर्ट वकील यांनीं जें प्रतिवृत्त प्रसिद्ध केलें आहे तें येणेंप्रमाणें:—**

"मी काल ग्रामी गेलों असतां घरी पत्नी फार आजारी असल्याचें वृत्त मला कळविलें गेलें. ता. ६ जून १९२६ या दिवशीं घरीं आलों नि न्यायालयांत न जातां सारखा ६ दिवस घरींच होतों. माझ्या पत्नीला फार ताप होता आणि तो कमी व्हावयाला बरेच दिवस लागले. मी ज्या दिवशीं घरी आलों त्या दिवशीं ह्मणजे ६ तारखेला जगदीशचंद्र यानें मला मोटारगाडी आणावयास सांगितली. लवकरच गाडी आणीन असें मी त्याला सांगितलें. तें मूल फार अुतावळें झालें आणि गाडी आणण्याविषयीं फार आग्रह करूं लागलें असतां 'आतां कुठून आणणार' ह्मणून मी त्याला ह्मणालों. तो ह्मणाला 'माझी मोटार घेअून या. ती गाडी बाबूआजींच्या घरीं आहे.' मी त्याला विचारतां तो ह्मणाला कीं, ते बाबूआजी श्री काशीस राहतात नि माझे वडील आहेत. त्याला आणखी

कांहीं गोष्टी विचारून मग मी त्या वृत्ताचें पत्र प्रयागच्या 'लीडर' पत्राला पाठविलें नि तें ता. २० च्या जूनला प्रसिद्ध झालें.

## पूर्वजन्माची विलक्षण कथा

## श्री काशीचे बाबुआजी पांडे यांचेकडे शोध

श्रीयुत संपादक, लीडर यांस,

आपल्या माननीय पत्री शक्य तितक्या लवकर जर ही विलक्षण गोष्ट प्रसिद्ध कराल तर मी आपला फार आभारी होओीन.

माझा ३॥ वर्षांचा मुलगा जगदीशचद्र हा आपल्या पूर्वजन्मीचें वृत्त अगदी सुसंगतपणे सागत आहे. आपल्या पित्याचें नांव बाबूआजी पांडे नि राहण्याचें स्थल श्री काशी आहे असें सांगून श्री काशीमधील घराचें वर्णन सांगत आहे. विशेषतः घराच्या पुढचे मोठे फाटक, बैठकघर आणि तळघरांतील भिंतीत बसवलेली अेक मोठी तिजोरी यांचे वर्णन विशेष प्रकारें देतो. बाबुआजीच्या बसत्या खोलीचें वर्णन नि बाबूआजी आणि भाग पिण्याकरितां जमणारी मंडळी यांचे वर्णन तो विस्ताराने देतो. बाबुआजी अंगाचें समर्दन (मालीश) कसे करून घेतात, सकाळी तोंड धुण्याआधी अेक प्रकारची पूड वा माती तोंडास कशी फासतात हें सांगतो. दोन मोटारी, अेक बैलांचे जोडीची गाडी घरी आहे. बाबूआजीला अेक पत्नी नि दोन मुलें होती पण तीं सर्व मंडळी वारली. तो घरच्या पुष्कळ गोष्टीचे वर्णन करतो. श्री काशीला माझे स्नेही वा परिचित असें कोणी नाहीं वा माझ्या पत्नीच्या परिचयाचें कोणी नाही. बाबूआजीसंबंधीची माहिती यापूर्वींची मला कांहींच नाहीं. बरेलीच्या प्रमुख गृहस्थांनीं माझ्या घरीं येअून त्या मुलाशीं संभाषण केलें नि प्रश्न विचारून पुष्कळशा गोष्टी आणखी माहित करून घेतल्या. त्या मंडळींचीं नांवें येणेंप्रमाणें:—

**(१) बाबू ब्रम्हनारायण, बी. अे. अेल् अेल्. बी. वकील, म्यु. कमिश्नर. (२) बाबू मुकुट बिहारीलल बी. अे. अेल् अेल्. बी. वकील. (३) पं.**

रामस्वरूप शर्मा बी. अे. अेल् अेल्. बी. वकील. (४) बाबू शैलबिहारी कपूर, बी. अे. अेल् अेल्. बी. वकील नि भूतपूर्व विधिमंडळसभासद (M. L. C.) (५) रायसाहेब डॉ. श्यामस्वरूप सत्यव्रत (L. M. S.) (६) सय्यद युसूफअली बी. अे., अेल् अेल्. बी. वकील, म्यु. कमिशनर. ज्यांना ज्यांना या गोष्टीचें सत्यस्वरूप जाणण्याची अिच्छा आहे, त्यांनी त्यांनी विचिकित्सक पद्धतीनें या गोष्टीची सत्यता परीक्षिण्यासाठी यावें अशी माझी विनंति आहे.

**कैकेयीनंदन सहाय, वकील बरेली.**

## पत्र दुसरें

बरेली (युक्तप्रांत).

पुढील पत्र मी प्रसिध्यर्थ पाठविले तें ता. ५ जुलै १९३६ ला प्रसिद्ध झालेलें आहे.

# पूर्वजन्मवृत्ताच्या समर्थनाचा पुरावा.

श्रीयुत संपादक, लीडर यांस,

आपल्या सुप्रसिद्ध पत्री पुढील वृत्त अगदी लवकरच्या अंकीं प्रसिद्ध कराल तर फार आभारी होअीन.

जगदीशश्चंद्र–माझा मुलगा–यानें सांगितलेलें आपल्या पूर्वजन्माचे वृत्त आपल्या पत्रीं पूर्वी प्रसिद्ध झाल्यावरून पुष्कळांनीं मजकडे विचारणापत्रें पाठवून माहिती विचारली. अगदीं विचिकित्सक पद्धतीनें या गोष्टीची सत्यासत्यता निर्धारित व्हावी ह्मणून पुढील व्यवस्था केली आहे.

त्या मुलानें आपलें पूर्वजन्मवृत्त ता. ६ पासून सांगावयाला आरंभ केला. तेव्हांपासून सवडीसवडीनें सर्व विचारून घेण्यास ता. ११ पर्यंत दिवस लागले. नंतर मी बरेलीच्या वकील नि अितर मंडळीना सांगून या

गोष्टींचा पडताळा पाहा नि यापुढें विशेष परिशोधना करण्याच्या योग्यतेची ही घटना आहे किंवा नाहीं याचा निर्णय करा असें सांगितलें. त्याप्रमाणें वकील नि अितर मंडळी यांनी त्या मुलाला निरनिराळ्या प्रकारें विचारून नि बोलून सर्वांनी असे ठरविलें कीं याहून या गोष्टीची अधिक परिशोधना करणें अवश्य आहे. त्याचप्रमाणें हेहि ठरले की संशयी मनांना संशयाला जागा राहूं नये ह्मणून श्री काशीला येथून कोणी मनुष्य पाठवू नये. कोणी मनुष्य गेला तर त्या मनुष्यानें तेथील घरादिकांचें वृत्त त्या मुलाला सांगून पढवून ठेवलें असे वाटण्याचा संभव आहे ह्मणून श्री काशीच्या नगरसंस्थेच्या समितीचे अध्यक्षांना (म्यु. बोर्डाचे अध्यक्ष) पत्र पाठवावें नि त्याचें अुत्तर आल्यावर वर्तमानपत्राकडे बातमीपत्रें पाठवावी. मी हिंदुस्थानांतील काहीं पुढाऱ्यांना पत्रें पाठवून त्यांनी आपले प्रतिनिधि पाठवावे म्हणजे ते मुलाला श्री काशीला घेअून जातील आणि अगदी निर्विवाद नि शंकारहित रीतीनें तेथें त्याचें करवी सर्व गोष्टी खऱ्या खोट्या पडताळून पाहाव्यात असें कळविलें. त्या मुलानें सांगितलेल्या गोष्टी अगदी अपरिचित अशा गृहस्थांना पत्रें पाठवून शोध करविल्यानंतर बरोबर पडताळल्या गेल्या नि त्यावरून मला वाटतें कीं, त्या मुलाला तेथें नेल्यास तो पुष्कळ गोष्टी प्रत्यक्ष दाखवील आणि विचक्षण परिशोधकांची निश्चिति पटवील. आलेल्या पत्रांतील अेक अुतारा खाली देत आहें.

**मुनशी महादेवप्रसाद अेम्. अे., अेल् अेल्. बी. ॲडव्होकेट, चेअरमन म्युनिसिपल बोर्ड–काशी लिहितातः—**

'तुमचें पत्र आल्यावर आवश्यक वाटलें तितकें परिशोधन नि विचारणा केल्या आणि तुमच्या मुलानें सांगितलेल्या बहुतेक सर्व गोष्टी अगदीं बरोबर ठरल्या आहेत. खरें म्हणावें तर बाबूआजी पांडे यांचा मुलगा जयगोपाल २-२॥ वर्षांपूर्वीं वारला. या गोष्टींतील सत्यतेव्यतिरिक्त बाकी गोष्टी अगदीं बरोबर ठरल्या. फैटन, अेक्का, घोडा, संमर्दन (मालीश), गुंड लोक, भांग नि अितर सर्व गोष्टी खऱ्या ठरल्या. बाबूआजी पांडे हे माझे पक्षकार असल्यामुळें माझे चांगले परिचयाचे आहेत नि तुमच्या पत्रांतील तुमच्या मुलाचें

वृत्त वाचतांच तेच हे आमचे बाबूआजी पांडे हें माझे तेव्हांच ध्यानीं आलें. म्हणून माझा मनुष्य मी बाबूआजी पांडे यांचेकडे पाठवून आवश्यक ती विचारणा केली. त्यांना नि त्यांचे मंडळींना ही गोष्ट कळल्यावरून मजकडे येअून ते तें पत्र घेअून गेले. आतां कदाचित् ती मंडळी बरेलीला येअून त्या वृत्तांताचा पडताळा पाहण्यासाठीं तुमच्याकडे स्वतः येतील. बाबूआजी हे येथें पं. मथुराप्रसाद पांडे या नांवानें सर्वांना ठाअूक असून श्री काशीला पांडेघाटावर राहतात.

## पं. अुमाकांत पांडे वकील—श्री काशी लिहितातः—

"लीडरमध्यें प्रसिद्ध झालेलें तुमचें पत्र पाहिलें. बाबूआजी पांडे हे माझे स्नेही आहेत. तुमच्या येथें ज्याचा जन्म झाला तो मुलगा पूर्वी येथें पाहिला आहे. त्यानें दिलेल्या वर्णनापैकी बहुतेक सर्व मुख्य भाग अगदी बरोबर आहे. पाडेजीची स्वतःची मोटर नाही तरीपण अेक दोन मोटारीचा ते अुपयोग करीत असत. मी त्यांना हें सर्व सांगून ते नि मी मिळून तुमच्या मुलाला पाहावयास लवकरच येअू."

माझ्या मुलाचा जन्म ता. ५ मार्च १९२३ या दिवशी झाला. जयमंगल नि जयगोपाल या बाबूआजीच्या दोन मुलाच्या मृत्युदिनांची नोंद श्री काशी नगरसंस्थेच्या समिति–अध्यक्षांकडून आणविली आणि बरेलीच्या नगरसंस्थेकडून जन्मदिनाची नोंद आणविली आहे. या दोन मृत्यूदिनांची नि जन्मदिनांची तुलना शास्त्रीय वृत्तीच्या परिशोधकाला विशेष विचारणीय वाटेल. अशी स्मृति फार थोडा काळ टिकते असें वृद्धलोक सागत असल्यामुळें मी ह्या संबंधांत फार लवकर परिशोधन व्हावें म्हणून घाअी करीत आहें.

सध्यां माझे मुलाला सर्व आठवतें आहे. संभव आहे कीं, कांहीं कालानें ही त्याची स्मृति लुप्त होअील.

बरेली ३० जून १९२६ **कैकेयीनंदन सहाय, हायकोर्ट वकील.**

वर्तमानपत्रीं वरील पत्र प्रसिद्ध झाल्यावर या गोष्टीकडे जनतेचें लक्ष फार ओढलें गेलें. पुरे दोन महिने होअीपावेतों प्रत्यहीं सकाळसंध्याकाळ

मुलाचे तोंडून त्याचें वृत्त अैकून घेण्यासाठीं पुष्कळ मंडळी येत असत. त्या मुलाला याचा अत्यंत कंटाळा आला आहे आणि जमलेल्या मंडळीपुढें कांहीहि बोलण्याचें तो नाकारू लागला. यासाठी श्री काशीचे कलेक्टर श्री. व्ही. अेन्. मेथा याना मी काशीला त्या मुलाला घेअून जाण्याचें ठरण्यापूर्वीं मला तेथें साह्य देण्यासाठी लिहिलें. कारण खूप झुंड जमल्यानें तें मूल गोंधळून जाण्याची शका मला वाटूं लागली. कलेक्टरनी साह्य देण्याचें अभिवचन दिलें. मी ता. १३ आगस्टला तिसरे प्रहरी श्री काशीला जाण्यासाठीं निघालों नि तेथें दुसऱ्या दिवशीं सकाळीं पोहोंचलों. मी माझ्या जाण्याची बातमी पूर्वीं दिली नाही नि बाबूआजी पांडे यांचे घरापासून २॥ मैलांवर नंदेश्वरास राहिलों. मला वाटलें कीं लोकांच्या झुंडीचा त्रास मला होणार नाही. पण दुर्दैवानें ती बातमी फुटली नि अगदीं सकाळपासून घराशी झुंड जमू लागली. लोकांना दूर ठेवावयाला पोलिसचें साह्य मागावें लागलें नि पुढें पोलिस असून सुद्धा लोकसमुदाय तेथून गेला नाही. बी. हनुमानप्रसाद सब-जज, डॉ. गणेशप्रसाद, श्री. टंडन 'अिनकम टॅक्स' अधिकारी आणि इतर माननीय गृहस्थ आम्हाला भेटावयास आले. पंडित लक्ष्मीकात पाडेहि आमचे भेटीसाठी आले. त्या मुलानें त्यांना पडित पांडे म्हणून ओळखले. पहिल्याने मुलानें त्याना 'अुमाकांत' म्हणून म्हटलें. त्यांनीं नाकारल्यावर मग तो मुलगा म्हणाला की तर मग 'लक्ष्मीकात' आहांत. हे अुमाकांत नि लक्ष्मीकात दोघे भाअू असून अगदी सारख्या तोंडावळ्याचे आहेत. त्या वेळी घराभोवती साधारणतः शभर अेक प्रेक्षक अुभे होते.

त्या मुलाने लक्ष्मीकाताचें बाबूआजीशी असलेलें नाते जवळ जवळ बरोबर सांगितलें. सध्याकाळी कलेक्टर व्ही. अेन्. मेथा, नगरकोतवाल नि आठ शिपाअी घेअून बाबुआजी पांडे यांचे घरी मी पोहोंचलों. बाबुआजी पाडे याचें घर गंगाकाठी असून तेथून राजमार्ग सुमारें २ फर्लांग दूर होता. तेथून घरी जाण्याला गल्ल्यांचे जाळ्यांतून जावे लागते. त्या वाकड्यातिकड्या विविध गल्ल्यांतून जाण्याचा मार्ग (गल्ली नि गल्ली) तो मुलगा दाखवीत असे. त्या त्या गल्लीनें मंडळी जाअून घरीं पोहोंचली. घरीं पोहोंचण्याचे सुमारास तेथें हजारावर माणसें पोहोंचलीं होती. ज्या खोलींत

बाबुआजी पांडे बसले होते त्या खोलींत भुओवर अगदीं दाटीदाटीनें ३५ माणसें बसली होतीं. त्या मुलाला कसेंसेंच वाटून त्यानें अुत्तर देण्याचें नाकारलें. अितर महत्वाच्या कामासाठीं श्री. मेथा काही मिनीटांनी गेले. नंतर त्या मुलाला घरात नेलें तेव्हा तेथोल भांग घोटावयाची जागा त्या मुलानें दाखविली. यानंतर सौ. मेथा (कलेक्टरीण बाओी) या परत गेल्या. त्या मुलाला मग अंतर्गृहात नेले. त्यानें चाचीला (काकूला) ओळखले नि त्यानें मी तुझ्या घरीं आलो आहे असे तिला सांगितलें.

पुष्कळ वेळपर्यंत भोंवतालील गर्दी कमी न झाल्यामुळें मुलाला पुन्हां अेकदां दुसऱ्या कोणत्या तरी दिवशी अगदी गुप्तपणें कोणासहि बातमी न देतां आणावयाचें ठरवून आम्ही परत गेलों मग ता. १८ ला मगळवारी तिसरे प्रहरी बाबुआजी पांडे याचे घरी त्या मुलाला नेले. श्री काशीला 'दुर्गाजोका मेला' नांवाची एक स्थानिक यात्रा होती. त्यामुळे बहुतेक लोकसमूह तिकडे गेलेला होता. जगदीश मग बाबूआजीला बोलला. सर्व पूर्ववृत्त सांगितले नि तुम्हाला कांही आणखी प्रश्न विचारावेसे वाटले तर विचारा म्हणून म्हणाला. पण त्यानीं कांही प्रश्न विचारले नाहीत.

त्या मुलाला दशाश्वमेध घाटाकडे नेले. त्याने दशाश्वमेध घाट दिसू लागतांच दुरूनच तो ओळखला. तेथें गेल्यावर अेका पंड्याला ओळखले नि त्याचे हातानें आपल्याला धरवून त्यानें आनंदानें दोन वेळां गंगास्नान केलें. आगस्ट महिन्यांतील भयंकर नाद करणाऱ्या श्री गंगेच्या पुराला पाहून तो गांगरला नाही. पूर आलेल्या गंगाप्रवाहाचें त्याला मुळीच कांही न वाटता जणू कांहीं त्या दृश्याशीं परिचय असल्याप्रमाणें तो वागला. पंड्यानें त्याला विडा दिला पण स्वतः तो मोठा पंड्या असल्यामुळें लहान पंड्याकडून विडा घेण्याचें त्यानें नाकारलें. त्या मुलानें श्री विश्वनाथ मंदिर, हरिश्चंद्र घाट नि डफरिन पूल हीं ओळखलीं. बरेलीला असतांनाच तेथील डि. पो. सुपरिंटेंडेंट जे. नाटबावरजवळ या पुलाचा अुल्लेख त्यानें केलेला होता. त्याला श्री काशी हिंदु विश्वविद्यालयामध्यें नेलें. त्याला तो विश्वविद्यालय म्हणाला नि सांगितलें कीं, माझ्या पूर्वायुष्याचे वेळीं हें बांधलें जात होतें. पं. लक्ष्मीकांत पांडे बी. अ., अेल् अेल्. बी. वकील श्री काशी यांनीं आपण होअून पत्र-

व्यवहारानें परिचय करून घेतला नि कळविले की, बाबूआजी पांडे यांचे शेजारी मी राहत असल्यामुळें मला त्या पूर्वजन्मीच्या मुलासबंधी सर्व माहिती आहे. श्री काशीस जाण्यापूर्वी पुढील गोष्टी त्याना लिहिल्या होत्या नि त्या बरोबर असल्याचे त्याचेकडून कळले होते. त्या येणेप्रमाणे.–

(१) बाबूआजीचे पत्नीस 'चाची' (काकू) म्हणतात. (२) पाडेजीना नोकर ठेवण्याची शक्ति होती तरी सर्व कुटुंबाचा स्वयपाक स्वत: चाची करीत असत. (३) घरातील त्या जरी सर्वात वडील होत्या तरी त्या पडदा वापरीत नि तोंडावर लाव बुरखा ओढीत. घरात पांडेजीचे गुंड लोक आले म्हणजे चाची तोडावर बुरखा ओढून घेत असे असे जगदीश म्हणाला. (४) चाची हातात नि कानात सोन्याचे अलकार वापरीत. (५) चाचीचे तोंडावर देवीचे वण होते आणि ही गोष्ट बचूकडून खरी असल्याचें कळते. (६) बाबूआजीला रबडी (हलवायाचे घरी बासुंदी करतात त्याला तिकडे रबडी असे म्हणतात) आवडत असे. (७) बाबूआजी प्रत्येक दिवशी विष (अफू) घेत असत. (८) बाबूआजी हाताचे बोटात सोन्याच्या मुद्या घालीत असत. (९) बाबूआजीचा मुलगा जयमगल हा विषाने वारला आणि त्याप्रमाणे त्याचे मृत्यूचे वेळी सर्वांना शका आली होती. बाबूआजीच्या पत्नीने बचू नावाचा मनुष्य बरेलीला पाठविला होता नि त्याचे करवीं मुलाला बघण्याकरिता घेऊन येण्याचे आमत्रण दिले. त्यापूर्वी बाबूआजीकडून सुद्धां त्याचकरिता कित्येक पत्रे आलेली होती. त्या मुलाशी बचूचें बोलणें झालें. त्यात बचूने पुढील गोष्टी खऱ्या असल्याचे सांगितलें:–(१) बाबूआजी तोंड धुण्याचे वेळी तोंडाला राख फासीत असत. (२) भिंतीमध्यें तिजोरी बसविलेली आहे. (३) भगवतिया वेश्या निरनिराळ्या कौटुंबिक समारंभाचे वेळी गाण्याला नि नाचण्याला येत असे. जगदीशनें सांगितल्याप्रमाणें तिचा सूर मोठा आहे नि वर्ण श्यामल आहे हें बरोबर आहे असें त्यानें मान्य केलें.

---

# पुरवणी

जगदीशचंद्र याचें वक्तव्य बरेलीचे 'फर्स्ट क्लास' मॅजिस्ट्रेट श्री. रामबाबू सक्सेना अेम् अे, अेल् अेल्. बी. यांचेपुढें ता. २८ जुलै १९२६ ला झालें होतें. त्यांतून कांही भाग पुढे दिला आहे:—"मेरा नाम जयगोपाल है. मेरे बापका नाम बाबू पांडे. नगरका नाम श्री काशी (बनारस). गंगाजी मेरे घरके समीप है. जैसा फाटक खारपुरमे है वैसा अुसका फाटक है. मेरा भाअी जयमंगल था. वह मुझसे बडा था. वह विष खाकर मर गया. चाचीने जयमंगलको कै (अुलटी) करायी थी. मैं बाबूआजी पांडे को बाबू पांडे कहता हूं. चाचा नही कहता हूं. बाबू पांडेका पैसा लोहेके अलमारीमे (तिजोरी) रहता है. वह बाये हातके तरफ है. वह दिवारमें (भितींत) लगा है. वह गढ्ढेमे है. बहुत अुचा है. बाबूजीको रबडी बहुत पसत है. शामको लोक भांग पीते है. जब बाबूजी मूह धोते है तब अपने मुखपर मिट्टीकी मालीश करते है. अुनके पास सवारी फैटन है (बसण्याची गाडी), और मोटारगाडी है. चाची सोनेके करे पेहेनती है. कानोमे बूंदे (अेक सोनेरी अलंकार) पेहेनती है. बाबूजी अंगूठी पेहनते है. चाची वहोत बडा घुंगट करती है. दशाश्वमेध घाट है. गंगाजी अुसके पास है. चाची रोटी करती है. मैं तिकोनी (लंगोट) पहिनके नहाता था. बाबूआजीके पास काला चष्मा था. बाबुआजी भगवतिया रंडीका गाना सुनते है."

पं. लक्ष्मीकांतकडून मला कळले की, जयगोपाल ऑक्टोबर १९२२ मध्यें वारला. जगदीशने अुल्लेखल्याप्रमाणें ४ मार्च १९२३ ला तो ११ वर्षांचा होता. लक्ष्मीकांताचें म्हणणें असें होतें की, हा मुलगा बाबूआजीचा नसून त्यांचे मुलीचा मुलगा. ती बापाचे घरी राहत असे. पुढें मुलगी वारली नि हें लहान बाळ त्यांचेकडून पालित पोषित झाले.

---

# विश्वनाथाचें वृत्त

( लीडर–आगस्ट १२, १९२६ मध्यें आलेली )

## अेक आणखी आश्चर्यकारक घटना

(ग) **घटना ३**:–श्री. विश्वनाथ नावाच्या अेका मुलाचा पूर्वजन्मस्मृतीचा वृत्तान्त आपण आपल्या पत्री प्रसिद्ध केल्यास फार आभार होतील. माझ्या मुलाच्या–जगदीशचन्द्राच्या–पूर्वजन्मस्मृतीचे वृत्त लीडरमध्यें प्रसिद्ध झाल्या-पासून तशा प्रकारच्या अनेक घटनांची पत्रें मजकडे येअू लागली आहेत. मी त्या त्या घटनांचे योग्य संशोधन नि परीक्षण करून त्या पडताळून पाहीन आणि त्याचा निर्णय तुमच्या पत्रद्वारा जनतेपुढे ठेवीत जाअीन. विश्वनाथाचा जन्म १९२१ फेब्रुआरीस ७ ला बरेलीमध्ये झाला. तो दीड वर्षांचा झाला तेव्हां पिलभितविषयी (अेका गावाचें नाव) विचारू लागला. 'बरेलीपासून पिलभित किती दूर आहे, नि माझा पिता तेथे केव्हा नेणार?' हे त्यानें विचारले. तीन वर्षांचा झाला तेव्हापासून तो आपले पूर्ववृत्त विशेष प्रकारें सागू लागला. त्याचे आअीबापाना भीति वाटली नि त्यानी ते वृत्त छप-विण्याचा प्रयत्न केला. अशी मुले फार दिवस वाचत नाहीत नि म्हणून ही त्याची स्मृति जितकी लवकर बुझेल तितके चांगले असा समज आहे. अगदीं नुकतीच ही गोष्ट ठाकुर मोतीसिह वकील नि भूतपूर्व विधिसमितीसभासद यांचेकडून कळली आणि मी बाबू रामगुलाम नि विश्वनाथ याना बघण्या-साठी जून २९ ला गेलो. पिलभितला जाअून मुलगा सांगत असलेल्या गोष्टीचा खरेखोटेपणाविषयीचा शोध करावयास जाण्यासाठी रामगुलामला मी पुष्कळ समजावलें. मोठ्या प्रयत्नानें त्याला तसें करण्यासाठी वळवून मीहि बरोबर येण्यास सिद्ध असल्याचें सांगितले. त्याप्रमाणें आगस्ट १ ला आम्ही पिलभितला गेलों. आम्ही थेट पिलभितच्या सरकारी हायस्कूलकडे गेलों. ती 'आपली शाळा' असें त्या मुलाने ओळखलें नाही. ती शाळा नवी बांधलेली आहे. जुन्या ठिकाणी नव्हती. तेथील हेडमास्तर रावसाहेब बाबू अश्रफलाल यांना मला या परिशोधनकार्यांत साहय करण्याविषयीं मी

विनंति केली नि त्यांनी ती मोठ्या आनंदाने मान्य करून आमच्याबरोबर बरेच स्थली ते फिरले. मी भेट होतांच विश्वनाथाचें सर्व म्हणणें टिपून घेतले नि त्यापैकी पुढील गोष्टीच केवळ पडताळून पाहावयाच्या होत्या. आपल्या चुलत्याचें नांव हरनारायण, जात कायस्थ, मोहल्ला गंज, नगर पिलभित, स्वतःचे वय २० वर्षांचें नि मी अविवाहित होतो असे त्याने सांगितले. त्याचेजवळ अेक तरवार नि अेक बदुक होती. त्याचे अगणात बरेच नाच होत असत. माझें घर दुतल असून पुरुषाकरिता नि स्त्रिया-करिता वेगवेगळे भाग आहेत असे घराचे वर्णन त्याने दिले. त्याचे घरी गाण्याचे नि भोजनाचे पुष्कळ वेळां प्रसग घडत असत त्याने आपले आयुष्य सुखविलासी असल्याचे सागितलें. माझे वडील जमीनदार असून मजवर फार प्रेम करीत. मला सतत रेशमी कपडे वापरावयास देत असत. मला नाचणाऱ्या मुली, रोहू मासे नि दारू याची फार आवड असे. मी नदी शेजारील शाळेत ६ वी पर्यंत शिकलों नि मला अुर्दू, हिंदी आणि अिंग्रजी येत असे. आपल्या घरांतील देवघराचे वर्णन दिले. जेव्हां आह्मी शाहू सुदरलालच्या घराजवळ गेलो तेव्हां मुलाने ते हिरवे फाटक ओळखून टांग्याखाला तो अुतरला. जेथें नृत्यसमारंभ होत असे ते अगणहि त्याने दाखविले. शेजारच्या दुकानदारानी हे खरें असल्याचे सागितले. ते फाटक मी स्वत पाहिले ते फाटक हिरव्या वॉनिशनें रंगविलेलें पण आता फार काळाने अगदी धुरकट झालेले होते. कै. देवीप्रसाद रअीस याचे घरी जातांच मुलाने तेंच ते माझे घर म्हणून ओळखलें. 'हें घर हरनारायणचें' म्हणून मोठ्याने ओरडून सागितलें. लाला देवीप्रसादच्या मुलाचें नांव हरनारायण होते त्या जुन्या मोठ्या घराचा कांहीं भाग पडत आहे. त्या कुटुबानें तें घर सोडून निराळ्या ठिकाणी वस्ती केली आहे. तेथील मंडळीचे सागण्यावरून त्या स्थलांत पुष्कळ फरक पडलेले आहेत. जेथें रोहू मासे खात होतो नि दारू पिअून नर्तकी मुलींचा नाच पाहत होतों ती माझी माडी हीच असें त्यानें दरवाज्यावरील माडी दाखवून सांगितलें. त्या माडीला जिना कोठें होता हें विचारतां त्या मोठ्या मातीच्या ढिगाऱ्याकडे त्यानें ती जागा नक्की दाखविली. त्यानें नंतर त्या घरांतील अंतःपुरीय स्त्रियांचें स्थान–विशेषतः माडीवरील खोली दाखविली. त्या

कुटुंबांतील अेकमेव वंशज बाबू ब्रजमोहनलाल यांनीं कैलासवासी हरनारायणचें जुनें छायाचित्र आणलें. तेथें जमलेल्या खूप मोठ्या जमावापुढें अेकदम पुढें होअून बोट ठेवलें नि 'हे माझे पिता हरनारायण नि हा 'मी'* असें त्या चित्रांतील 'पितापुत्रांच्या' छायाचित्रावर बोटें ठेवून सांगितले. हें अगदी आश्चर्यकारी होते नि त्यामुळें त्याची 'लक्ष्मीनारायण स्वतःचें नांव नि पित्याचें नांव बाबू हरनारायण' या विषयीची स्मृतिसत्यता निश्चित सिद्ध झाली. मग त्याला आम्ही जुन्या शाळेकडे नेलें. तेथें जातांच त्यानें ती शाळा ओळखली नि तिच्याभोंवती तो फिरला. तेथील अुजव्या बाजूचे कोन्यात असलेल्या जिन्यापासून तो चढू लागला. मी आणखी तिघे गृहस्थ त्याचे मागून जाअू लागलों. अगदीं वर गेल्यावर तेथून दिसणारें त्याचें घर त्याने पुन्हा दाखविले आणि मागच्या बाजूस वाहत असलेली दुहा नदी दाखविली. त्या शाळेंत सहाव्या यत्तेचा वर्ग कोठे होता असे विचारतां त्यानें नक्की खोली दाखविली. ती गोष्ट त्याच्या दोन वर्गबधूनी खरी असल्याचें सागितले. त्या दोन वर्गबधूनी शिक्षकाचे नांव साग म्हणून म्हणतांच दाढी-वाला लठ्ठसा माणूस होता म्हणून सागितले नि जमलेल्या मंडळीनी शिक्षक असलेल्या मोअीमुद्दीनचें वर्णन म्हणून ते त्याचे म्हणणें समर्थिलें. आपल्या घरातील देवघर त्याने पूर्वी वर्णिलेले बरोबर दाखविले. त्या मुलाला तबला दिला तेव्हा तो फार सहजपणे तबला वाजवू लागला. त्याच्या या जन्मीच्या पित्यानें—'रामगुलामनें—मुलानें या जन्मी तबला पाहिला सुद्धां नाहीं'—असें प्रतिज्ञेवर सांगितलें आणि तेथील मंडळींनी तें अगदीं बरोबर असल्याची ग्वाही दिली. या घटनेची बातमी पो. सुपरिटेंडेंट नि सिव्हिल सर्जन यांना दिली. त्यापैकी पो. सुपरिटेंडेंटनें येअून त्या मुलाला बरोबर घेअून फिरवून

---

* **टीपः**—आजोबाला पिता समजण्याव्यतिरिक्त बाकी जगदीशचें म्हणणें खऱ्या वृत्तांताशीं जुळलें आहे. लहानपणीं पिता वारल्यावर त्याला आपला पिता कोण हें माहीत नसल्यानें तो आपल्या आजोबालाच पिता समजत होता. त्या मुलानें आपल्या मागील पित्याविषयीं म्हणजे आजोबाविषयींच्या दोन मोठ्या वाअीट गोष्टी सांगितल्या.

आणलें आम्ही जेव्हां परतलों तेव्हां स्टेशनवर खूप गर्दी जमली होती. तेथें असलेल्यांत रावबहादुर रामस्वरूप नि रायसाहेब बाबू अश्रफलाल हे प्रमुख गृहस्थ होते. पूर्वजन्मी तू कोणत्या वेश्येशी संबंध ठेवला होतास असें तेथील मंडळींनी विचारतां त्या मुलानें पन्ना हे नांव मोठ्या अनिच्छेनें शेवटीं सांगितलें.

श्रीयुतः—**संपादक, 'लीडर' यांस,** (आगस्ट ३०-१९२६).

मला श्री. नागर यानी ता. २२ ला केलेल्या नि अितरांनी विचारलेल्या प्रश्नाचे अुत्तर तुह्मी आपल्या पत्री प्रसिद्ध कराल तर मी आपला आभारी होअीन. बाबू हरनारायणचा मुलगा बाबू लक्ष्मीनारायण शहाजानपूरला ता. १५ डिसेंबर १९१८ ला संध्याकाळी ६ वाजता ताप नि यकृत विकार यांनी वारला. मृत्युचे वेळी त्याचें वय ३२ वर्षे नि २१ दिवसांचें होतें. तो ५ महिने आजारी होता लक्ष्मीनारायणचे मामा बाबू अुपेंद्रनारायण यांनी ही माहिती पुरविली यासाठी मी त्यांचा आभारी आहे विश्वनाथ सांगत असलेल्या पुष्कळ गोष्टी आह्मी कुटुंबातील मंडळी विसरून गेलों आहोंत असें त्यांनी लिहिले आहे. अेक आश्चर्यकारी गोष्ट अशी कीं, लक्ष्मीनारायणलाहि आपण पूर्वजन्मी जहानाबादला होतों हे ६ वे वर्षांपर्यंत स्मरण होतें. पण अशी स्मृति मुलाला असल्याचें प्रसिद्ध होणे हे मुलाला वाअीट आहे तेव्हां त्याचे कल्याणाकरिता लक्ष्मीनारायणच्या आअी-बापांनी ती गोष्ट गुप्त ठेवली नि त्याचे स्मृतीच्या खरेखोटेपणाविषयी शोध केला नाही. तेव्हां आताचा हा आपला बरेलीचा विश्वनाथ पूर्वीचा पिलभितचा लक्ष्मीनारायण होता नि पिलभितचा लक्ष्मीनारायण हा जहानाबादचा कोणीतरी होता असें म्हटलें पाहिजे. जिज्ञासू अभ्यासकांनी आपले तर्क चालवावेत. लक्ष्मीनारायणचा स्वभाव फार आनंदी असे. त्याला मद्य, मांस नि स्त्री यांची फार आवड असे. पिलभितचा सिव्हिल सर्जन दुसरें महत्वाचें काम असल्यामुळें येअू शकला नाही..............लक्ष्मी-'नारायणची' आअी—आपल्या भावाकडे—श्री. अुपेंद्रनारायणकडे राहत आहे. तिच्याकडे मुलाला नेल्यावर तिनें परीक्षणार्थ कांहीं प्रश्न विचारले नि

त्यांचीं अुत्तरें मिळतांच माझा लक्ष्मीनारायणचाच हा विश्वनाथ होअून आला आहे असें तिनें मान्य केले.

(१) प्रश्नः—तू पतग अुडवीत होतास काय?
उत्तरः—होय.

(२) प्रश्नः—कोणाशी तू झगडत होतास?
उत्तरः—माझ्या मार्गांत येणाऱ्या प्रत्येक पतंगाशी मी झगडत होतो. पण विशेषतः सुंदरलालच्या पतगाशी झगडत होतो.

(३) प्रश्न—तू माझे लोणचे फेकून देत होतास काय?
उत्तर—मी लोणचे फेकणार नव्हतो. पण त्यातील किडे कसे खाणार? किडे असले तरी ते तसेच खावे असे तुला वाटत होते म्हणून मीच तें लोणचे फेकून दिले.

अेकदा लोणच्यात किडे पडले होते ते त्या आअीने काढून फेकून दिले नि मग लोणचे अुन्हात ठेवले होतें. पण आअीच्या अिच्छेविरुद्ध लक्ष्मीनारायणने तें लोणचेच अुचलून फेकून दिले होते.

(४) प्रश्न—कधी नोकरीत शिरला होतास काय?
उत्तरः—होय. मी काही दिवस अी. आय. आर् रेल्वेमध्ये नोकरी केली.

(५) प्रश्नः—तुझा नोकर कोण होता?
उत्तर.—मैकुआ माझा नोकर होता. तो काळा नि बुढ्ढा कहार होता तो माझा आवडता स्वयपाकी होता.

पुढें बी. बलवीरसिंहानें विचारलें की बरेलीला अंथरूण नसलेल्या बांबूच्या चारपाअीवर (बाजेवर) निजत होतास नाहीं काय? तेव्हां तो अुत्तरला. 'तूं माझें अंथरूण पाहिलेंच नाहींस. अुशाशीं शोभायमान तक्ता होता. अथरुणावर कालीन आंथरलेली होती. दोन अुशा डोक्याखाली नि दोन अुशा पायाखालीं असत.' पूर्वीं पिलभितला नि आतां बरेलीला सरकारी

शाळेंत असलेल्या शिक्षकाने विचारलें 'तुला पिलभितला मी काय शिकवित असे' तेव्हां 'तुम्ही मला हिंदी शिकविले' असें त्यानें सांगितलें. अितरहि स्वतंत्र मार्गानें पूर्वजन्मीच्या लक्ष्मीनारायणचे जन्मांतील घटना खऱ्या सिद्ध झाल्या आहेत. पण लिखाण निष्कारण वाढू नये म्हणून तो भाग येथें गाळला आहे.

---

## (६) हीरा कौरची स्मृति

**घटना ४ थीः**—आर्. ओ. के. रेल्वेच्या हल्डवनीचे स्टेशनमास्तर बी. श्यामसुंदरलाल १९२६ आगस्ट ३१ ला आपली मुलगी हीरा कौर हिच्यासह माझे भेटीला आले. ही मुलगी १९११ सेप्टेंबरमध्ये बरेलीला जन्मली होती. तिनें आपले पूर्वजन्मीचे घर मोठ्या चमत्कारिक प्रकारे अेकाअेकी ओळखलें. पुरुषाला दुसरा जन्म स्त्रीचा आल्याचे हे अेक विशेष लक्षांत ठेवण्यासारखे अुदाहरण घडलेले आहे. ही मुलगी पूर्वी मथुरा जिल्ह्यातील गोकुल गावी १९१८ या वर्षी आक्टोबरमध्यें वारलेला १२ वर्षांचा मुलगा होती.

त्याच्या मृत्यूची निश्चितपणे सर्व माहिती कळणें त्या कुटुंबातील अेकच काय ती म्हातारी जिवत असल्यामुळे कठिण झाले आहे. १९२२ च्या ऑगस्टमध्ये बी. श्यामसुंदरलाल हे मथुरेच्या यात्रेला गेले होते. जेथें नंद-यशोदा राहत असत ती जागा अद्याप गोकुळला दाखविली जाते. मथुरेस जातांना गोकुळवरून त्या जागेपासून जात असतां पहाडी नोकराच्या कडेवरून ती मुलगी अेकाअेकी हट्टाने खाली अुतरली. वर अुल्लेखलेल्या अैतिहासिक घराजवळील अेका घराचे दाराशी अेक म्हातारी बसली होती. ती मुलगी त्या घरात बळेंच घुसली नि तिच्या मागोमाग तिची आअीहि घरांत गेली. तेथें ती मुलगी जणू कांहीं मुलगा आहे याप्रमाणें बोलू लागली. आंत जातांच तिनें 'ती नखाति नि माझी लेखणी कोठें आहे आणि ज्या चौकीवर बसून मी लिहित होतों ती चौकी कोठें आहे' असें विचारलें. हे प्रश्न अैकतांच ती म्हातारी अेकाअेकीं रडू लागली. 'आपल्या पितळी अडकित्यानें

सुपारी कातरून माझ्या या नव्या आअीला विडा दे' असें आपल्या पूर्व-जन्मीच्या आअीला सांगितलें. म्हातारीनें सुपारी कातरून विडा दिला ती मुलगी आपल्या नव्या आअीला म्हणते, 'मी आतां माझ्या नव्या घरीं आलों आहें. तूं जा. मात्र जाताना विडा घेअून जा.' त्या आअीनें नोकराला खूण करतांच त्यानें त्या मुलीला बलानें अुचलून घेतली नि ती मडळी यमुनेच्या काठाने जाअू लागली. यमुनाकाठाशी पुष्कळ कासवे आली. या मंडळीनी त्याना फुटाणे नि पोहे खाअू घातले. हीरा कौरने त्या कासवांना पाहताच 'तुम्ही मला गेल्या वेळी बुडविलेत नि आतांहि पुन्हां तेच करावयाला आलात काय?' असे म्हटले. हे त्या मुलीचे अुद्गार अैकताच त्या म्हातारीला रडे आवरेनासे झाले. ती हुंदके देअून रडू लागली. त्या मुलीला विचारता ती पुढे साग लागली 'मी येथे स्नानाला आलों असता (कासवाच्या पाठीवरून) पाय घसरून खोल पाण्यांत गेलों नि बुडालो.' त्या म्हातारीने ती घटना सर्वस्वी खरी असल्याचें सांगितले आणि ४ वर्षे झाली माझा १२ वर्षांचा मुलगा याच जागी बुडाला म्हणून सांगितलें.

---

## (ङ) सुंदरलाल अर्थात् हन्नेलाल

### हिरपुर, जि. सितापुर.

**घटना ५ वीः—**येथे जी घटना मी देत आहे त्या घटनेच्या सत्या-सत्यनेविषयी परिशोधन करून तिच्या सत्यत्वनिर्णयासाठी मी राजा सूर्यबक्षसिहजी—कमलपुर जि. सितापुर—याचा फार आभारी आहे. माझ्या विनंतीवरून त्यांनीं आपली मडळी पाठवून नि योग्य प्रकारे मंडळीचीं वक्तव्यें घेअून ही घटना नीट पडताळून पाहिली आहे. वाचकांसाठी मी त्या वक्तव्यांतील अुतारा देत आहे.

राजासाहेबांसमोर सितापुर जिल्ह्यांतील सुधौली तहशीलाच्या हिरपुर गावचे ५८ वर्षें वयाचे फत्तुलाल ठाकूरप्रसाद ब्राह्मण आपलें वक्तव्य देतात तें येणेप्रमाणें:—

'कमलपुरच्या औषधालयांत मी १२ वर्षें मिश्रकाचें (कंपाअुडर) काम करीत होतो. तीन वर्षें झाली मी सेवान्त वेतन (पेन्शन) घेतले आहे नि घरी आलों आहे. सर्वांत धाकट्या मुलाचें वय ४ वर्षांचें आहे हा मुलगा जन्मला तेव्हां कमलपुरच्या औषधालयांत गहत होतो. अयाध्येला स्नानासाठी म्हणून माझ्या द्वितीय पुत्राने त्याचे आअीला (माझ्या पत्नीला) श्रावणात नेले होते. त्यानतर ९ महिन्याने हा सर्वांत धाकटा मुलगा जन्मला त्याचें नाव सुंदरलाल ठेवले. तो दोन वर्षें नि सहा महिन्यांचा झाल्यापासून चागला बोलू लागला. तेव्हापासून सुदरलाल नांवासाठी असतुष्ट होअी आणि मला हन्नेलाल म्हणत जा असे म्हणू लागला– आग्रह धरू लागला. मी फैजाबादला कट्राफुटा मोहल्ल्यात राहणारा असून माझे नांव हन्नेलाल होते, माझी जात लाला होती, मला अेक बायको नि दोन मुले होती, असे तो सागू लागला. तू फैजाबादहून येथें कसा आलास असें विचारता त्याने सागितले की माझे शरीर अयोध्येच्या नदीत फेकलें त्याच वेळी आतांची आअी आली होती तिच्याबरोबर आलो. कमलपुरच्या औषधालयाचे जवळच रेल्वे स्टेशन आहे ते नान्हे पोर स्टेशन-कडे रांगत जात असलेले कित्येक वेळा मार्गानी जात असलेल्यानी अुचलून घरी आणून दिलेले आहे. त्याला विचारले तेव्हा मी फैजाबादचे गाडीत बसून घरी जाण्याकरिता स्टेशनवर जात होतो असे म्हणाला. तो चार पाच वर्षांचा होअीपर्यंत ही पूर्वस्मृति होती. अशी पूर्वस्मृतीची मुले फार दिवस जगत नाहीत या कल्पनेने त्याच्या आअीला ते आवडत नसे. म्हणून आम्ही कांही मान्त्रिक नि तांत्रिक (तंत्रशास्त्रीय) अुपायाने ही त्याची स्मृति घालविण्यासाठी अुपाय केले नि हळूहळू त्याला विस्मृति पडू लागली. माझ्या सर्व आयुष्यांत मी १९२४ मध्येंच काय तो फैजाबादला गेलों होतो. त्यापूर्वी मी तेथें कधीच गेलों नव्हतों. त्याच्या पूर्वस्मृतीच्या खरेखोटेपणा-विषयी मी कधीहि शोधून पाहिले नाही'.

राजा सूर्यबक्षसिंहाचे कोषाध्यक्ष (खजिनदार) भगवानदीन वरील गोष्टी पडताळून पाहण्यासाठीं त्यांचेकडून पाठविले गेले होते. त्यांनीं दिलेल्या प्रतिवृत्तांत ते म्हणतातः–'१९२६ च्या सेप्टेंबरमध्यें ता. १२ ला मी कमलपुर

स्टेशनवरून निघालों आणि ४॥ चे गाडीने जाऊन फैजाबादला रात्रीं दोनला पोहोचलो. मी तेथें गेल्यावर प्रताप भिकारामशहा साहेब आय. सी. अेस्. याचे बगल्यात ज.ाऊन अुतरलो. कट्राफुटा मोहल्ल्याचा काही शोध लागेना म्हणून अेक्का करून अयोध्येला गेलों. हा मोहल्ला फैजाबादचा नसून अयोध्येचा आहे तेथें पोहोचलो. तेथे जानकीप्रसाद सोनार आणि त्या भागातले अितर लोक याचेजवळ विचारणा केली. त्या सर्वांनी सांगितले—तेथें 'लाला हन्नेलाल नावाचा मनुष्य होता. तो मुलाना शिकवित असे, तो कायस्थ होता तो १४–१५ वर्षांपूर्वी प्लेगने श्रावणात आजारी होअून वारला. त्याला बायको, अेक मुलगा नि अेक मुलगी होती. मोहल्ल्यांतील मंडळीनी त्याला गगार्पण केले होते. जानकीप्रसाद सोनार त्याचे प्रेतवाहकापैकी अेक होता. हन्नेलाल आजारी झाला तेव्हा त्याची बायकामुले त्याला सोडून गेली नि त्याचा अत्यमस्कार करावयाला कोणीच नातेवाअीक नव्हते म्हणून मोहल्ल्यातील मंडळींनी त्याला शरयूमध्ये वाहवून दिले. हन्नेलालचे घर पूर्वाभिमुख आहे. त्या घरात कोणाच नसल्याने ते काही भागी मोडकळीस येअून पडले आहे. पर्वणीच्या प्रसगी हन्नेलालची बायको अयोध्येला आली म्हणजे घर बघावयाला येते. ती शेजारचे गावी राहते. पण त्या गावाचे नाव कळू शकले नाही. हन्नेलाल ४५ वे वर्षी वारला.'

---

## (च) 'चमेली'ची पूर्वस्मृति.

**घटना ६ वीः—**प. कालिकाप्रसाद रामनारायण अग्निहोत्री मोहोली परगणा (त. मिश्रिक जि. सितापुर) येथें राहणारे असून राजेसाहेबांचे कुसमुंड्याचे अधिकारी होते. त्याचे वक्तव्य राजासाहेब (सूर्यबक्षसिंह साहेब—कमलपुर) यानीं स्वत. विचारून लिहवून घेतले ते आपल्या वक्तव्यांत म्हणतातः—"ज्या ज्या गोष्टी मी स्वतः पाहिल्या त्याच मी येथें सांगत आहें. पं. अुमाकांत पाडे यांचे चिरजीव पं. भिकारीलाल हे माझे शेजारीं राहत होते. त्यांना २० वर्षांची मुलगी असून ती अविवाहित होती. तिचें नांव 'मस्त चमेली' असें होतें. बसवंतलाल शुक्ल यांच्या २१ वर्षे वयाच्या

मुलाशी तिचें लग्न ठरलें होतें. घरी आल्यावर प. भिकारीलाल म्हणाले 'माझ्या गरीबीमुळें मला योग्य वर मिळत नाही. योग्य वयाचे वर पुष्कळ हुंडा मागतात. तिला वर मिळू शकला नाहीं.' त्या मुलीनें हे सर्व अैकले पण काही बोलली नाही. तिनें सर्वांसाठी स्वयंपाक केला नि सर्व कुटुंबातील मंडळींना जेवावयास वाढले. रात्री सर्वजण झोपल्यावर घराजवळ असलेल्या तळ्यांत जीव दिला. तिनें अंगावर ब्लँकेट घेतले होते. ते तळ्याखाली लाकडी पाटयाखाली सकाळीं तिचा शोध करतां सापडले नि तिचे प्रेत तळ्यांत सांपडलें. तिने आपल्या नेसत्या वस्त्राचा काचा मारला होता आणि अंगांत सद्रा होता. मोहोली ठाण्याचे सब अिन्स्पेक्टर ठाकुर गौरीशंकर सिंह यांनी पंचनामा केला. त्यानी आता सेवान्स वेतन घेतले आहे नि ते सितापुरला राहतात. पं. भिकारीलालचे शेजारी सजनचे चिरंजीव कामता-प्रसाद राहत असत. ते आता सितापुर जिल्ह्यात मशरीफ तहसीलमध्ये बरमोहल्ली या गावीं शिक्षक आहेत. त्यांना मुसम्मत चंपा म्हणून अेक मुलगी आहे. तिचें वय १२ वर्षांचें आहे. पाच वर्षांचें वय झाले तेव्हां ती 'मी भिकारीलालची मुलगी होती आणि मी तळयांत अुडी मारून जीव दिला' असें सांगू लागली. तिनें आपल्या मोहल्ल्यातील अितर गोष्टी सुद्धा बऱ्याच सांगितल्या. ती मुलगी माझ्या घरी येत आहे नि अद्यापहि येते. ती मला गांवच्या रीतीप्रमाणें 'चाचा' न म्हणता 'बाबा' म्हणून म्हणत असे. आणखी ती म्हणाली कीं मी बनियाचे घरी जन्माला आले आहे पण तेथे मी कोणाचेंहि अुष्टें खात नाही.

चंपा ५ वर्षांची असतां जेव्हां मी तिचें वृत्त अैकलें तेव्हां मी तिला आपल्या घरीं घेअून चल नि तुझ्या स्वतःच्या वस्तु जर कांही अद्याप तेथें असल्या तर त्या दाखीव असें म्हटलें. मी तिच्याबरोबर भिकारीलालचे घरी गेलों. तेथें तिनें आपली पेटी नि निजण्याची खाट दाखवली आणि म्हणाली कीं पेटींत आतां माझे कपडे नाहींत. ज्या खोलींत ती निजत असे ती खोली तिनें नेमकी दाखविली. तिचा तोंडवळा नि वर्ण अगदीं पूर्वजन्मीच्या मस्त चमेलीप्रमाणें आहे. ती अद्यापहि म्हणते कीं मला लग्न करावयाचें नाहीं नि मला पुन्हां तळयांत जाअून अुडी घ्यावीशी वाटते. त्या मुलीच्या आअी-

बापांनीं वझीरनगर (ता. मिश्रिक जि. सितापुर) येथील मौला बक्कल याच्याशीं तिचा विवाह केला आहे. तो कुसमुंडा रियासतचा झिलाअीदार आहे नि मला वझीरनगरला पाठविलें आहे. मी जें जें स्वतः पाहिलें आहे तेंच येथें वर्णन केलें आहे."

---

## (छ) व्रजचंद्रशरणची पूर्वजन्मस्मृति

**घटना ७ वीः**—१९०६ या वर्षी देहांतरप्राप्ति नि पुनर्जन्म या गोष्टीची निश्चिति माझे मनाला पटली. माझा चुलत भाअु नंदनंदनसहाय बी. अे. हा मिरझापूरला आपल्या वयाच्या १९ वे वर्षी वारला. त्याचा मृत्यु महामारीने झाला. तो चांगला वक्ता, बुद्धिमान, यशस्वी विद्यार्थी नि अुत्कृष्ट खेळाडू असल्याने त्याच्या मृत्यूमुळें आमच्या कुटुंबांतील माणसांना नि त्याच्या स्नेही मंडळीनाहि फार दुःख झाले. त्याला घोड्यावर बसण्याची नि पोहण्याचीहि आवड असे. त्याच्या मृत्यूचे वेळी त्याची पत्नी दोन महिन्याची गर्भवती होती. तिला फार चमत्कारिक स्वप्ने पडू लागली नि अेकदां तर तिचा पति साक्षात् स्वप्नांत भेटून मी तुझ्या पोटी जन्म घेणार आहें असे सांगता झाला. त्यानें असेहि सांगितले की मी तुझें स्तनपान करणार नाही. त्याकरता अेक दूधदेती दाअीहि ठेवा. नाहीतर मी अुपासमारीनें मृयुवश होअीन आणि माझे क्षतचिन्ह असेल की ज्यायोगें मीच जन्माला आलों याविषयी शंका राहूं नये. त्याचे पत्नीने तें स्वप्न घरचे मंडळीना सांगितलें नि बाळंत होण्याचे वेळी त्याचे शुश्रूषेला नि दुध पाजण्यास अेक दूधदेती दाअी त्याचे ह्मणण्याप्रमाणें ठेवली होती. ती बाळंत झाली तेव्हां मुलगा झाला. त्याचे डोक्याचे मागचे अंगास क्षतचिन्ह होतें आणि मुलानें आअीच्या स्तनाला तोंड लावलें नाहीं. पुढें आअीच्या स्तनांतून दूध काढून चमच्यानें तें मुलाच्या तोंडांत घातलें पण मुलानें लागलीच ओकारी दिली नि खूप ओकला. तें दूध त्याला मानवलें नाहीं. पुढेंहि तो घरांतील अितर स्त्रियांचे स्तन चोखीत असे पण त्यानें आअीचें स्तन कधींहि चोखलें नाहीं. पुढें ५ वर्षांचा झाल्यावर त्यानें आपल्या जन्मदात्रीला अेकांतात गुप्तपणें सांगि-

तलें की, तू माझी पत्नी आहेस. आजोबा नि आजी हे माझे खरे आओबाप आहेत. या स्मृतीमुळें वागतांना त्याला मोठा घोटाळा पडत असे. मुलाचें हे ह्मणणे त्याच्या आओीने घरांतील मंडळीना सांगितलें. यानंतर त्या मुलाला तीन दिवसांनी ताप आला. तो ताप विषमाचा ठरून त्या तापानें तो २१ दिवस अंथरुणाला खिळून होता. यानतर त्या मुलाचे हितार्थ त्या गोष्टीचा अुल्लेख त्याचेजवळ घरातील कोणीहि केला नाही नि ती गोष्ट हळूहळू त्याला विसरू दिली आता तो मुलगा तरुण बनून कॉलेजात शिकत आहे. त्याचे नाव व्रजचद्रशरण आहे त्याची मुद्रा अगदी त्याचे वडिलांप्रमाणें ह्मणजे पूर्वजन्मीच्या मुद्रप्रमाणें आहे नि त्याच्या वडिलाचे छायाचित्राशी त्याचे अत्यत साम्य दिसतें. त्याचे वडिलाचे केस ज्याप्रमाणे भांग पाडलेले असत त्याचप्रमाणे त्याच बाजूला मुलाचे केस स्वभावत च जन्मापासून विभागलेले आहेत. या धटनेला साक्ष असलेले आह्मी पुढील गृहस्थ आहोतः—

१ मी स्वत कैकेयीनदन सहाय बी. अे अेल् अेल्. बी. वकील बरेली.
२ बाबू गिरधारीलाल–भूतपूर्व सबजज–सेवान्तवेतनी
३ बाबू यदुनंदन सहाय–ओव्हरसियर P. W. D. मुरादाबाद.
४ बाबू गोपीनदन सहाय–डेप्युटी कमिश्नर–प्रतापगड.
५ राय लाला बिहारीलाल–सेवान्तवेतनी तहसिलदार–बरेली.

---

## (ज) वज्रांगबहादुरची पूर्वस्मृति

**घटना ८ वीः**—वज्रागबहादुर रामचरणलाल–रोखे आदिक लिहिणारा नि बरेलीत मोहल्ला सैदपुरीयामध्यें राहणारा–हा सन १९१८ मध्ये जन्मला. त्याचे मातापितर हे दोघेही काळे वर्णाचे होते. पण मुलगा मात्र अगदी गौरवर्णी, पिंगटकेशी नि घारे डोळयांचा होता. त्याचे मानेवर अुजव्या बाजूला नि डोक्याचे कवटीवर दोन गोळया लागल्याच्या खुणा होत्या. गेल्या वर्षापर्यंत त्याला पूर्वजन्मस्मृति होती. गेल्या वर्षी त्यानें ती शाकंबरीलाल सिंघी–बरेली झकाती मोहल्ल्यामध्यें राहणारे जमीनदार आहेत–ह्यांना

सांगितली होती. आतां त्याला त्याचें विस्मरण पडलें आहे. आपले वयाचे ४ थे वर्षाचे वयापर्यंत तो चाकू नि द्विजिव्ह शूलाने (कॉर्कनें) जेवीत होता. बेडुक अुडी आदिक अिंग्लिश पद्धतीचे चमत्कारिक खेळ तो खेळत होता. खेळताना तो सैनिक पद्धतीने चालत असे नि सावधानतेच्या सैनिक सूचना देत असे. त्याचे मातापितर जुन्या वळणाची मडळी असल्यामुळें या स्मृतीच्या योगें पोर अल्पायुषी होअील या भीतीने त्यांनी ही गोष्ट गुप्त ठेवली. त्यांना अिंग्लीश मुळीच येत नाही. तो मुलगा पूर्वजन्मस्मृति सांगूं लागल्यापासूनच त्यांनी तें कोणाजवळ न सागण्याचें व्रत चालविलें होतें. या भोळ्याभाबड्या समजुतीनें ही असली विलक्षण नि पुष्कळ शिकण्या-सारखी गोष्ट अुजेडांत आली नाही, याचें फार वाअीट वाटतें. त्याला आणखी दोन भाअू नि आअी होती. वडील पूर्वीच वारले. आपलें नांव आर्थर असून मी अिंग्लिश सोल्जर होतो नि मी जर्मन युद्धांत वारलों असे तो सागे.

त्याचे वय मृत्यूचे वेळी २८ वर्षांचे होते. दुसरा मुलगा रामचरण-लालला जो झाला तोहि गोरा होता. हा माझा पूर्वजन्मीचा दुसरा भाअू असे वज्राग सांगत असे.

---

## (झ) पूर्वजन्मस्मृति.

**घटना ९ वीः—**संवत् १९३३ (सन १८७८ मध्ये) कधा गांवांत मोहनलाल ठाकुर बदुकीने मारला गेला. त्याच वर्षी त्या गांवापासून ६ कोसांवर गरीबमुरा गांवी काशीराम नावाचे गृहस्थाला मुलगा झाला तो तीन वर्षांचा झाला असतां अेक दिवस बंदुकीचा शब्द अैकतांच धाय मोकलून रडू लागला नि फार घाबरला. त्या बंदुकीच्या शब्दानें त्याची पूर्वस्मृति जागी केली. कांही वेळानें भयाचा नि रडण्याचा वेग ओसरल्यावर तो सांगूं लागलाः—'मी कंधा येथें राहणारा मोहन आहे नि मला हर-वल्लभनें बंदुकीनें मारलें.' जेव्हां ही गोष्ट जिल्हाधिकाऱ्याला कळली तेव्हां त्यानें त्याचें वक्तव्य घेतलें. त्या मुलानें हरवल्लभला ओळखलें. पुढें सन

१८८१ फेब्रुवारीमध्यें तो दावा जेव्हां ग्वाल्हेरला आला तेव्हांहि त्यानें तेंच वक्तव्य दिलें. मोहनच्या भावाला पाहून त्या मुलानें हा माझा भाऊ ह्मणून ओळखलें आणि सांगितलें की मी सर्व जाणतों नि ओळखतों. पुढें हा दावा चालला होता. (त्याचें काय झालें हे कळू न शकल्यानें येथें देतां आले नाहीं.)—आर्यदर्पण, अप्रील१८८१.

---

## (ञ) अेक ब्रह्मचारी नि अकबर

### अकबराची पूर्वजन्माविषयीं निश्चिति

**घटना १० वीः**—मुकुंद ब्रम्हचाऱ्याची घटना अद्याप प्रयागच्या जुन्या पिढीच्या लोकांचे तोंडी अैकावयास सांपडते. मुकुद ब्राम्हण ब्रह्मचारी हुमायूनचे समयी अेक अीश्वरभक्त नि संयमी असून तपश्चर्यामग्न असे. त्याला भारतसम्राट व्हावें अशी अिच्छा भोगविलासलालसेनें तीव्रतरतेनें जाणवू लागली नि त्यासाठीं त्यानें त्रिवेणीच्या तटावर—जेथें श्रीगंगा-ययुनासगम आहे तेथें—अेक अनुष्ठान आरंभलें. अनुष्ठानाचे अंती यज्ञाचे वेळी आपले अंगाचे तुकडे कापीत त्यानें यज्ञाग्नीत होमले नि शेवटी पूर्णाहुति म्हणून अवयव कापून अुरलेला आपला देह अग्नीत अुडी घेत अर्पण करून तो भस्मसात् झाला. त्यापूर्वीं अेका ताम्रपटावर आपण अमुक हेतूसाठीं अमुक काळी आत्मार्पण केलें अशा अर्थाचा श्लोक त्याने खोदून ठेवला होता. तो ताम्रपटीय श्लोक प्रयागमध्यें पुष्कळांना पाठ आहे. तो येणेंप्रमाणें:—

वसु अिन्द्र बाणचन्द्रे तीर्थराजे प्रयागे तपसि बहुलपक्षे द्वादशी पूर्वयामे ।
तन्त्र जहोमय सर्वभूम्याधिपतिः सकलदुरितहारी ब्रम्हचारी मुकुन्दः ॥

या श्लोकांत दिलेल्या तिथीप्रमाणें (हा श्लोक पुष्कळच अशुद्धसा वाटतो पण शुद्ध श्लोक न मिळाल्यामुळें जसा मिळाला तसाच येथें दिला आहे.) संवत १५९८ चे सुमारास हें देहपूर्णाहुतिकृत्य समाप्त झालें. त्या दिवशीं ८ जानेवारी १५४२ हें वर्ष होतें. त्यानंतर ८ महिने १६ दिवसांनीं अकबराचा जन्म झाला. (मुन्नाहूल तवारीख पृ. १९७-१९८)

अकबरच्या राजवटीत बस्तर गांवी रावन टीका नावाचा अेक मुखिया होता. अेका मनुष्याचें त्याच्याशी वैर होते. त्यानें सधी साधून रावनच्या पाठीवर नि कानावर अेक अेक प्रहार करून त्याला ठार केले. पुढे काही कालाने रावनचे अेक आप्त रामदास याना अेक पुत्र झाला. त्याच्या पाठीवर नि कानावर प्रहाराची चिन्हे होती. तो पुढे थोडा मोठा झाल्यावर 'मी रावन टीका आहे' असे सागून सर्व गोष्टी अगदी पुराव्यासह सागू लागला. ही गोष्ट अकबराचे कानावर गेली. तेव्हा त्याने त्या मुलाला आपले समोर आणून त्याला सर्व वृत्त विचारले नि त्या गोष्टीची योग्य शोधना होअून सत्यता सिद्ध झाली. पूर्वीपासून मुकुद ब्रह्मचारी याचा वृतान्त अकबर अैकून होता. त्याचे मनात 'असे असेल काय?' ची शका घर करून होतीच. वरील अुदाहरणातील परिशोधनेनतर अकबराच्या शकेचे पूर्ण निश्चितीच्या रूपात रूपातर झाले. त्या दिवसापासून अिस्लामी मतापासून त्याने तोड फिरविले. निमाज सोडला—सध्या गायत्रीजप करू लागला. स्वत.चे नाव महाबली ठेवले. गोहत्येची निषेधपूर्वक बदी केली. मास भक्षणाची घृणा करू लागला. दाढी काढून टाकून मुसलमानीपणाला रामराम ठोकला. पुनर्जन्माचा सिद्धात मानू लागला. यज्ञोपवीत धारण करून कपाळीं चदन-तिलक धारण करू लागला. हिंदूवराल झिझिया कर बंद केला. जे मुसलमान झाले होते त्यांना शुद्ध होण्याचे द्वार मोकळे करून दिलें. (पूर्वीच्या मुसलमान राज्यकर्त्यांनी शुद्धीला बलात्कारानें नि भयकर शिक्षांचें शस्त्र हाती घेअून बंदी करून ठेवली होती.) सिह नि डुकर (मुसल्मानांनी हे मांस निषिद्ध मानले आहे) हे वीरपशु आहेत नि त्याचे मास वीरता प्रदान करते अशी घोषणा केली. मदोन्मत्त होणार नाही अितके मद्य पिण्याला अनुमति दिली आणि मातेच्या मृत्यूसमयी राजसभासदांसह १५००० चा (श्राद्धासारखा समारंभ) धर्म केला. (दब्बिस्तान मजाहिब नि कस्सुल हिंदु-अकबर वर्णन) अितकेच नव्हे तर त्याने अनेक वेळीं मला ब्राम्हण करून घ्या म्हणून पंडितांची विनंतीहि केल्याचें अुल्लिखित आहे. जर तसें झालें असते तर?........पण त्या 'तर'चा आतां काय अुपयोग!!!

## पूर्वस्मृति

**घटना ११ वीः—**फेरोजपूर येथील सरकारी शाळेंतील नोकर लाला मनोहरलाल याच्या अज्ञान मुलानें आपल्या गेल्या जन्माचे वृत्त सागावयास आरंभ केला. त्या मुलाने आपल्या थोरल्या भावाला आपल्या पूर्वजन्मीच्या आअीबापाकडे नेण्यास सांगितले पण थोरल्या भावाने तिकडे दुर्लक्ष केलें. त्यावर त्या मुलाने आपले वडिलाना गतजन्मीचा वृत्तान्त सागितला की, आपण पोलीस नोकरीत असताना १९२१-२२ मध्ये लाहोर तुरुगात होतो. तेथें कांही गुन्हेगार पळून जाण्याचा प्रयत्न करीत असता आपणाला घाव होऊन आपण अंती मेलों.

मुलानें सांगितलेल्या आअीबापाच्या नांवाचे भाडेकरी घरांत राहत होते की नाही हा शोध लागत नसून त्याच्या गतजन्मीच्या नावाचा मनुष्य ठार झाला की काय हे निश्चित कळत नाही. पण स्मशानभूमीचे वर्णन नि तुरुंगांतील कैदी पळून जाण्याचा प्रयत्न अित्यादि गोष्टी बरोबर जमतात. या प्रकारानें लोक आश्चर्यमूढ होऊन गेले आहेत. (कानपूर-प्रताप).

---

## (ट) पूर्वजन्मस्मृतीची साक्ष

**घटना १२ वीः—**ज्ञानप्रकाश ता. २५ जुलै १९२५ चे अंकी फर्ग्युसन कॉलेजांतील प्राणीशास्त्र नि वनस्पतिशास्त्र यांचे प्राध्यापक (प्रोफेसर) डी. अेल्. अर्थात् अण्णुभाअु दीक्षित यांच्या अध्यक्षतेखाली जी चर्चा झाली त्या समारोपांत अध्यक्ष दीक्षित यांनीं पुढीलप्रमाणें माहिती सांगितली "पुनर्जन्माची साक्ष देणारी अेक गोष्ट माझ्या अनुभवास आली आणि मी ती तुम्हास अगदीं नांवनिशीवार सांगतों म्हणजे अुपीच कल्पित कथा आहे असें कोणास वाटावयास नको.

ग्वाल्हेर येथील डॉ. लेले यांची प्रथम पत्नी धारवाड येथील फाटकांची मुलगी. तिला अेक मुलगा झाला नि नंतर ती मेली. तेव्हां तो मुलगा सांभाळण्यासाठीं धारवाडास त्याच्या आजीकडे म्हणजे डॉ. लेले यांचे सासूकडे

ठविण्यांत आला. यानतर डॉ. लेले याची सासू गरोदर होऊन तिला रुगी झाली. पुढें ३–४ वर्षानतर डॉ. लेले हे आपल्या मुलाला भेटण्यासाठी रवाड येथें सासुरवाडीस गेले. तेथे त्याचे मामूची ही मुलगी दोन अडीच र्षांची झाली होती. दुपारच्या वेळी डॉ. सहज अेकटे बसले होते तेव्हां ही न वर्षांची छोटी मुलगी दिवाणखान्याच्या दारात मोठ्या बाओप्रमाणें भी राहून डॉक्टरना म्हणाली, 'मला पोलके नाही एखादें पोलकें नाहीं ा शिवायचे ?' डॉक्टरना त्या मुलीच्या त्या बोलण्याचे कौतुक वाटले नि म्हणाले, 'शिवीन ह तुला अेक पोलके!' नंतर ती मुलगी म्हणाली. अश्श! हे काय मला अिथें किती दिवस ठेवणार? मी येणार तुमच्या-रोबर!' या वेळीहि डॉक्टरना गम्मत वाटण्यापलीकडे त्या मुलीच्या ल्लण्यांत दुसरा कांही अर्थ आहे असे वाटले नाही ते सहज म्हणाले नेअीन ह तुला बरोबर!' त्याच दिवशी रात्रीचे गाडीनें डॉ. परत जाणार ते. परतु रात्री १२ वाजेपावेतो ही मुलगी न झोपतां त्याचे बरोबर ण्याचा हट्ट धरून बसली. अर्थात् त्या दिवशी डॉक्टरना जातां आले नाही. ते सरे दिवशी दुपारी सहज बाहेर गेले नि घरी परत न येता स्टेशनवर गेले.

पुढ तीन चार वर्षांनी डॉक्टराचे येथें त्यांच्या मुलाची मुज झाली, त्या ळी ही मुलगी मुंजीला आली होती. तेथें डॉक्टरचा पुतण्या होता. तेव्हां त्यांच्या रातील वडील मडळीपैकी कोणीतरी म्हणाले कीं, फाटक नि लेले यांचा र्वीचा नात्याचा सबध तुटला म्हणून आता ही मुलगी डॉक्टरांच्या पुतण्याला रून घ्या म्हणजे पूर्वीचा सबध पुन्हां जोडला जाअील. हें अैकतांच ती ोटीशी पांच सहा वर्षांची मुलगी कोपऱ्यांत जाऊन फुरगटून बसली नि डूं लागली. शोध करतां ती म्हणाली 'हें काय? तो माझा पुतण्या आणि ाच्याशीं मी लग्न कसें करूं!'

तरीपण तिच्या बोलण्याकडे वडील मंडळींनी लक्ष दिलें नाहीं. पुढें ॉक्टरांची बदली बेळगांव येथें झाली. डॉक्टरांनीं आपला मुलगा बरोबर ाहण्यासाठीं तेथें नेला. त्या वेळीं डॉक्टरांचें दुसरें लग्नहि झालें होतें. ही लगी साधारण मोठी झाली होती. म्हणून तिलाहि तिकडे कांहीं दिवस ाहण्यासाठीं नेलें होतें. अेक दिवस डॉक्टरांची दुसरी बायको स्वयंपाक

करीत होती नि त्या मुलीला त्यांनी वाढण्यास सांगितलें. तिने मेतकूट खूप घट्ट करून वाढलें. तेव्हां डॉक्टरांची बायको म्हणाली 'अगे मेतकूट अितकें घट्ट कशाला? जरा पातळ कर.'

तेव्हा ती मुलगी म्हणाली, 'अिश्श! अग माअी तुला माहीत नाही कां अिकडे मेतकुट घट्ट आवडते.' अुपवर मुलीच्या तोंडून असे शब्द अैकताच डॉक्टरांची पत्नी रागावून म्हणाली 'अिकडे म्हणजे काय ग? असे काय बोलतेस?' तेव्हा ती म्हणाली 'अग मला माहीत आहे. आम्ही सावंतवाडीस होतो. तेथे तें मोठें घर, ती भांडी, ते सर्व कांही मला आठवतें.' सावंतवाडीचा अुल्लेख करतांच डॉक्टराना त्याच्या प्रथम पत्नीच्या सहवासातील सावंतवाडीची आठवण झाली नि त्याच्या डोक्यात चक्क प्रकाश पडला. आपली पत्नीच पुन्हां मेव्हणीच्या स्वरूपात जन्माला आली आहे हे त्यांना पटलें."

---

## (ठ) पोलंडमधील अुदाहरण

**घटना १३ वी:—**पोलंडमध्ये बाल्टिक समुद्राच्या किनाऱ्यावरील बंदर ग्डिनियामध्ये मरीया स्झानाव्लोवना नावाची अेक मुलगी आपल्या अेका भौतिक विज्ञानशास्त्रवेत्या चुलत्याजवळ राहते. तिच्याविषयी अिंग्लंडमधील 'आब्झर्व्हर' पत्राचा बातमीदारहि लिहतो, "पोलंडच्या ओस्किव्हिया नांवाच्या सैनिक बंदरी आपल्या नातेवाअिकाबरोबर ती गेली. तेथील चर्च नि त्याजवळील प्रेतभूमी (ख्रिस्त्यांत प्रेते पुरण्याची चाल आहे.) जवळून जातांना ती अेकाअेकी पांढरी फिकट पडली आणि अुद्गारली, 'मी येथेंच पुरलें गेलें होतें.' लगेच मूर्छित होअून खाली पडली. ती शुद्धीवर आली तेव्हां ती आपला पूर्वजन्मीचा विलक्षण वृत्तान्त सांगूं लागली. ती म्हणाली, 'मला ही जागा चांगली आठवते आहे. मला पूर्वी येथें पुरलें होतें. मी त्या वेळीं अेका मच्छीमाऱ्याची बायको होतें. माझें त्या वेळचें नांव ओलोस्क असें होतें. पुढें ती सांगूं लागली. त्यांत तिचा पती स्वीडनशीं झालेल्या सतराव्या शतकाच्या पोलीश युद्धांत मारला गेला आणि तेथील

बहुतेक लोक नष्ट झाले. पुढें ती आपल्या दोन मुलांसह मासे धरण्याचा व्यवसाय करीत असतां अेके वेळी पाण्यांत बुडून तिला मृत्यु आला. तिचें प्रेत येथें पुरलें गेलें होतें. तिनें दिलेल्या युद्धाचा वृत्तान्त त्या वेळच्या वृत्तान्ताशीं तंतोतंत जुळतो. ती आपली कामें नित्याप्रमाणेच करीत असते. तिच्या मेंदूत काही बिघाड झाल्याचें आढळून आलें नाही. डॉक्टरांनी तपासतां तिची प्रकृति अति अुत्तम आहे असें सांगितलें. तेव्हां शरीरांत वा मेंदूत कांहीं बिघाड न होतां ती जागृत झालेली पूर्वस्मृति आहे असें त्यांनीं ठरविलें."

---

## (ड) यथार्थ पूर्वजन्मस्मृति

**घटना १४ वीः**—लंडनच्या 'संडे अेक्सप्रेस' मध्यें 'यथार्थ (genuine) पूर्वजन्मस्मृति' या मथळ्याखालीं खालील घटना प्रसिद्ध झालेली आहे. "जॉर्ज अेच्. कार्टर हे माझें नाव होतें. मी लहानपणापासून झोपेंत अेक विशेष प्रकारची भाषा बोलत असे. ती समजणारे अिंग्लंडमध्यें वा तेथें कोणीच नव्हते. त्यामुळें ही कांहीतरी असंबद्ध बडबड असेल असें समजून आअीबापांनी तिकडे मुळीच लक्ष दिलें नाही. अल्डरशॉटच्या पलटणीत मी १९०७ मध्यें भरती झालों. त्या पलटणीत मी जर्मन हेर आहे अशी वदंता अुठली. कारण जागेपणी मी जरी अिंग्लिश बोलत असे तरी स्वप्नांत जें मी बोलतो ते 'जर्मन' आहे असे समजलें गेल्यामुळें संशय अुत्पन्न होअून तो बळावला. पहिल्यानें पलटणीच्या अधिकाऱ्यांनीं या वदंतेकडे अेक वर्ष लक्ष दिले नाही. पण १९०८ मध्यें जर्मन हेरांच्या अिंग्लंड-मधील विशेष हालचालीमुळें मजकडे विशेष लक्ष वेधलें गेलें.

माझ्या बरोबर असलेल्या मंडळींनी मी अगदीं जर्मनच आहें असें शपथ घेअून सांगितलें. मला सैनिक वरिष्ठ अधिकाऱ्यापुढें अुभें केलें आणि शक्य तितक्या प्रकारें माझ्या पूर्व आयुष्याची चौकशी झाली. मी त्या वेळीं १९ वर्षांचा होतों. मला केंब्रिज रुग्णालयांत धाडलें. तेथें गेल्यावर माझ्यावर कडक पहारा ठेवण्यांत आला आणि माझी वैद्यकीय पाहणी सहानुभूतिपूर्वक होअूं लागली. तीन आठवड्यांनीं मला तेथून मुक्त केलें.

मला पुन्हां पलटणीत आणल्यावर माझे सैनिक अधिकारी कर्नल टॉलिन यांच्यापुढें अुभें केलें नि ते विचारणा करू लागले.

कर्नल:—'तू हिंदुस्थानांत वा ब्रह्मदेशात गेला होतास काय?'

मी:—'नाही महाराज'

कर्नल:—'नाही! पण आमच्या शोधात तशी माहिती मिळत आहे.'

मी:—तथापि हे अगदी चमत्कारिक आहे. ते चमत्कारिक (Strange) काय याचें कोडें मला अुलगडावयाचे होते. १९०८ मध्ये शेवटी मला मीरतला पाठविल्या जाणाऱ्या तुकडीत पाठविण्यांत आले. तेथें फार दिवस झाले नाही तोंच झोपेंत मी तद्देशीयासारखे बोलतों आहें असें सर्वच लोक बोलूं लागले. १९०९ मध्यें आह्मी मीरत सोडून 'मेमियो' नामक अुत्तर ब्रह्मदेशांतल्या स्थली गेलों. तेथें गेल्यावर या ब्रह्मी लोकाना मी पूर्वी पाहिलेलें असून ते अगदी ओळखीचे असलेले असे मला भासू लागले आणि त्यांची भाषा मला परकी भासत नव्हती. मी ही भाषा अैकली आहे—मला ती भाषा येत आहे. याविषयी मला निश्चिति वाटू लागली. माझें झोपेमधील विशेष भाषेचें बोलणें चालूंच होतें आणि ज्यांनी ज्यांनीं तें अैकलें ते अगदी थेट हें ब्रह्मी बोलणें आहे असें म्हणत. माझ्या लहानपणाची बडबड आणि पुढें 'जर्मन' वाटणारी भाषा हीच शेवटीं ब्रम्ही भाषा ठरली. मी हेर असल्याची कल्पना नाहीशी झाली. सर्वांना असें वाटलें की, पूर्वी हा ब्रम्हदेशांतील पलटणींत असावा, तींतून परत अिंग्लंडमध्यें गेला असावा नि पुन्हां या आतांच्या पलटणींत भरती झाला असावा. नाहींतर ही ब्रम्ही भाषा याला यावी कशी? सर्वांनीं मनांत पक्कें आणलें कीं, मला ब्रम्ही येते नि बोलूंहि शकतों. मी अगदीं शपथा घेअून 'मला ब्रम्ही येत नाहीं' असें सांगत असे तरीहि त्यांना तें खोटें भासलें. माझ्या कंपनीच्या अधिकाऱ्यानें मला मुख्य सेनाधिकारी ओमिरीकडे पाठविलें. तेव्हां त्यानें विचारलें 'कां? खरें कां सांगत नाहींस? तुला ब्रम्ही निश्चित येते आणि तूं पूर्वी सैन्यांत

असणें शक्य नाहीं. पण तू नागरिक या नात्यानें तरी लहानपणी येथें असलाच पाहिजेस.'

दुसऱ्या दिवशी आम्ही अिरावती नदी ओलांडून गेलो तेव्हा मी पूर्वीहि ती नदी ओलाडून गेलो आहे असे मला वाटूं लागले. मी लान्स-कार्पोरल कॅरिगनला सांगितले की, या नदीच्या पलीकडे अेक मोठे देअूळ असले पाहिजे. त्या देवळाच्या भिंतीत अगदी कळसापासून तो खालपर्यंत अेक मोठी भेग पडलेली असून जवळच अेक मोठी घंटा असली पाहिजे.

आम्ही मिगनला गेलो. तेथे देवालय नव्हतें. नतर दोन दिवसानी आम्ही मॅगॉनला आलो. मी वर्णिलेले देअूळ तेथे होतें. कॅरिगननें काय सांगितले ते मला माहित नाही. पण दुसऱ्या दिवशी मला कर्नल ओमिरीपुढें अुभे राहावे लागले. कर्नल म्हणाला, 'कार्टर, खरे का सांगत नाहीस! तूं अिकडे पूर्वी होतास हे निश्चित!' मी या वेळी म्हणालों, 'मलाहि वाटतें की मी पूर्वी या देशात होतो. पण कसा नि केव्हा हे काही मला कळत नाही. पण मी जन्मापासून अेकदांहि या देशात यापूर्वी आलों नाही. मला याचें कांही स्पष्टीकरण करता येत नाही. यावर कर्नल विचारतो, 'मग तूं ब्रम्ही भाषा कोठें शिकलास?' तेव्हा मी अुत्तरलों, महाराज मी अगदी प्रामाणिकपणें सांगतों की, मला त्यातील अेकहि ब्रम्ही शब्द येत नाही. आपण खोटें समजूं नका. ही खरीच वस्तुस्थिति आहे. कर्नल म्हणाला '.नाहीं! झोपेत तूं ती भाषा अगदी अुत्तम प्रकारें बोलतोस तेव्हां तू म्हणतोस हें खरें कसे?'

त्या रात्री मला चमत्कारिक स्वप्ने पडलीं. स्वप्नांत मी देवळापासून दूर पळत असून त्यांतील भगवीं वस्त्रें परिधान केलेले आणि साध्या वेषाचे ब्रम्ही लोक माझ्या मागें धावत माझा पाठलाग करीत आहेत असें दिसलें. त्या वेळीं माझ्या पाठीत तीव्र वेदना झाल्या असे मला आठवतें. अेकुणीस दिवसांनीं मी शुद्धीवर आलों. मी त्या वेळी मेमियो येथील सैनिक रुग्णालयांत होतों. १९ दिवसपर्यंत मी मूर्च्छाग्रस्त होतों. डॉक्टर आणि तेथील परिचारिका मामाहून मी त्या मूर्च्छेत ब्रम्ही भाषेत मधून मधून

किंचाळून बोलत असे, असे सागूं लागले. नंतर अंगावर तीन स्थली सूज आली. पुढें आठवडयात दोनदा माझे हात नि मनगटें सुजून दुप्पट मोठालीं होअूं लागली आणि तशा स्थितींत ती सूज चोवीस तास राहत असे. त्यामुळें मला रंगून, नंतर लेबांग नि तेथून दार्जिलिग येथें सैनिक रुग्णालयांत ठेवले गेले. दार्जिलिगमध्ये सर फ्रेडरिक ट्रेव्हेस यांनी मला तपासलें. पुढे लेबांगला नअू महिने मी डॉक्टरी निरिक्षणाखाली होतो. तरी तेव्हांहि स्वप्नांत माझें ब्रह्मी भाषेतील बोलणें चालूंच होते.

अेक हिदुस्थानीय डॉक्टर ह्मणाला, 'ही सर्वस्वी अकृत्रिम नि निःसंशयपणें सत्य अशी पूर्वजन्मीच्या स्मृतिचीच घटना आहे पूर्वीच्या ब्रह्मी माणसाचा हा साप्रतचा अिंग्लिश मनुष्य ह्मणजे पुनर्जन्मातील देहधारणच आहे यांत शंका नाही. यानतर माझा नित्याचा आजारी मनुष्य म्हणून अिंग्लंडमध्यें नेटलेच्या रुग्णालयांत पाठवण झाली. अुष्ण प्रदेशांतील रोगाचे तज्ञ डॉक्टर येअून वारंवार मला तपासीत असत. तेव्हा मी जे स्वप्नांत बोलतों तें निःसशयपणें शुद्ध ब्रम्ही भाषाच बोलतों हे शेवटी सर्वांनी मिळून निश्चित केले. अितके झाल्यावर हिदुस्थानातील डॉक्टर लोकानी ही पुनर्जन्माचीच घटना आहे असें ठरविले.

माझा विश्वास आहे की, मी ब्रम्हदेशात निश्चित होतो. देवळांत मी कांहीतरी अपराध केला आणि त्याकरितांच रॅगॉनच्या देवळाजवळ मी मारला गेलो. जे मी काही दुःख सध्या भोगीत आहे ते माझ्या पूर्वजन्मीच्या दोषांचें प्रायश्चित्त म्हणूनच भोगीत आहे. या व्यतिरिक्त दुसरें काही नाही." याप्रमाणे त्या गृहस्थाने आपले आत्मवृत्त अिंग्लडमध्यें 'सडे अेक्सप्रेस'च्या अंकांत प्रसिद्ध केले.

---

# दिल्लीची शांतिदेवी

**घटना १९ वी:—**दिल्लीला कुमारी शांतिदेवी नांवाच्या अेका मुलीला पूर्वजन्माची स्मृति अगदी लहानपणींच अुद्भवली. तें वृत्त अगदीं ताजें म्हणजे १९३६ या वर्षांतील आहे त्यासंबंधीची माहिती अधिकृत-रीत्या नि सत्यशोधनप्रयत्नपूर्वक परीक्षण करून प्रसिद्ध व्हावी म्हणून अेक परीक्षण मंडळ श्री. देशबधु गुप्त–दैनिक तेजचे संचालक, प. नेकीराम शर्मा अेक प्रसिद्ध पुढारी नि श्री. ताराचद माथुर–अॅडव्होकेट यांचें स्थापलें जाअून त्यांच्या करवी अधिकृत प्रतिवृत्त प्रसिद्ध झालें आहे. त्यांतील संक्षिप्त वृत्तान्त येणेंप्रमाणे. —

दिल्लीला चीराखाना मोहोल्ल्यांत श्री. बी. रंगाबहादुर माथुर यांना शांतिदेवी नांवाची अेक मुलगी १९२६ ला ता. १२ आक्टोबरमध्यें झाली ती ४ थ्या वर्षापासून आपलें पूर्ववृत्त सागू लागली. पहिल्यानें तिच्या-कडे कोणी फारसें लक्ष दिलें नाही. पुढे रामयश हायस्कूलमधील श्री. किशनचंद नावाच्या अेका चिकित्सक गृहस्थास हें कळून त्याने या गोष्टीच्या सत्यासत्यतेचा छडा लावण्याचा निश्चय केला. पुढें वरील तीन गृहस्थांचें मडळ नेमलें जाअून ती जो वृत्तांत सागत होती तो सर्व प्रकारें खरा ठरला. तिच्या पूर्वजन्मीच्या पतीला, मुलाला, दिराला तिने ओळखलें. तिचा पूर्वजन्म मथुरेला झाला होता. म्हणून तिला मथुरेला नेलें. ती पूर्वी मथुरेला कधीहि गेलेली नव्हती. परंतु ही अगदी ९-१० वर्षांची लहान मुलगी तांगे-वाल्याला रस्ते दाखवीत घेअून गेली. घर ओळखलें. तेथील द्वारकाधीशाचे मदिराचें वर्णन केलें. शेजाऱ्यांचें वृत्त कथन केलें. ती घरीं गेल्यावर अेका स्थली तिनें पूर्वजन्मी १०० रुपये पुरून ठेवले होते तें वृत्त तिला आठवलें. तिनें खोदून पाहिलें. रुपये ठेवलेली पेटी होती. पण रुपये सांपडले नाहींत. पुढें तिच्या पतीनें रुपये काढून घेतल्याचें मान्य केलें. तिनें पूर्वजन्मीच्या आअीबापासही ओळखलें.

हा वृत्तान्त प्रसिद्ध झाल्यावर पुनर्जन्मादि गोष्टी सब झूट आहेत असा मूंह करून घेतलेल्या मंडळींना आपल्या नास्तिक्यवादावर हा कुठाराघातच

झाला आहे असे वाटून त्यांनी या गोष्टीचा छडा लावून 'बिंग' फोडण्याचा निश्चय केला. त्या मुलीच्या हकीकतीनें कित्येक विचारवताना बेचैन केले ; या सपूर्ण भौतिक जगात अशी गोष्ट झाली कशी ! कपटाचा संशयसुद्धा येणार नाही अशा तऱ्हेनें या गोष्टीची नोंद झाली कशी ! अशा 'बुद्धिवादी' नास्तिक मडळीच्या आवडत्या नास्तिक्याने ग्रस्त झालेल्या मनाना किंचित्काळ अस्वस्थता भामून मळमळूं लागले. हिंदू कॉलेजातील प्रो. अिंद्रसेन पी. अेच्. डी. नि कलकत्याचे बुद्धिवादी वालचद्र नाहरा हेहि तेथे जाअून थडकले आणि विशेषतः पुण्याचे प्रज्ञानेश्वर यति (पूर्वाश्रमीचे श्री. श्रीकृष्ण सदाशीव घारपुरे) हेहि तेथें गेले. या स्वामीनो तेथे जाअून दिल्लीस शातिदेवीची भेट घेतली. ती मुलगी सागते ने सर्व बनावट नि ढोंग आहे असे म्हणणे दुराग्रहाचेंच ठरेल या भीतीने की काय कोणास ठाअूक त्यानी त्या मुलीची भेट घेअून बोलणें होताच ती मुलगी 'गतकाळचा' ( neurotic ) स्वभावाची आहे असें (हे गृहस्थ डॉक्टर नाहीत) ठरवून टाकले आणि तिच्याशी बराच वेळ संभाषण करून पुढील निष्कर्ष काढला.

(१) याच जन्मांतील वृत्तान्त विचारला असतां तिला नीट अुत्तरे देतां येत नाहीत.

(२) गेल्या जन्मीं मुलगी लिहिणें वाचणें शिकली होती. पण शांतीला अक्षरज्ञान मुळींच नव्हतें.

(३) वैवाहिक जीवनाची तिला मुळींच कल्पना नाही.

(४) तिच्या अुत्तरांत प्रौढपणाचा अंशहि नाहीं.

(५) आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या वृत्तान्ताशिवाय ती नवीन असे कांहींच सांगूं शकत नाहीं. विचारल्यावांचून तोच तो वृत्तान्त पुन्हां पुन्हा सांगते.

याची शंकानिवृत्ति करण्यापूर्वी या पांच कारणांत खरोखरीच खोटेपणाचा गंभीर आरोप खरा नि योग्य ठरूं शकेल असें अेकहि कारण नाहीं; तथापि सामान्यतः वरवर बघणाऱ्याला हींहि कारणें खरी वाटून त्या घटनेच्या सत्यतेवरील विश्वास अुडून तत्सम अितर अुदाहरणांविषयींहि

संशय वाटूं लागेल. तसें न व्हावे म्हणून या कारणांचा समाचार घेणें अत्या-वश्य आहे. या लोकाचा बुद्धिवाद हा खरा विचिकित्सक बुद्धिवाद नसून नास्तिकतेचा हट्टाग्रह आहे, हे स्पष्ट दिसून येअील. कारण वरील घटनेची सत्यता परीक्षक मडळाकरवी ठरताच ही मडळी 'बेचैन झाली.' अेखादी गोष्ट खरी वा खोटी ठरली तर त्याप्रमाणे आपल्या आतांपर्यंतच्या समजुती बदलणे हीच गोष्ट सत्यप्रिय मनुष्याला स्वाभाविक असावयाची. पण यानी नास्तिकतेचा स्वीकार केलेला असता ते मत खोटे ठरणारे अुदाहरण सत्य ठरताच त्याच्या पक्षाभिनिवेषाने त्याना 'अस्वस्थ' केले. यातच त्यांच्या मताभिनिवेषाचे प्रतिबिंब आहे सत्यान्वेषणाचा गंधहि दिसत नाही हे अुघड आहे. असो.

१ कारणाला अुत्तर.—या जन्मातील सर्व स्मृति स्मरणारा भाग्यवान् पुरुष कोणी क्वचितच असेल तरीहि पण लहानपणीच्या कांही विशेष गोष्टीचा ठसा हा पुढे सतत आठवत राहतो आणि तरीहि त्या गोष्टीशी सबध असलेल्या अितर घटना आणि बाकी सर्व गोष्टी मुळीच स्मरत नाहीत. म्हणून ती स्मृतीत टिकून राहिलेली गोष्ट खोटी कशी म्हणता येअील! सर्व गोष्टी आठवत नाहीत म्हणून आठवत असलेली गोष्टहि खोटी हा युक्तिवाद विचित्र म्हणावयाचा. तेव्हा पहिल्या कारणांत अविचारी हट्ट वा बालिशता आहे असेच ह्मणणें भाग आहे.

२. या शातिदेवीचे अुदाहरणापूर्वी आपण पाहिलेल्या अुदाहरणांतील कार्टरला पूर्वजन्मीची अम्ही भाषा या जन्मीं स्वप्नात अुत्कृष्टपणें बोलतां येत असून सुद्धा जागेपणीं मात्र अेक शब्दहि त्याला बोलतां येत नसे—समजू शकत नसे. अेकाच देहाच्या जागृति नि स्वप्नावस्थेतील स्मृतीची ही गोष्ट तर देहांतरांतील लिहिणें वाचणें शांति विसरली असली तर त्यांत अस्वाभा-विक असें काय आहे! कार्टरला मी तेथें होतों—ही भाषा आपल्याला निश्चित माहित आहे हें अगदीं पक्केपणें वाटून सुद्धां त्याला प्रत्यक्षपणें तें सर्व आठवूं शकलें नाहीं. त्याचप्रमाणें शांतीला लिहिणें वाचणें आठवलें नसलें तरी त्यामुळें तिच्या बाकीच्या आठवणी खोट्या म्हणण्याला कांहींच योग्य कारण नाहीं. आठवल्या तर सर्व आठवणी आठवतात—नाहींतर मुळींच

आठवत नाहींत–थोड्या आठवणी आठवून बाकीच्या आठवणी न आठवणें असें घडणें अशक्य आहे असें अनुभवाला येत नाही. तेव्हां हेंहि कारण चिकित्सक बुद्धीला योग्य वाटणारे वा पटणारे नाही.

३ तीच गोष्ट वैवाहिक जीवनाच्या विस्मरणाची. वैवाहिक कल्पना म्हणजे स्त्रीपुरूष समागमाची गोष्ट. सामान्यतः ती गोष्ट व्यवहारात स्पष्टपणानें बोलणे, सागणें वा अुच्चारणें ही गोष्ट शिष्टसंमत नि नीतिमान्य समजत नाहींत आणि म्हणूनच ती शब्दांत बोलण्यात वा चर्चिण्यांत न आणता तिचा अुल्लेख करावयाचा नाही, अशा मनोवृत्तीच्या निग्रही दाबाखाली–जणूं काही ती गोष्ट स्मरणांत साठवूं द्यावयाची नाही–याप्रकारे मनांत दडपून टाकलेली असते. आणि म्हणूनच तिचे विस्मरण होणे मानसिक व्यापारांच्या परिणामदृष्टीने अगदी स्वाभाविक आहे आणि म्हणून ती गोष्ट स्मरण्यापेक्षां विस्मरणेंच अधिक शक्य नि संभवनीय आहे. तेव्हा हेंहि कारण व्यर्थ आहे.

४ नि ५. आतां अुरले चवथे नि पांचवें कारण. अेखाद्याला स्मरण असलेल्या गोष्टी त्याने सागून टाकल्यावर मग तो आणखी 'नवनवे' काय सांगणार! प्रत्येक वेळी नवनवे सागण्याची अपेक्षा म्हणजे नवीन कल्पनच सागण्याची अपेक्षा करण्यासारखी आहे. त्या मुलीला आठवत असलेले सर्व स्मृतिकण परीक्षणमंडळाचे विचिकित्सकानी प्रश्नावलीच्या खोदणीनें अुकरून काढून घेतल्यावर मग अधिक नवनवें तिच्याजवळ काय नि कसें अपेक्षावे! नवनवे स्मृतिकण अपेक्षिणें हें असमंजसपणाचें आहे आणि म्हणूनच पांचवें कारण म्हणजे कारण या नावानें असमंजसपणाचे प्रदर्शन करणें आहे. चवथ्या कारणांत तर कांहीच अर्थ नाही. अलौकिक सामर्थ्याचीं मुलें आपलें असामान्य सामर्थ्य व्यक्त करतात. तेवढी गोष्ट सोडून देतां त्यांचा स्वभाव नि तदनुसारी वर्तन बालशरीरसुलभस्वभावीच असतें. त्या मुलांच्या बाकीच्या व्यवहारांत त्या अलौकिक सामर्थ्याबरोबर गंभीरपणाहि असतोच असें नाही. त्याचप्रमाणें शांतिदेवीच्या स्वभावांत जर बालिशपणा असला तर त्यांत आश्चर्य करण्यासारखें व अस्वाभाविक असें कांहींच नाहीं.

आणखीहि एक घटना नुकतीच घडली आहे. ती घटना पहिल्याने पाहून मग त्यावरून निघणारी निगमने बघूं. या वर्षी क्वेटाला झालेल्या भूकंपात एक हिंदु मनुष्य पडत्या घराखाली दबला गेला. जीवनशकेंत पडलेला हा दुर्दैवी मनुष्य पुढे अुकरून काढला गेला. त्या मरणसकटाच्या धक्याने त्याची पूर्वस्मृति पूर्णपणें नष्ट झाली. अशा या कोऱ्या मनस्थितीत तो मुसलमानाच्या हाती सापडला. तो कदाचित् त्याच्या नातेवाअिकाकडून ओळखला जाअील नि आपले हातचें हें भक्ष्य निसटेल या सभय शकेने मुसलमानानी त्याला अगदी अज्ञात अशा स्थली नेले. आणि जणूं या नवजात प्रौढ शिशूच्या मनांतील प्रेमाला कोणताच अवलब न राहिल्याने त्या मुसलमान लोकानीं करून दिलेल्या मुसलमान बायकोवर त्याचें अत्यंत प्रेम बसून तो आनंदाने कालक्रमण करू लागला. पुढे काही दिवसानी त्याच्या मूळ गांवी असलेल्या रावळपिंडीमधील त्याच्या अेका नातेवाअिकाची तो राहत असलेल्या जवळच्या गावी गाठ झाली नि त्याने त्याला ओळखले. त्या नातेवाअिकाने त्याचे आअीबापादिकाची ओळख सांगितली. तथापि त्याला ते काहीच न स्मरल्यामुळें ते सागितलेले कांहीच पटेना. कदाचित् घरी नेल्यास त्याची पूर्वस्मृति जागी होअील अशा कल्पनेने त्याला मोठ्या युक्तिप्रयुक्तीने नि विनवण्या करून रावळपिंडीला नेलें. तरीहि त्याला स्मृति होअीना—आणि तो सध्या मुसलमान या नात्याने नवपरिणत मुसलमान वधूसह आनंदाने कालक्रमण करीत आहे. ही घटना टाअिम्समध्यें १९३७ फेब्रुवारीच्या अकी प्रसिद्ध झाली आहे.

या घटनेंत त्या पूर्वहिंदु मनुष्याला स्मृति नष्ट झाल्यामुळे पूर्वीचे आयुष्य नव्हतें आणि जमिनींतून तो अेकाअेकी वयस्क स्थितीत जन्म पावला असें हे नास्तिकब्रुव मानावयाला सिद्ध होतील काय! त्याची पूर्वस्मृति नष्ट जरी झाली असली तरी त्याचें पूर्वायुष्यांतील हिंदु व्यक्तित्व नि आजचें मुसलमान व्यक्तित्व हीं भिन्नभिन्न नसून अेकच अधिष्टानावर आरूढ आहेत. त्या निरनिराळ्या दोन व्यक्ति आहेत असें म्हणण्याचें धाडस कोण करूं शकेल! हिंदु आयुष्यांतील विद्यादि गोष्टी विसरला असला तरी शरीर तेंच आहे. शरीरांतील मेंदूहि तोच आणि तरीहि पूर्वाभ्यस्त गोष्टी आठवूं

शकत नाहीत तेव्हां शरीरादि सर्व गोष्टी नष्ट झाल्यावर होणाऱ्या पुनर्जन्मांत पूर्वगोष्टी स्मरत नाहीत म्हणून पुनर्जन्मच नाही वा कोठें स्मृति अुदित झाली तरी पूर्णपणें सर्व गोष्टी आठवत नाहीत म्हणून पूर्वजन्मस्मृति खोटी हा कार्यकारणभाव यथार्थ म्हणता येत नाही आणि कदाचित् कांही विशेष कारणवशात् जर पूर्वजन्मातील स्मृतिचित्रें मनापुढें आली तरी सर्वच चित्रें आठवत नाहीत म्हणून आठवलेल्या गोष्टीहि बिघडत्या मेंदूच्या भ्रामक क्रिया आहेत असे म्हणणें हटवाद वा बालीश बडबडच ठरेल. ते तर्कशुद्ध निगमन नव्हे.

---

## दोन जीवांचे परस्पर देहांतर

**घटना १६ वीः—**जगांत अशा घटना प्रत्येक देशातून कमी अधिक सख्येत घडत असतात नि मधून मधून त्या लोकदृष्टीपुढें येनहि असतात. परंतु यापुढें जी घटना येथे दिली जात आहे ती तशी हजारो वर्षांतून अेखाद्या वेळीच घडत असली पाहिजे नि ती जीवाला देहातरप्राप्ति आहे, मरणोत्तर जीवाला पूर्ण शक्तीसह देहापासून स्वतंत्र अस्तित्व असतें या गोष्टी निर्विवादपणें सिद्ध करणारी असल्यामुळे ती घटना या अुदाहरणमालिकेत अगदी शेवटीं अत्यंत निर्णायक म्हणून दिलेली आहे. ती घटना सेंटपीटर्सबर्ग येथें 'मेडिकल जर्नल' साप्ताहिकांत आली नि त्यानतर 'फिलासफिकल अिन्क्वायरर'मध्ये दिलेली आहे.

रशिया देशांत अुराल पर्वताचे अकावर वसलेलें ओबर्न वा ओवेनबर्ग नांवाचें अेक नगर आहे. तेथें अेके वर्षी त्या नगराचा अिब्राहिम नांवाचा अेक यहुदी व्यापारी तापानें अत्यंत आजारी होता. (हें वर्ष १८७४ आहे.) सेप्टेंबर ता. २२ ला अर्धरात्रीं त्याच्यापुढें अेक भयानक विचार-दृश्य अुत्पन्न होअून त्यामुळें त्याला फार कष्ट झाले नि तो धडपडूं लागला. तेथें जमलेल्या वैद्यांनीं त्याचा अंतसमय जवळ आला आहे असें सांगितलें. कांहीं मह्वांना बोलावून आणलें. अंतिम प्रार्थना झाल्या-अंतिम दीप लावले गेले नि तो मेला असें ठरलें. कांहीं वेळ असा जात असतां नि अिकडे

त्याच्या अंतिम देहसंस्काराची सिद्धता होत असतां त्याचे डोळे अुघडले. तो चोहोंकडे अत्यंत आश्चर्ययुक्त दृष्टीनें निरीक्षण करून बघू लागला आणि त्यानंतर तो मनुष्य झोपीं गेला. तेव्हां डॉक्टरनें सांगितलें कीं, झोप लागली हें त्याचे आरोग्याचे दृष्टीने हितकर आहे. प्रातःकाल झाली. तो जागा झाला आणि भोंवताली कांही अुद्विग्नतेंत नि कांही प्रसन्नतेंत असलेलीं त्याची बायकामुलें तो जागे होण्याची वाट पाहत बसली होतीं, त्यांचेकडे पाहूं लागला. तो बरा होअून अगदीं चांगला जागा झाला असें पाहून त्याची पत्नी त्याचेकडे सरकून चिंताविमुक्ततेंत आनंदितपणें त्याला मिठी मारावयाला पुढें झाली. परतु त्या मनुष्याने तिला हातानें स्तूण करून दूर सारली आणि विचित्र भाषेंत कांहीं वस्तु मागितली. ज्या भाषेंत तो बोलला ती भाषा तेथें कोणालाहि समजणे शक्य नव्हतें. येथें हें सांगितलें पाहिजे कीं हा अिब्राहिम रंगानें काळा, अुंच बाध्याचा नि कुबडा असून त्याचे डोळे काळेभोर, नाक लांब नि लांब काळी दाढी त्याला होती. तो अिब्रानि भाषा नि काहीशी मोडकी तोडकी रशियन भाषाच काय ती जाणत होता. आता तो अशी काहीं विलक्षण भाषा बोलूं लागला की, तेथे ती कोणालाच समजेना. डॉक्टर आले पण त्यानाहि ती भाषा समजूं शकली नाहीं. जों जो बायकामुलें जवळ येअूं पाहत तो तो तो त्याना दूर ढकलून देत असे. अत्यंत भयकर तापानें तो वेडा झाला आहे असे डॉक्टर महाशयांनी विधान केलें. सर्व कुटुंबीय माणसाना निराशेने घेरल्यासारखे झालें. त्याच दिवसांत त्याचे पत्नीने आपले मातापितरास तेथे बोलावून घेतले होते. ते आले पण अिब्राहिमने त्याना ओळखले नाही, त्याची भाषा जाणली नाही, अितकेंच नव्हे तर आपली भाषा येथें कोणीच कसे समजत नाही याचा त्याला राहून राहून संताप येत होता. अेक आठवडयानें तो अंथरुणावरून अुठला तेव्हां त्याचे बायकोनें त्याचे अंगांत घालावयाचे कपडे आणून दिले. रशियाच्या त्या भागांत जसे कपडे वापरतात तसे ते कपडे होते. ते कपडे अुलटून पालटून चांगल्या प्रकारें परीक्षून पाहिल्यानंतर अेकाअेकी तो हसला. तो बाहेर पळावयाला पाहत होता. परंतु मंडळीनी त्याला थंडी वाजूं नये म्हणून त्वरेनें दारें लावून घेतलीं. त्यामुळें त्याचा बाहेर जाण्याचा प्रयत्न विफल झाला. तेथें असलेल्या आरशासमोर

अेकदा येतांच त्यानें आपल्या देहाचें स्वरूप पाहिलें; तेथें तो थोडा वेळ थांबला आणि अत्यंत आश्चर्य करूं लागला. आपल्या लांब दाढीला नि नाकाला हात लावून अेकाअेकी हंसे नि लागलीच गंभीर चिंतेत निमग्न होअी. हे पाहून भोंवतालच्या लोकांस फार विस्मय वाटे. त्याची स्त्री नि तिचे मातापिता ही विचित्र स्थिति पाहून परस्पराकडे पाहत आश्चर्य व्यक्त करीत. त्याना वाटे की हा कांहीं अिब्राहिम चार्को नव्हे-दुसरा कोणीतरी अपरिचित पुरूष आहे. परंतु अिब्राहिमच्या डोक्यावर जन्मापासून दोन काळ्या रेषा होत्या; दोन महिनेपर्यंत ज्या डॉक्टरांनी चिकित्सा केली त्याना सुद्धां शारीरिक खुणा त्याच असतांहि अिब्राहिम चार्को खिडकीच्या बाहेर पाहून नि सगळ्याकडे दृष्टी फिरवून आश्चर्य प्रकट करतो हे लक्षात आल्यानें विस्मय वाटूं लागला. त्याचे घरचे मडळीने सरकारी डॉक्टर नि अितर डॉक्टर मंडळी यांना बोलावण्याची ममति दिली. सर्व मडळी जमली, त्याची शारीरिक परीक्षा पुष्कळ केली नि शेवटी निर्णय दिला कीं मनुष्य तोच आहे. त्यानतर त्याचे म्हणणे तरी काय आहे हे विचारण्यासाठी त्याला काही कागद दिले. त्याने त्या कागदावर कांही लिहून दाखविलें पण तें तेथे वाचणार कोण! नियमबद्ध नि स्वच्छ लेखन, शुद्ध लॅटिन लिपी पण भाषा मात्र अज्ञेय नि अगम्य. अिब्राहिम याप्रमाणे लॅटिन लिपी कशी नि कोठून शिकला याचा कोणालाहि अुलगडा होअीना. याप्रमाणें काही दिवस गेले. पुढें त्याला सेंटपिटर्सबर्गला विश्वविद्यालयात घेअून जाण्याचा विचार ठरला. हेतु हा की तेथील डॉक्टरमंडळी नि विविधभाषाकोविदाकडून या कोड्याचा निर्णय लागेल. तेथें गेल्यावर तेथील विश्वविद्यालयातील प्रो. अर्लो यांनीं अिब्राहिमचें बोलणें अैकल्याबरोबर जाणलें की, ही अिंग्रजी भाषा आहे. कारण ते अिंग्लिश जाणत होते. आपली भाषा जाणणारा मिळाला याविषयीं अिब्राहिमला आनंद झाला नि प्रोफेसरशीं कांहीं वेळ वार्तालाप केला. प्रो. अर्लोनें सांगितलें कीं, अिब्राहिम हा अेक बुद्धिमान अिंग्रज आहे. परंतु बायको म्हणाली कीं, अीश्वराला स्मरून सांगा कीं माझा पति अिंग्रज कशानें झाला? अिब्राहिमकडून त्याचें जीवनवृत्त प्रोफेसरनें अैकलें कीं हा अेक अनपढ यहुदी आहे. तरी त्यांचा विश्वास

येअीना. त्याने अिब्राहिमला अिंग्रजीत विचारले की 'तूं कोण आहेस नि कोठून आला आहेस?'

अिब्राहिम म्हणाला, "मी अुत्तर अमेरिकेतील ब्रिटिश कोलंबिया येथून आलो आहे. माझे खरे निवासस्थान 'न्यू वेस्ट मिनिस्टर' आहे. मला अेक पत्नी नि अेक बालक आहे. परंतु मी या स्त्रीकडे कसा आलो हें अेक परमेश्वराला माहित!" प्रोफेसरने त्याचे बायकोला नि मुलाला दोघानाहि खोटे ठरविले नि ह्मणाले की, तुम्ही या मनुष्याला काहीतरी धोका देअून आणले आहात. प्रोफेसरने या गोष्टीकडे सरकारचे लक्ष वेधविले आणि अिब्राहिमच्या कुलाची विचारणा त्याच्या आसपासच्या लोकाकडून सरकार द्वारा सुरू झाली. याप्रमाणे कित्येक आठवडे परिशोधन होत होते. परतु त्या परीक्षेचा निर्णय काहीच लागला नाही नि हे गूढ गुप्त राहिले. ही अेक आध्यात्मिक आश्चर्याची गोष्ट आहे. मानवी आत्म्याची दैवी प्रेरक शक्ति आहे. याचा अुलगडा होअू शकत नाही असे डॉक्टर लोकानी मत दिले. अिब्राहिम म्हणाला, 'माझे नाव अिब्राहिम आहे. पण मी अिब्राहिम चार्की नसून अिब्राहिम दरहॅम आहे आणि मी माझ्या गावी जाअून माझ्या कुटुंबात राहू इच्छितो. तो दिवस गेला, रात्र गेली, दुसरी सकाळ झाली तो स्त्रीने पाहिले की आपला पति आपल्या अंथरुणावर नाही. तो नाहीसा झाला आहे. ही विचित्र नि अद्‌भुत घटना झार–रशियाचे सम्राट–याचे कानापर्यंत पोहोचली. त्यानी त्याचा ठीकठीक पत्ता लावण्याची आज्ञा केली. पण सर्व व्यर्थ. तो मनुष्य पुन्हा मिळाला नाही. शेवटी तो मनुष्य वेडा होता नि वेडेपणात तो नदीत बुडून मेला असा निर्णय लावून परिशोधकानी आपला गळा मोकळा करून घेतला.

१८७५ मध्ये प्रो. अर्लो हे सरकारी आज्ञेनुसार फिलाडेलफिया येथें कांही कार्याच्या निर्णयार्थ गेले होते. तेथे त्यानी वर्तमानपत्रात वाचले की, 'न्यू वेस्ट मिनिस्टर'मध्ये अशी अेक घटना झाली आहे की, ज्यायोगें ब्रिटिश कोलबियांत नि सीमाप्रदेशात अेक मोठी खळबळ अुडाली आहे.. १८७४ च्या २२ सेप्टेंबरला दिवसा त्या नगरचा अेक व्यापारी अत्यंत

भयंकर तापाने आक्रांत होऊन मरणमय अवस्थेंत होता. त्यापासून वांचेल अशी कोणालाच आशा नव्हती. डॉक्टर लोकांनीं सुद्धां त्याची आशा सोडली होती. परंतु रोगी पुन्हां वाचला आणि चांगल्या प्रकारें बरा झाला. परंतु आश्चर्यजनक हें की, जो अुत्तम बुद्धिवान् अिंग्रज होता तो रोगी आजारी-पणांत आपली भाषा विसरला नि जी भाषा तेथें कोणी बोलत नाहीं नि समजतहि नाहीं अशी भाषा बोलूं लागला. शेवटी त्या नगरांतील अेकानें ही अेक यहुद्यांची असभ्य–रानटी भाषा–आहे असें सांगितलें. हा रोगी पूर्वी अेक सुदृढ मनुष्य होता. पण आतां अगदीं दुर्बल नि कुबडासा मनुष्य झाला आहे. त्याचबरोबर आपल्या स्त्रीला नि मुलाला ओळखेनासा झाला आहे. परंतु अुलट असें सांगतो की माझी स्त्री नि कांही मुलें अन्यत्र आहेत. त्या मनुष्याला वेडा समजत आहेत. पुढें कालांतराने पूर्वदेशाचा अेक प्रवासी आला. त्याची मुद्रा अगदी अिब्राहिमसारखी दिसत होती. तो म्हणतो की संबून (अेक जातीचें फल) विकणाऱ्या स्त्रीचा मी पति आहे. त्या स्त्रीशी, तिचा पति बोलत होता त्या भाषेत- अिंग्लिशमध्ये–बोलत होता. परतु नगरांत राहणारे त्या स्त्रीचे मातापिता त्याला ओळखीत नाहींत आणि तरीहि तो म्हणतो की मी या स्त्रीचा पति आहे नि या मातापितराचा पुत्र आहे. ती स्त्री बिचारी मोठ्या संशयसंकटांत पडली आहे. मी काय करावें असा प्रश्न तिच्यापुढें अुभा आहे. ती वारंवार विचारते की हा पुरुष कोण की जो वारंवार पति असल्याचें निक्षून सांगतो आहे. ती त्याचे बोलणें अैकनें पण देहाचे रूप तें नसल्यामुळे यहुदी मुद्रेचा हा माझा पति होअूं शकत नाहीं असे ती म्हणते. परनु तो मनुष्य वारवार तेच तें म्हणतो नि केवळ पतिपत्नीलाच माहित असलेल्या गुप्त गोष्टीहि खुणेसाठी सागतो."

प्रो. अर्लोनें पूर्वघटना सर्व स्मरण केली आणि मानसशास्त्रीय रह-स्याचा अुलगडा करण्याकरिता वेस्ट मिनिस्टरला जाण्याचा त्यानें निश्चय केला. सहा महिने पूर्वी ज्या यहुदी काळया मनुष्याला सेटपीटर्सबर्गमध्यें पाहिला त्याला तेथे गेल्यावर पाहून प्रो. अर्लोला फार आश्चर्य वाटलें. मग प्रोफेसर अर्लोनें संबूनच्या व्यापाऱ्याला रशियांतील भाषेंत विचारले कीं, तूं कोठून आलास? 'मी ओवेनवर्गहून आलों' असें त्यानें अुत्तर दिलें.

प्रो. अर्लोने सेंटपीटसबर्गमध्यें जी यहुदी बाअी भेटली होती तिचें नांव सांगितलें नि त्याचें नांव विचारलें. तेव्हां तो म्हणतो, "मला हे अिब्राहिम दरहॅम म्हणतात पण मी तो नाहीं. मी अिब्राहिम चार्को आहे. अर्लोनें पाहिलें कीं दोघांचे शरीरांत मुळीच बदल झाला नाहीं अेक जण लहान, धट्टाकट्टा आहे; नि दुसरा सडपातळ, अुच नि काळया रंगाचा आहे. तेव्हां शरीरें तीच पण जीव मात्र परस्पर देहांतरित झाले आहेत असें पुष्कळ विचारांनीं निश्चित ठरविलें.

ओवेनबर्ग नि न्यू वेस्ट मिनिस्टर यांच्यांत अंतर २००० मैलांचें आहे. अेक गोष्ट ध्यानांत घेतली पाहिजे की सेप्टेंबर ता. २२–१८७४ च्या अर्ध्या रात्रीं दोन्हीहि व्यक्ति जीवनमृत्यूच्या सीमेवर अुभ्या होत्या. परस्परांचे जीव मरण न पत्करतां जीवन स्वीकार करते झाले. पण त्याच देहांत प्रवेश न करतां वा न होनां दुसऱ्या देहांत प्रत्येकानें प्रवेश केला आणि याप्रमाणें मरणानंतरच्या पुनर्जन्माचें अेक निर्विवाद अुदाहरण मिळाल्यासारखें झाले. ही दोन्ही नगरें अगदी अेकमेकाच्या समोर आहेत. पृथ्वीच्या दोन बाजू-कडील सरळ रेषेंतील बिंदूवर ही दोन्ही नगरें असून ज्या वेळी अेक्या स्थलीं रात्री १२ वाजतात त्याच वेळी दुसऱ्या स्थली दुपारचे १२ वाजलेले असतात. चार्को रात्री जन्ममरणसमस्येंत होता तर त्याच वेळी दुपारी १२ वाजतां दरहॅम मरणशकेंत सांपडला होता. या गोष्टी विचारांत घेण्यासारख्या आहेत. (आर्य मॅगझिन ऑक्टोबर सन १८८५).

विज्ञानवाद्यांचे 'रासायनिक परिणामानें अुत्पन्न होणारा जीव' हें म्हणणें गृहीत धरलें तर त्या कल्पनेनें वरील अुदाहरणाचा अुलगडा मुळीच होअू शकत नाही. चार्को हा अशिक्षित, यहुदी भाषा बोलणारा आणि सामान्य बुद्धीचा माणूस होता. चार्कोचा हा जीव अशा कोणत्या रासायनिक प्रक्रियेनें अेकदम दरहॅमच्या बुद्धिवैभवाने, अज्ञातभाषाज्ञानानें, स्मृतीनें, कल्पनांनी, भावनांनी, नातेवाअिकांच्या संबंधांनी अेकाअेकी दरहॅमसारखा बनला नि अुलट दरहॅमची बुध्दिमत्ता, भाषाज्ञान अित्यादि सामर्थ्यें कोणत्या रसायनाच्या फरकानें नाहींशीं होअून तो स्वतः अशिक्षित, अडाणी,

यहुदी भाषा बोलणारा नि स्वतःला चार्को समजणारा यहुदी बनला! या अुदाहरणात जडवाद्यांच्या कोणत्याहि कोल्हाटच्या अुड्यांनी अुलगडा केल्याचा आव आणता येण्यासारखा नाही. मागच्या इतर बुध्दिवादाच्या गोष्टी, जडवाद्यानाहि मान्य कराव्या लागणाऱ्या संवेदना–सकल्प शक्तीचे अस्तित्व, असामान्य बुध्दिमत्ता वा कलानैपुण्याने निघणारे निगमन नि पूर्वजन्म-स्मृतीची अुदाहरणें ही सर्व अगदी मोडून देअून अेवढे अेकच अुदाहरण जरी प्रामाणिक नि चिकित्सक बुध्दिवाद्याच्या पुढे ठेवले तरीहि जीवशक्ति ही जडाच्या रासायनिक प्रक्रियेचा परिणाम नसून ती चिन्मय, स्वतंत्र आणि निमित्तानिमित्ताने जडाचा संग्रह करीत त्याला गाबवून घेणारी सज्ञानी शक्ति आहे हें मान्य करणें भागच पडेल

---

## १८ स्पष्टीकरणार्थ आव्हान करणाऱ्या कांहीं विशेष घटना

(१) हरिद्वारचा अेक कुत्तेवाला साधु ह्मणून आळखल्या जाणाऱ्या साधूच्या जवळ अेक घड्याळ सापडलें. ते चोरीचे असल्याचे आरोपावरून त्याला चार दिवसांची शिक्षा झाली होती. तो तुरुंगात गेल्यावर त्याचा सीझर नावाचा कुत्रा त्या तुरुंगाचे दाराशी बसून राहिला. त्याने १॥ दिवस कांही खाल्ले नाही. जेव्हा त्याला तुरुगात त्याच्या धन्याजवळ नेले आणि त्या साधूनें त्याला आपले हाताने भाकरी दिली तेव्हा त्याने ती खाल्ली त्याचेजवळ अेक वानरहि होते. तो चार दिवसानी सुटल्यावर त्या कुत्र्याची नि त्या वानराची भेट झाली आणि चार दिवसाच्या वियोगाने जणू दुःखित झालेले ते दोन जीव प्रेमभावाने वेडे होअून अेकमेकाचे तोंडात तोंड घालीत अेकमेकाला भेटू लागले.

२ गोहट्टी आसामजवळ बारपेटा गावी अेक साधु ९० वर्षाचे वयांत वारले त्याचे शवदहनस्थली बांधलेल्या वृंदावनाजवळ अेक महाविषारी साप बसलेला दिसला. त्या सापाला तेथून काढून लावण्याचा प्रयत्न त्या साधूच्या शिष्यांनीं पुष्कळ केला. पण तो तेथून हालेना अथवा त्या त्रास देणाऱ्यां-वर तो रागहि दाखवीना. येणारे जाणारे त्याला त्रास देत असत. कांहीं

कांहींनी तर त्याला ढकलून देण्यालाहि कमी केलें नाहीं. पण आश्चर्य हे कीं तो साप अत्यंत निरुपद्रवी, क्रोधहीन, अहिंसात्मक साधूप्रमाणें विलक्षण अप्रतिकारी बनून तेथें राहिला.

हा साधू पूर्वी सुप्रसिद्ध शिकारी होता. पण पुढें त्याला आपल्या वृत्तीचा पश्चात्ताप होऊन त्याने साधुवृत्तीनें आयुष्य व्यतीत करण्याचें व्रत पत्करलें होते. हिंदुस्थानांतील सर्व तीर्थस्थानांच्या नि पवित्र क्षेत्रांच्या यात्रा करून शेवटी तो साधु आपल्या जन्मग्रामी आश्रम बांधून राहिला होता आणि त्याने पूर्वी भाकित केल्याप्रमाणें सांगितल्या दिवशी नि वेळी आपला देह सोडला

३ ग्वाल्हेर संस्थानातील शिरपुर जिल्ह्यात अेका गावी (गांवाचें नाव ध्यानातून गळाले) तेथील अेका देवळांत अेके दिवशी १५ फूट लांबीचा नि अेक फूट घेरीचा प्रचंड सर्प शिरला. देवळांत असलेल्या मंडळीची सर्पाच्या या आगमनामुळें भयाने अगदी गाळण अुडून गेली आणि सर्व गोंधळ अुडाला. त्या देवळांत राहणारे अेक सन्यासी जनार्दनस्वामी हे त्या सापाजवळ जाअून ह्मणाले, 'महाराज! आपणाला श्री गीता अैकावी अशी अिच्छा असेल तर कृपा करून वेटोळें घालून मुखानें नि स्वस्थपणानें बसावें. हा आपला दास आपणाला आनंद व्हावयासाठी गीता मोठ्यानें अैकवील.'

त्या सर्पानें ते अैकलें. विनति केल्याप्रमाणें वेटाळें घालून तो बसला, चार अध्याय वाचले गेले. तो सर्प पूर्ण अवधानपूर्वक अैकत बसला होता आणि लागलाच अेकाअेकी नाहीसा झाला. त्या देवळाच्या पुजाऱ्यानें देवळांत नि देवळाच्या सर्व खोल्यांत नि अितरत्र पूर्णपणें शोधलें. पण तो साप कोठेंहि आढळला नाही.

४ नद्याल गावी अेक सहा वर्षांचा मुलगा आहे. विविध रंगी असलेल्या अेका अत्यंत विषारी सापावर त्याचें फार प्रेम आहे. तो त्याचा नित्याचा स्नेही, सवंगडी नि क्रीडाबंधु आहे. त्या सापावर त्या मुलाचें अितकें अत्यधिक प्रेम आहे कीं, कोणी त्या सापाला कांही अुपद्रव देण्याचें वा मारण्याचें नांव काढलें न काढलें तोंच तो काकुळतीनें विनवितो कीं, तो माझा भाअु आहे. तुम्ही त्याला माराल तर मींहि मरेन.

त्या मुलाच्या कपाळावर सर्पफणा असल्यासारखी जन्मतः खूण आहे. तो सर्प अनपेक्षितपणें कोठून तरी अेकाअेकीं अुपस्थित होतो आणि त्या मुलाला विळखा घालून त्याची सोबत करतो. तो मुलगाहि त्याला दूध पाजून त्याला गोंजारीत त्याचे लाड करीत बसतो. त्या मुलाला सापाचें भय वाटत नाहीं, अितकेंच नाहीं तर त्याचे संगतीत त्याला आनंद होतो आणि तो मुलगा त्या सापाशीं कांही विशेष पध्दतीच्या भाषेंन बोलतहि असतो. आअीबापांनीं त्या सापाला टाळण्यासाठी अनेक वेळां घरे बदलली. पण हा साप त्या मुलाला भेटावयाला जेथें जेथें बिऱ्हाड जाअील तेथें तेथें नेमका अुपस्थित होतो हा वृत्तान्त टाअिम्मच्या बातमीदाराकडून टाअिम्सला मिळून तें वृत्त ता. १९-२-३४ च्या अकी प्रसिध्द झालें आहे

५ सिंध प्रांतांत शेखपुराजवळ मंडीमधील देवाला वाहिलेला अेक बैल नि त्या गांवातील अेक कुत्रा याचे परस्परामध्यें फार दिवसांची मैत्री होती. ते परस्पराचे अेकनिष्ठ मित्र होते. त्यांचें खाणें, पिणें, बसणें, अुठणें अेकत्र होत असे-कोणीहि कोणाला विसरत नसे. आपल्या मित्राला वाटेकरी केल्यावाचून अेखादा चागला पदार्थ त्यापैकी कोणीहि खात नसे. कुत्र्याकडे कोणी दुष्ट बुद्धीने पाहूं लागला तर बैल त्याचा समाचार घेअी आणि बैलाला कोणी त्रास देतोसा वाटला तर कुत्रा त्याला सतावून सोडी. अशा प्रकारें हा अकृतिम स्नेह दोघांमध्यें राहून बराच काळ लोटला. पण ही अितरांना कोणत्याहि प्रकारें त्रास न देणारी, निरुपद्रवी नि त्यांना परस्परांना अतीव आनंद देणारी मैत्री कांहीं दुष्टबुद्धि माणसाना पाहवली नाहीं आणि यांची जोडी फोडावयाची अशा कांहीं राक्षसी आनंद अुपभोगणाऱ्या नराधमानीं अनेक खटपटी चालविल्या कुत्र्याला मोह दाखवून बैलापासून फोडावा वा बैलाला मोह पाडून कुत्र्यापासून वेगळा करावा म्हणून हवे तसे निरनिराळे प्रयत्न केले तरी त्यांचें जुग फुटलें नाहीं बळूला कांहीं भाकरी वा खाद्य पदार्थ दिला तर बळू स्वतः खाअून कांही भाग कुत्र्याला ठेवी नि कुत्रा मागून खाअून संतुष्ट होअी. कुत्र्याला कांही पदार्थ मिळाल्यास आपल्यांतील अुरवून बैलाला देअी. शेवटीं ती जोडी कोणत्याहि अुपायानें फुटत नाहीं असें पाहून अेका नीचानें कुत्र्याला गोळी घालून ठार

मारलें या अभेद्य दुकलीतून मित्रप्रेमी कुत्रा मरून पडला. बैलाला अति दुःख झालें. त्यानें अन्नपाणी वर्ज्य करून त्या कुत्र्याचे प्रेताजवळ ठाण मांडलें. तीन दिवस अन्नपाण्यावाचून तो बैल तेथें त्या कुत्र्याचे प्रेताजवळ अुभा होता. हें दुःखी समाधान सुध्दां लाभू न देण्यासाठीच जणू काय तेथील दुष्ट लोकानी त्या बैलाला तेथूनहि हुसकण्याचें काम चालू केले. तेव्हां जसें कांही मित्रप्रेमार्थ मित्रमरणाचे तीन दिवसाचें अशौच्य संपवून आपल्या मित्रघातकी दुष्ट मनुष्यप्राण्यांच्या राक्षसी अपराधाचा प्रतिशोध–सूड–घेण्यासाठी म्हणूनच की काय त्यानें अुग्ररूप धारण केलें. त्याने लागलीच समीपच्या मनुष्यावर आक्रमण करून भयकरपणे घायाळ केलें. तो अत्यवस्थ स्थितीत रुग्णालयात पाठविला गेला. आणखी ५-१० लोकाना त्यानें घायाळ केलें नि आपल्या मित्राच्या हत्येचें अुट्टं काढून त्याची अुत्तरक्रिया केली. शेवटी तीव्रावेगी दुःखाने सतप्त झालेल्या बैलालाहि अेकाने नेम धरून गोळी मारली आणि तो बैल आपल्या मित्राच्या भेटीला परलोकी निघून गेला. बैल मृत्युमुखी पडला.

६ फेरोजपूर (युक्तप्रातात). अेका ९ वर्षांच्या नदीचे अंगी काही विलक्षण शक्ति प्रकट झाल्या आहेत त्याला चोर ओळखणें, सरकारी अधिकारी ओळखणे, त्याला न कळतां पैसे, निर्झरिणी (फाअुंटन पेन) आदिक वस्तु गुपचुप ठेवून त्या कोणाजवळ आहेत हें साग ह्मणताच नेमकें जाअून त्या वस्तूजवळ असलेल्या लोकाना ओळखणें (जाअून पकडणें), या गोष्टी आश्चर्यकारीपणे तो नंदी करतो. महमद अकबर म्हणून तेथील ऑनररी मॅजिस्ट्रेटनें त्या नदीला 'माझा अेक सिव्हिल सर्व्हंट स्नेही आहे तो ओळख' असे म्हणताच तो नंदी सरळ त्या गृहस्थाकडे गेला नि आपलें तोंड त्यानें त्या माणसाला लावलें. पुढें त्याचे डोळे बांधून नंतर त्याला अशाच प्रकारें आणखी निरनिराळ्या माणसांच्या ओळखी काढावयास सांगतां त्यानें डोळे बांधले असतांहि न चुकतां त्या सगळ्या माणसांना ओळखलें. त्या नदीचा पहिला धनी पोलिसांमधील अेक जण होता. पण त्या नंदीच्या अंगच्या या असमान्य शक्तिप्रकटनामुळें त्यानें तो नंदी अेका देवळाला अर्पण केला होता. त्या नंदींत अितर बैलांहून अेका गोष्टीव्यतिरिक्त अधिक कांहीं

खूण नव्हती. त्याचे कपाळावर अेक मांसाचा मोठा गोळा आलेला होता. यावांचून अितर बैलांत नि या बैलांत कांहीच अंतर नाहीं. याची अुंची फार नव्हती. अगदी लहानशा बुट्ट्या बैलाप्रमाणे आहे. अिंग्लंडचे राजे जॉर्ज यांचे राज्यभिषेक प्रसंगी हा विलक्षण बैल अिंग्लंडमध्ये त्याचे चमत्कार दाखविण्यासाठी नेला असल्याचे प्रसिद्ध झाले होतें.

साधूवरील कुत्र्याची निष्ठा आणि कुत्रा नि वानर यांचें स्नेहदृश्य; साधूच्या वृंदावनाजवळ साधूवरील निष्टेप्रीत्यर्थ हिंसावृत्ति सोडून सर्पाचें स्तब्ध बसून राहणे, बैल नि कुत्रा याची मनुष्याचे मित्रप्रेमालाहि लाजविणारी मैत्री—सख्यत्व; नि बैलाचे अंगी असलेले अद्वितीय असे अतींद्रिय ज्ञान; अशा विलक्षण दृश्यासारख्या घटना याविषयी थोडेसे विवेचन करणें अत्यवश्य आहे. मनुष्याप्रमाणेच अितर प्राण्याना आहारनिद्राभय-मैथुनादि गोष्टी सर्वसामान्य आहेत आणि मनुष्यहि जेव्हा केवळ याच वृत्तींना वश होअून या नैसर्गिक वृत्तींना आळा घालणे—या नैसर्गिक, स्वार्थी वृत्तीवर ताबा चालवणे आणि त्याचा निग्रह करण्याचे कार्य करणे हे करू शकत नाही वा करीत नाही तेव्हा आपण अशा मनुष्याला पशुकोटीत घालतो याचा अर्थ असा की, पशुकोटीतल्या प्राण्याना या वृत्ति नि तदनुषंगिक कामेच्छेमुळे मादीविषयी नि लहान असलेल्या अपत्याविषयीचे सामान्य प्रेम येवढ्याच गोष्टींचा प्रभाव त्यांच्यांत असून याहून वरचढ नि प्रकर्ष पावलेल्या अुदात्त वृत्तीचा त्याचे ठायी पूर्ण अभाव असतो. मुंग्या, मुंगळे, मधमाशा, घोडे, हत्ती आदिक कांही लहान मोठ्या प्राण्यात अुदात्त नि अुत्तम गुणांचा नि बुद्धीचा त्याच प्रमाणात प्रकर्ष झालेला असतो पण साप, बैल, आदिक सामान्य प्राण्यात नि विशेषत: सापांत स्वार्थनिरपेक्षता कधीच दिसून येत नाहीं. त्यातूनहि सर्पाचा दुष्ट स्वभाव तर सर्वप्रसिध्दच आहे. निर्विषारी सर्प सुध्दां क्रोधाळतो, चावा घ्यावयाला धावतो आणि साधल्यास विळखा घालून ठार मारतो. स्वभाव परिवर्तन होणें, मूलस्वभाव सोडून अगदी तद्विपरीत श्रेष्ठ प्रतीचें वर्तन करूं लागणें, यासाठी जें अेक विलक्षण मनोधैर्य लागतें, जी निग्रहणशक्ति नि प्रचंड अिच्छासामर्थ्य लागतें तें अत्यंत प्रगत अशा मनुष्यप्राण्यामध्येंहि क्वचितच आढळून येतें. ती निश्चयशक्ति,

स्वभावपरिवर्तन वा स्वभावनिग्रहणशक्ति सापासारख्या स्वभावदुष्ट प्राण्यांत आढळून त्याच्याकडून ती अेकनिष्टपणें नि अप्रतिकार व्रत स्वीकारून दाखविली जावो, ज्या अेकनिष्ट भक्ति–प्रेमासाठी आपण मनुष्यालाहि श्रेष्ठ ठरवितो तसले अप्रतिम प्रेम वा भक्तिसामर्थ्य सापात–बैलकुत्र्यांत दिसून यावें; हें विलक्षण आहे समानशीलात सख्य–अकृत्रिम निर्व्याज्य प्रेम–क्वचित् प्रसंगीं नि तेहि मनुष्यातच प्रकट होअू शकते. पण बैल नि कुत्रा याच्यात समान-शीलत्व कोठेंहि नाही वा कुत्रा–वानरांत ते दिसून येत नाही आणि हे प्राणी मनुष्यवर्गाचे नसून पशुवर्गीय आहेत. तेव्हां अुच्च प्रेमाची अुत्पत्ति याच्यांत शक्यच नसावी. पण वरील अुदाहरणात, विशेषत: बैल नि कुत्रा याचे प्रेमाचे अुदाहरणात ते अत्यत आश्चर्यकारीपणाने दिसून आलें आहे. हा अिनका अद्वितीय ऋणानुबंध या दोन विजातीय पशूमध्यें कां अुत्पन्न व्हावा? त्याचप्रमाणे ६ वर्षांचे मुलाचे अुदाहरणातील मुलाचे डोक्यावर नागफण्याची खूण, त्याचे सापाला भाअु ह्मणणे, त्याचे अेकमेकांवर अत्यंत प्रेम, त्याचे काही विशेष प्रकारच्या भाषेत बोलणे चालणें अित्यादि गोष्टीचा अुलगडा आणि त्यांच्या या लोकविलक्षण जोडीत ज्या अद्वितीय प्रेमासबंधीचें स्पष्टीकरण करण्यास कठीण जाणारा ऋणानुबंध याचें कारण काय असावें? त्याचप्रमाणे शेवटी दिलेल्या नदीच्या अुदाहरणातील नंदीच्या अंगी दिसून येणाऱ्या ज्या अद्वितीय शक्ति अत्युन्नत मनुष्यप्राण्यातहि योगादिक वा तत्सम आत्ममोहनविद्या ( self hypnotism ), दिव्यदृष्टि ( clair-voyance ) आदिकाच्या अभ्यासावाचून मिळू शकत नाहीत त्या तसल्या शक्ति पशुकोटीतील अेका प्राण्यांत प्रकट व्हाव्यात याला जडवाद्याचा निसर्ग कारणीभूत कसा होअू शकेल? प्रेमवर्धन परस्परसहवासाच्या दीर्घ-कालीनत्वाने नि दोन्ही मनांच्या अुदात्ततमतेच्या योगेंच शक्य आहे. मानस-शास्त्रदृष्ट्या ठरणाऱ्या या कार्यकारणभावाचा मागमूसहि साप–साधूत, बैल–कुत्रा वा मुलगा–साप या अुदाहरणांत दिसून येत नाही. मग प्रेमाची ही पराकोटी त्यांच्यात निर्माण झाली ती वरील मानसशास्त्रदृष्टीनें ठर-णाऱ्या कारणांवाचून झाली असें मानतांच येणार नाहीं. अर्थात् हा त्या अुदाहरणांतील जीवांचा सहवास या पशुकोटींत झाला नसून त्या पूर्वीच्या

समंजस जन्मकालींच झाला असला पाहिजे असें मानल्यावांचून गत्यंतरच नाहीं.

या नि अशाच कधी कधीं घडून येणाऱ्या घटनांमध्यें दिसणाऱ्या ऋणानुबंधाचें आणि अतींद्रिय शक्तिप्रकटनांचें स्पष्टीकरण पूर्वजन्मार्जित कारणांव्यतिरिक्त अितर कोणत्याहि कारणांनीं समाधानकारकपणें होणें शक्य नाहीं. केवळ पूर्वजन्मीच्या ऋणानुबंधाचे धागेदोरे नि पूर्वजन्मार्जित शक्ति असल्याचें कारणच असल्या अुदाहरणाचें कोडें अुलगडण्यास समर्थ होअील—अितर कारण असणें शक्य नाही.

---

## १९ सत्यपरिशोधक वैज्ञानिकांकरितां आणखी अेक क्षेत्र

पुस्तकारंभी सांगितल्याप्रमाणें जगाच्या जड नि चेतन या विभागापैकी जड हें सर्वस्वीं परतंत्र नि चेतन हें पुष्कळ अंशी स्वतंत्रपणाने अस्तित्वान असतांना दिसून येतें. हें जगत् मूलारंभीं जड होतें, मध्यतरी चेतनाचा भास होत असला तरीहि तें जडच आहे नि अंतीहि जडस्वरूपांतच विराम पावणार आहे असें मानणाऱ्या जडवाद्यांच्या मतें जगामध्यें अिच्छास्वातंत्र्य असल्याचा जो भास होतो तो भ्रमात्मक आहे. सर्व कांही निसर्गाच्या नियमानें बद्ध आहे निसर्गाच्या भौतिक नियमानुसार सर्व घडामोडी गणित-शास्त्राच्या निश्चित गणिताप्रमाणें सर्व कांही ठराविक वेळी ठराविक रीतीने ठराविक स्वरूपांत ठराविक घटना घडावयाच्या असें ठरून गेलें आहे. तेथें स्वतंत्रतेला जागाच नाहीं. अिच्छा होते ती पूर्व घटनांच्या नियमित परिणामांनींच होते ती होणें वा न होणें कोणाचे स्वाधीन नाही. अमुक गोष्ट स्वाधीन वाटते तो वेडेपणा आहे. जगांतील प्रत्येक वस्तु अत्यत सूक्ष्मतम अणुपरमाणूपासून तो महान प्रचंड गोलापर्यंत सर्व कांही निसर्ग-नियमानुबद्ध, परतंत्र असें असल्यानें स्वातंत्र्याचा लवलेशहि या जगात अस्तित्वांत असणें शक्य नाही. सर्वांनी या अपरिहार्यतेनें पारतंत्र्यांतच राहिलें पाहिजे. असा निर्घृण नियतिवाद (fatalism)—जडात्मक निरपवाद दैववादच—जडवाद्याला स्वीकारावा लागतो. जडशास्त्रशिरोमणि जर्मन

विज्ञानशास्त्री याला हाच दैववाद वा नियतिवाद स्वीकारावा लागला आहे. पण जगाचा अनुभव नि अंतःकरणांतील मनोमयतेची साक्ष ही अेक क्षणभरहि या मनाचा वा कल्पनेचा स्वीकार करावयाला सिद्ध नाहीत. हा नियतिवाद पत्करणारा हेकेल्च पुढें जगाच्या मूलकारणाच्या निश्चित स्वरूपाच्या वर्णनाचा वा स्वरूपज्ञानाचा प्रयत्न करीत असतां हताश होअून ह्मणतो की, 'हे प्रश्न सुटण्यासारखे नाहीत. तेव्हां तो मार्ग सोडून देअून त्याचा लाभ आपण करून घ्यावा'. या वाक्यात स्वतः काय करावें वा करूं नये याचा निश्चय ठरवून अेक गोष्ट सोडून देणें नि दुसरी करावयाचा संकल्प करणें ही गोष्ट जणू काही आपल्या स्वातंत्र्यातील नि आपणावर अवलंबून असणारीच असलीच पाहिजे अशा प्रकारे बोलत आहे. नियतिवादांत विधिनिषेध नाहीत. कारण प्रत्येक गोष्ट अपरिहार्यतेने घडणारच मग 'हें करावें नि ते करू नये' असे सांगण्यात काय अर्थ अुरतो ! पण वरीलप्रमाणें निर्घृण नियतिवाद प्रतिपादून पुढे त्याच श्वासांत 'काय करावें—न करावें'चें स्वातंत्र्य आपणास आहे हे अुपजत बुद्धीनेच जणूं जाणल्यासारखें होअून नियतिवादी हेकेल विधिनिषेध दाखवीत आहे. हे ध्यानांत घेतां चुकल्या नि भ्रामक युक्तिवादाचे फेऱ्यात सापडून बुद्धीने जडवादाचा स्वीकार करीत निर्घृण नियतिवाद वा दैववाद जरी आपल्े डोक्यावर लादून घेतला तरी त्यांतील निच्छक्ति—वा जीवशक्ति बुद्धीचे चाळे चालत असतांच तिच्याद्वारा नि तिच्याकडून आपल्या स्वातंत्र्याचे अुद्घोषण करीत असते हे ध्यानांत ठेवण्यासारखे आहे

प्रकाश—अंधकार, अुष्ण—शीत, ज्ञान—अज्ञान, सजीवता—निर्जीवता ही प्रतिद्वंद्वितादर्शी द्वंद्वें अस्तित्वात आहेत. यांची रुपे धन—ऋण स्वरूपाची असतात. अेक प्रकार अेका वस्तूचें निश्चित नि पूर्ण अस्तित्व नि दुसरा प्रकार अस्तित्वाचा शक्यतम स्थितीपर्यंतचा लोप अशी ही वस्तुस्थिति असते. प्रकाश जसजसा कमीकमी होत जाअील तसतसा अंधकाराचा प्रभाव पडूं पाहतो. प्रकाश अत्यंत थोडा—आपल्या डोळ्यांना दिसणार नाही—अितका झाला कीं त्याला आपण अंधकार ह्मणतो. आपणाला भासत असलेला अंधकारहि अितर कांही प्राण्यांना अंधकार नसतो. प्रकाशाचा

अत्यंताभाव शक्यच नाहीं. तद्वतच पुढील द्वद्वांची स्थिति आहे. सजीवता-निर्जीवता या द्वंद्वामध्यें सुद्धां हीच स्थिति दिसते. सजीवतेंत स्वेच्छा-स्वातंत्र्य प्रकट होऊन क्रियाशीलता प्रकर्षाला पोहचू शकते. अगदी जडवस्तू-पेक्षां वृक्षलतादिकात सजीवतेला वाव अधिक मिळून आणि जडाअितकी क्रियाहीनता न राहता त्यांच्यांत क्रियाशक्तीचा विकास अधिक झालेला असतो. या अुद्भिज वृक्षलतादिकांहून वरिष्ट प्रकारच्या स्वेदज, अडज, जारज सृष्टीत कीटादि पक्षादिकात नि पशवादिकात जीवनशक्तीचे अधिकाधिक प्रकटीकरण शक्य होअून क्रियाशक्तीची विविधता नि श्रेष्ठता अधिक प्रकट होते. मनुष्यप्राण्यामध्यें मनबुध्यादिक अधिक सूक्ष्म साधने मिळताच जीवशक्तीच्या अधिक श्रेष्ठशक्ति व्यक्त होअू लागतात मनुष्यामनुष्या-मध्येंहि या मनबुद्धीच्या कमी अधिक विलसनाचे मानाने कमी अधिक श्रेष्ठ प्रकारच्या जीवशक्ति प्रकाशतात. हे लक्षात घेता जीवशक्तीला जसजशी अधिकाधिक साधने मिळत जातात तसतशी ती शक्ति अधिकाधिक प्रमाणात आपल्या स्वतंत्र अिच्छेनुसार शक्ति प्रकट करू लागते असे दिसते. जसजशी जीवशक्ति वा चैतन्यशक्ति आपल्या शक्तीचे अधिकाधिक प्रकटन करू शकते त्या त्या मानानें तिचे पारतन्त्र्यपाश तुटून जाअून स्वतत्रताव्यक्ती-करणाला ती समर्थ होते. तिची क्रियाशक्ति वाढलेली असते. अुलट ही चिच्छक्तिप्रकटीकरणाची साधनें जसजशी कमी होतात तसतशी तिच्या स्वातत्र्याला आळा पडल्यासारखा होअून क्रियाशीलताहि शून्याजवळ येअू लागते. यावरून असे दिसून येअू शकते की क्रियाशीलता नि स्वातंत्र्यप्रकटी-करण ही जीवशक्तीची-चित्शक्तीची नैसर्गिक वा स्वाभाविक गुणवत्ता आहे. जेथें जेथें क्रियाशीलता नि स्वातत्र्य प्रकटीकरणाचा किरण दिसून येअील तेथें तेथें या जीवशक्तीचा-चैतन्यशक्तीचा-निश्चित वास आहे असें समजण्याला चिंता नाहीं. प्रकाशाचा आपल्या डोळयाला न दिसण्याअितका कमीपणा ह्मणजे प्रकाशाचा पूर्ण अभाव नव्हे हें जसे खरें तसेंच जीव-शक्तीची अव्यक्तता ह्मणजे जीवशक्तीचा अत्यताभाव नव्हे हें आपण लक्षांत घेतलें पाहिजे. जडामध्यें स्वेच्छाप्रेरित शक्ति मुळीच नसते; सर्वस्वीं निष्क्रिय, सर्वस्वी परतंत्र नि ह्मणून पूर्णत्वानें जड असें

जडवत् दिसणाऱ्या पदार्थांना आपण ह्मणत असतो. पण जड मानलेल्या पदार्थांत सुद्धां क्रियाशीलतेचा–स्वेच्छास्वातंत्र्याचा नि ह्मणूनच जीवशक्तीचा अत्यंताभाव असतो असें मानता येणार नाही. कारण तेथेंहि आकर्षण–प्रतिसारणरूपी क्रिया अस्तित्वात आहेच नि विज्ञानशास्त्र्यांनाहि या आकर्षण–प्रतिसारण क्रियेच्या पाठीमागे संवेदनाशक्ति नि संकल्पशक्ति वा अिच्छाशक्ति ( will and sensation ) निश्चित आहेत, असें मानावे लागतेच. तेव्हा जडवत्ता ह्मणजे चिच्छक्तीची ऋणावस्था वा सुप्तावस्था नि सजीवता ही चिच्छक्तीची–जीवशक्तीची–धनावस्था वा जागृतावस्था आहे असेंच ह्मणावे लागेल. जसजशी चिच्छक्ति वा जीवशक्ति अधिकाधिक प्रमाणांत प्रकटनसामर्थ्यसंपन्न होते तसतशी ती जडाला अधिकाधिक प्रमाणात आपल्या स्वाधीन करून घेअू शकते–जडावर सत्ता गाजवू लागते असे आपण पाहतो. कोणीही स्वत.च स्वत.चा बंदी झाला असें आपणाला म्हणता येत नाही. त्याला स्वतंत्रता असें आपण म्हणतो. जडच जडावर सत्ता चालवू शकत नाही असे आपण पाहतो नि म्हणून तें स्व–तंत्र नाही पर–तंत्र आहे असे आपण म्हणतो. जडावर दुसरा कोणीतरी सत्ता चालविणारा असला पाहिजे तरच आपण जडाला परतंत्र म्हणू शकू. जडाचा रासायनिक परिणाम जडावर स्वतंत्रपणे सत्ता चालवू शकतो असे म्हणणे म्हणजे अर्थशून्य शब्दावली अुच्चारण्यासारखे आहे.

जीवशक्ति ही स्वतंत्र आहे. ती जडाचा रासायनिक परिणाम नाही नि ती जीवशक्ति स्वतंत्रपणे जडावर सर्वस्वी सत्ता चालवू शकते–आपल्या अिच्छेप्रमाणे वाटेल ते करू शकते–जडावर अवलंबून राहण्याची आवश्यकताहि ठेवीत नाही अितकी स्वतंत्रपणे ती असू शकते याची काही निर्विवाद पुराव्याची अुदाहरणे देअून ती गोष्ट कशी सिद्ध होते ते पाहू. या अुदाहरणांतहि दोन श्रेणी आहेत–मनबुद्धीच्या आश्रयाने त्यांच्या प्रचंड अिच्छाशक्तीच्या जोरावर जीवशक्ति ही स्वतंत्र शक्ति असल्याचें पटविण्यासारखी अुदाहरणें नि मनबुद्धि साधनांचा अुपयोग करून मनबुद्धिसहित देहावर नि बाह्य जड चेतन जगावर आपल्या चिन्मय स्वरूपाचे प्रभावानें सत्ता चालविण्याची शक्ति प्रकट करून चिन्मयशक्तीच अत्यंत श्रेष्ठ नि स्वतंत्रपणें

अस्तित्वांत असणारी ज्ञानवान् शक्ति आहे हें सिद्ध करणारीं अुदाहरणें—असे दोन विभाग करून पहिल्या प्रकारचीं अुदाहरणें आधीं घेअू.

---

## प्रचंड अिच्छासामर्थ्याचे द्वारा स्वतंत्र चिच्छक्तीचें प्रभावदर्शन.

यांत्रिक युगात यंत्रकलेची परमावधि होत चाललेली आहे, अनेकशः प्रचंड नि शतशः सूक्ष्म यंत्रे अस्तित्वांत येत आहेत, जणू कांही जिवंत जीवच आपणापुढे विविध दृश्ये अुभी करीत आहेत, असले देखावे अुत्पन्न होण्यापर्यंत यंत्राची वाढ झाली आहे. या यंत्राची गोष्ट पाहता असें दिसून येते की कोणत्याहि यंत्रात अेखादा खिळा निसटला, अेखादा दाता मोडला, अेखादें चाक आपल्या जागेवरून सरकलें की ते यंत्र चटदिशी निरुपयोगी, कार्य करण्यास असमर्थ होअून बसते. केलेली व्यवस्था नीट असेपर्यंत दिलेल्या गतीच्या प्रमाणात साठवलेली शक्ति व्ययी पडेपावेतों हे यंत्रमहाराज चालावयाचे नि तेहि ठरवून दिलेल्या चाकोरीनें. त्याला स्वतंत्रतेचा—स्वेच्छेचा—अंशहि सापडणार नाही. ते प्रेरकाच्या अिच्छेनुसार ठरविलेल्या वेळापुरते, दिलेले काम करीत चालू असावयाचे. कारण ते आमूलाग्र जडच आहे. त्यात चैतन्यांश प्रकट झालेला नसतो. चैतन्यांशावाचून स्वतंत्रता—स्वेच्छाप्रेरकता—नसावयाचीच. यंत्रात चैतन्यांश नाही, स्वतंत्रता—स्वेच्छाप्रेरकताहि नाही. सजीव देहातील चैतन्यशक्ति वा स्वेच्छा धारण करणारी ज्ञानवान् जीवशक्ति ही जर रासायनिक परिणाम असेल, तर थोडा कांही बिघाड होताच देहयंत्र मोडून पडलें असतें मग या सजीव देहयंत्रांतील बहुतेक भाग नष्ट झाल्यावरची तर गोष्टच बोलावयास नको. पण अनुभव मात्र निराळा येतो. हा जडवाद्यांचा 'रासायनिक परिणाम' अितका कांहीं बेरड नि विलक्षण आहे कीं ज्याचे आधारावर त्याचें अस्तित्व असावयाचें त्या देहाच्या चिधड्या अुडत असतांहि आपल्यांत कांहीं बिघाड न होअूं देतां देहाला वाकुल्या दाखवीत स्वतः स्वतंत्र अस्तित्व असल्याचें सिद्ध करूं धावतो आणि बिचाऱ्या जडवाद्यांच्या 'रासायनिक परिणामाच्या'

निदानाला खोटें ठरवितो. पण सत्य हें निर्घृण असतें. त्याला कोणाची भीडभाड नाहीं. अुलट या जडशास्त्रवाद्यांनीं भ्रमशील बुद्धिवादानें गमावलेल्या चैतन्यांशाचें–ज्ञानवान जीवाचें–अस्तित्व तें सिद्ध करतें नि त्यांचा जीव त्यांना परत देतें हे अेक प्रकारें जडवाद्यांवर सत्याचे अुपकारच आहेत.

धर्मासाठीं, देशासाठी, स्वातंत्र्यासाठीं, ध्येयासाठी वा सत्वासाठीं आपले प्राणांचीं फुलें अुधळीत त्या परमप्रिय आराध्याचे भक्तिस्थंडिलावर आपल्या देहाचें बलिदान दिल्याची हजारों अुदाहरणें जगांतील सर्व देशांचे अितिहासांत सापडतात. आपला हा परमश्रेष्ठ भारतदेश असामान्य हुतात्म्यांचें दिव्य हौतात्म्य प्रकट होण्याचें परमदिव्यस्थानच आहे. भारतवर्षांतील तसू तसू भूमी सुद्धां या नाहीं त्या प्रकारच्या हुतात्मतेच्या दिव्य प्रकटनानें भरून गेलेली आहे. पावित्र्यमय भारतभूमीमधील हौतात्म्येतिहास वर्णिण्याचें हें स्थल नव्हे म्हणून लेखणी आवरती घ्यावी लागत आहे. केवळ विषयानुरोधास्तव कांही थोडीं अुदाहरणें विषयप्रतिपादनार्थ म्हणून निवडून तेवढींच देण्यापुढे न जाणें भाग आहे. तेव्हां तीं अुदाहरणें बघून पुढचा मार्ग आक्रमूं.

जगांतील सर्व देशात आणि विशेषतः हिंदुस्थानांत सतीच्या सहगमनाच्या कथा लोकप्रसिद्ध आहेत. परंतु आपण सतत अैकत असलेल्या गोष्टीमध्यें प्रकट होणारे अद्वितीयत्व, अलौकिकत्व, दिव्यत्व नि अतिमानवी शक्तिमत्व ही त्यांच्या पूर्ण स्वरूपांत समजण्याची वा कळण्याची शक्ति लुप्त झालेली असते. जगामध्ये जगण्यासारखें कांही अुरलें नाही, मरण्याचे आत्यतिक क्लेशापेक्षांहि जीवनधारण अति असह्य आहे, मरण पत्करलें पण जीवन नको, अशी जेव्हां अगतिक आणि भयंकर निराशाग्रस्ततेची स्थिति मनापुढे अुभी राहते तेव्हा मनुष्यांची मने मरण ओढवून घेण्यासाठी आत्महत्त्येला प्रवृत्त होतात. नुकतेच आत्महत्त्येला प्रवृत्त झालेल्या मनुष्याचें युरोपांतील अुदाहरण आमचे वाचनांत आलें होतें. आयुष्यांत निराशेचे वा दुःखाचे प्रसंग सर्वांवर येतात आणि अशाच प्रसंगांत मनाचा तोल सुटून असह्नीयता भासूं लागते, तेव्हांच मनुष्य आत्महत्त्येला प्रवृत्त होतो. युरोपांत अेका देशांतील (आह्मी त्या वेळीं तें अुदाहरण अुतरून न घेतल्यामुळें नि

पुन्हां शोधून न मिळाल्यानें देशाचा नि गांवादिकाचा नामनिर्देश करतां आला नाहीं याची वाचकांनीं क्षमा करावी.) कोणी तरूण गृहस्थ स्वतःला असह्य वाटलेल्या आपत्तीमुळें आत्महत्येला प्रवृत्त झाला. त्याचे देशांत बर्फाचें अस्तित्व पुष्कळ असल्यानें पाणी अत्यंत थंड असतें. तो जीव देण्यास नदींत अुतरला. पण नदीच्या पाण्यांतील बर्फासारखा थंडपणा त्याला अितका जाणवला कीं तो परतला. पण तेवढ्यांत जीव देण्याच्या प्रयत्नासाठीं तो पकडला गेला. त्यानें न्यायालयांत ( कोर्टांत ) पाण्यांतून मी कां परतलों याचें कारण देतांना सांगितलें कीं "जीव द्यावयास गेलों पण जीव द्यावयाला मिळालेलें नदीचें पाणी अत्यंतच गार होतें. तें मला सहन करवलें नाही नि ह्मणून मी परतलों ! !" तात्पर्य जीव देणें ह्मणजे पोरखेळ नव्हे. जीव द्याव-याला निघालेल्या आत्महत्यारीला सुद्धां तेवढा निराशेचा क्षण वा थोडा वेळ निघून गेला कीं मग आत्महत्येचा विचार मनांत आणणें सुद्धां भयकर नि असहनीय वाटतें. वैतागून जीव द्यावयास निघालेली मंडळी त्या आपत्तींत सांपडल्यावर जर कदाचित् सोडवली गेली तर पुन्हां जीव देण्याचें नावहि काढीत नाहीत; कारण 'जीव देतो' ह्मणतेवेळी कल्पना न आलेल्या असह्य वेदना—क्लेशाचा अनुभव त्यांना पुन्हा मृत्यूचें नांवहि काढण्याचें धैर्य अुरूं देत नाहीं. हें लक्षांत घेतां मृत्यूला स्वच्छंदानें कवटाळणें किती अलौकिक—दिव्य आहे, त्यांतील अिच्छासामर्थ्य किती अलौकिक नि अतिमानवी आहे याची किंचित्‌शी कल्पना करतां येअील.

पतीच्या निधनानंतर मुलेंबाळें यांचा पाश तोडीत, जगांतील पति-मृत्यूव्यतिरिक्त अितर कोणत्याहि प्रकारें जीवन असह्य होण्याची भीति नाहीं अितकेंच नव्हे तर बाकी सर्व सुखें—आणि पुनर्विवाह केल्यास पति-सुखहि—मिळण्याची शक्यता असतांहि त्या सर्व शक्य सुखांना लाथाडून पतिशवाचें डोकें आपल्या मांडीवर घेत स्वेच्छेनें चितेंत दहन होणाऱ्या सतीचें धारिष्टय, देहममतात्यागाचें धैर्य, अग्निदाहाचें दिव्य सहन करण्याची मानसिक कठोरतम निग्रहशक्ति, असामान्य पतिनिष्ठा, प्रचंड अिच्छासामर्थ्य नि अतिमानवी आत्मबल हीं कल्पनेनेंहि जाणतां येण्यास अतीव कठिण आहेत. अशा अग्निदाहीं शिरून पतीबरोबर जळूं घातलेल्या पतिव्रतेची कल्पना

केली असतां हें सामर्थ्य कोणाचें–जीवशक्तीचें कीं जड–वाद्यानें आपल्या कल्पनेंतून अुद्‌भविलेल्या काल्पनिक रासायनिक परिणामाचें ?

पण याहिपुढें जाअून निराळीच अुदाहरणें पुढें मांडावयाचीं आहेत. पतिमृत्यु झाला हें कळूनहि जीव वा जीवात्मा शरीरांतून निघून जात नाही. अग्नीत शिरून अेक प्रकारच्या बलात्कारानें जीवात्म्याला देह सोडणें भाग पाडण्याचा प्रसंग न येतां स्वतःच शरीर सोडून बाहेर तो पडतो असें जर घडत असेल–घडलें असेल तर तें सामर्थ्य मात्र अतुलनीय आहे असेंच प्रत्येकाला वाटेल. अशा सामर्थ्याच्या अद्वितीयत्वाचें नि प्रचंडतेचें यथार्थ स्वरूप लक्षांत घेणेंहि सामान्य जनसमूहाला आणि साधारणतः असामान्य अिच्छाशक्तिसपन्नानांहि कठिणच नव्हे तर जवळ जवळ अशक्य आहे. असें प्रचंड अिच्छासामर्थ्य प्रकट झाल्याचीं अुदाहरणें कधीं कधी घडतात. तशी कांही अुदाहरणें आपण आपल्या परीक्षणार्थ बघू

---

## अ—(१) अेक देशभक्त हुतात्मा नि अेक अलौकिक स्त्रीरत्न.

महाराज पृथ्वीराजानतर हिंदु साम्राज्यभंगामुळे जणूं संतप्त अशा दिल्लीच्या सिंहासनाला रक्ताची तहान वारवार लागत असते. त्या सिंहासनाला जो जो कोणी पाय लावू पाहतो त्याला त्याला रक्त सांडावें नि सांडवावे लागत आहे बगालच्या फाळणीनंतर राष्ट्रभक्तीच्या प्रचंड वावटळीत कलकत्त्याची राजधानी जेव्हां हेलकावे खाअूं लागली तेव्हां ती राजधानी दिल्लीला आणली गेली. लॉर्ड हॉर्डिंज हे त्या वेळी गव्हर्नर जनरल होते. राजप्रतिनिधि या नात्यानें दिल्ली राजधानी करून दिल्लीच्या सिंहासनाकडे जाण्यासाठी त्यानी मोठ्या थाटमाटात राजेमहाराजाना आणि जगातील अुर्वरित नराधिपतीनाहि हेवा वाटावा अशा राजवैभवसंपन्न देखाव्यात दिल्लीप्रवेशाचा समारंभ थाटला. दिल्लीच्या राजमार्गांतून राजवैभवयुक्त थाटामाटाने परतु अंतःकरणांतील असुरक्षितीच्या बोचणीमुळें आवश्यक वाटलेल्या सैनिक नि पोलीसाच्या संरक्षणात लॉर्ड हॉर्डिंज दिल्लीत मिरवत होते. दिल्लीच्या राजसिंहासनाला पुन्हां पूर्वस्मृतीचा अुमाळा आला की

काय कोण जाणें. त्या सिंहासनाच्या तोंडांतूनच जणू या वेळीं बाँब—महाभयंकर बाँब—ओकला गेला. राजवैभवी आनंदाची मिरवणूक अंतिम शोकाचीच मिरवणूक होते की काय अशी सभय शंका वावरूं लागली. लॉर्ड हॉर्डिंजच्या मर्मस्थानी घाव झाला. त्यांच्या आयुष्याचा धागाच बळकट, नाहींतर त्या भयंकर नि प्राणघातकी घावानें त्यांचे प्राणाचा बळी घेतला असता! पण दैवयोगानें ते त्यांतून वाचले. मिरवणुक अुधळली गेली. चोहोंकडे अुदासीनता पसरली. हें भयंकर कृत्य कोणी केलें असावें याविषयीं चोहोंकडे तर्कवितर्क सुरूं झाले. सरकारी गुप्तचर विभागाला अत्यत महत्वाचें काम मिळालें नि बाँब फेकणारा आणि त्याचे साथीदार याचा शोध मोठ्या निकरानें चालू झाला.

गुप्त आक्रमक कोणत्या तरी अेखाद्याच स्थली असतात, अेखाद्या स्थलाहून हे आक्रमण करतात नि असले अेखादे रक्त सांडवासांडवीचें भयद कृत्य करून कोणीकडे तरी निघून जात अेखाद्या स्थली दडी मारतात. छपून येण्याचें, भयंकर कृत्य करण्याचे नि दडी मारण्याचें कोठलें तरी अेकच अेक ठिकाण असूनहि जगाला—मग ते लोक असोत की सरकार असो—आक्रमक नि संतापी मडळी कोठे असतील नि कोठें नसतील याविषयी मोह पडून त्याची मने अत्यंत त्रस्त नि भयग्रस्त होअून सर्वत्र शंकाकुलता त्यांना येअून घेरून बसते.

तसेंच या दिल्लीच्या बाँबप्रकरणीहि झालें. सरकारी अधिकाऱ्याना अपराधी न सांपडणे हे दुष्कीर्ति करणारें नि असुरक्षितीचे कारण होअून बसते. खरा अपराधी अशा संशयग्रस्त मनस्थितीत सांपडतोच असें नाही. कधी कधी संशयाच्या अतिरेकाने अेखादा निरपराधी देखील त्या संशयी क्रोधाला बळी पडतो. या बाँबच्या प्रकरणांत अनेक तरुण पकडले गेले नि शिक्षापात्र ठरले.

आजच्या आपल्या कथेचा नायकहि त्यांपैकीच अेक होता. या तरुणांचे नांव 'बालमुकुंद'. पंजाबचे प्रख्यात पुढारी देशभक्त भाअी परमानंद यांचा हा चुलत भाअु. भाअीजीचें घराणेंच हुतात्मतेचें घराणें झालेले

आहे. अवरंगजेबाच्या क्रूर धर्मवेडाला बळी पडून भाअीजींचे पूर्वपुरुष महान् हुतात्मा 'मतीदास' हे करवतीने डोक्यापासून खालपर्यंत अेखाद्या लाकडाच्या ओंडक्याप्रमाणें प्रत्यक्ष कापले गेले. त्या वीरात्म्याचा हा वंश. भाअीजींनी अदमान भोगले आहे हें सर्वश्रुत आहेच. त्याच्या या 'बालमुकुंद' नामक चुलत भावाला वर वर्णन केलेल्या बॉंबफेकीच्या अपराधाचे संबंधांत फांशीची शिक्षा झाली होती.

ते पकडले जाण्याच्या अेक वर्षापूर्वी अेका अनुपम गुणवती नि सुंदर कुमारीशी त्याचा विवाह झाला होता. त्या कुमारीचें माहेरचें नांव 'रामरखी' होते. विवाहानंतर सासरी तिचे नाव 'लज्जावती' ठेवलें गेलें. ते पकडले गेल्यावर काय काय झाले याविषयीचें वर्णन देवी लज्जावतीनें सांगितलेलें जितकें अुपलब्ध आहे तितकें तिच्याच शब्दांत देत आहोंत.

"अुन्हाळ्याचे दिवस होते. ते बंदीत होते. मी घरी होते. सहा महिने-पर्यंत मी अेका भाग्यदायी घटकेची वाट पाहत होते. लोक मला सांगत 'तूं घाबरी होअू नकोस, ते सुटतील नि घरीं येतील.' मी ह्मणत होतें, 'तो सुदिन केव्हां येणार! ही दुर्दैवाची रात्र केव्हां संपणार! माझा भाग्यरवि अुदयाचलावर पुन्हां केव्हां अुगवेल! ती शुभवेळा केव्हां दिसेल!'

मी दिल्ली कशाला नि केव्हां पाहणार? परंतु त्यांना दिल्लीस ठेवलें होतें. दावा तेथें चालला होता. मी तेथें गेलें आणि पाहिलें कीं बंदीची कोठी फार भयानक आहे. त्या अगदी लहान नि कुंद खोलीत त्यांना श्रावण भाद्रपदाच्या (आपल्या अिकडे जसा जेष्टांत अुन्हाळा असतो त्याप्रमाणें तिकडे श्रावण–भाद्रपदांत असतो.) अत्यंत अुष्णतेच्या दिवसांत दिवस कंठावे लागतात. मी विचारलें, 'काय निजायाला चारपाअी (खाट वा बाज) मिळते काय?'

सांगू लागले, 'कशी वेडी आहेस? येथें चारपाअीचें काम काय?'

मी ह्मणालें, 'तर मग निजतां कशावर?' ते ह्मणाले, "अेक कांबळी जमिनीवर टाकून राहतों". मी घरीं परत आलें. रात्रीं घरमंडळीं मोकळ्या

छतावर वा गच्चीवर चारपाअी टाकून निजली. मी तळघरांतील तळच्या खोलीत शिरलें. अेक कांबळी भूअीवर आंथरली नि त्यावर निजलें. चोहों-बाजूंनीं डासांची भुणभुण चालू झाली. कानाच्या आजूबाजूला घुमूं लागले. 'मूर्ख, असल्या कोठीत कां कोठें झोप येते ?' असे ह्मणत मला ते डास वेडावीत आहेत असे वाटू लागले. मी अुठून बसले. अेका खिडकीतून चद्र-किरणें आंत येत होती. मी डोकावून चंद्राचें दर्शन घेतले नि त्याला विचाकले ! 'काय ! चमकणेवाला ! तू त्याच्या कोटीतहि चमकतोस काय ? अशाच प्रकारें जागत नि या कुशीवरचे त्या कुशीवर होन होन ते रात्र कशी काढतात हें तूं पाहिलेंस काय ?'

"चंद्रमाकडे वारवार पाहून सुद्धा अुत्तर मिळालें नाही. रात्रभर डासांनी अंग खाअून घेतलें. अंगावर गाधी आल्या. दुसऱ्या दिवशी अशाच प्रकारें मी निजलें नि डासानी हल्ला चढविला. अितक्यात माझी मैत्रिण आली नि म्हणूं लागली, 'काय मरायला निघालीस का !' मी म्हणाले, 'मरेन कशांनी ?' ती म्हणाली, 'ही तर मरण्याचीच चिन्हे आहेत !' मी म्हणालें, 'काय ? याप्रमाणें जे निजतात..........' मैत्रिण मध्येच म्हणाली, 'हो ! हो ! मरतात तर काय ?'

माझे डोळे भरून आले. अश्रू गळूं लागले. मैत्रिण स्तब्ध झाली नि आपल्यालाच दोषूं लागली. मी म्हटलें, 'कोणाचाच कांही दोष नाही. माझें भाग्य फुटलें आहे. ते बदींत असे निजतात, काय त्याप्रमाणे मी नको निजू ?'

पुढें पुन्हां त्यांच्या भेटीची अनुमति मिळाली. पुन्हा मी दिल्लीस गेलें. या वेळी मी विचारलें तेव्हां ते म्हणाले, 'मला अेकच वेळ खायला मिळतें.' मी विचारलें 'रोटी कशी असते ? त्यांनी रोटीचा अेक तुकडा दिला. मी तो तुकडा घेअून परत आलें. त्यांत गहूं होते, चणे होते, आणखीहि कांहीं पदार्थ मिसळले होते. मीहि घरी तशाच प्रकारची मिसळ बनविली नि ती दळून त्याची रोटी खाणें चालूं केलें. असे कित्येक महिने गेले. अंतीं अेक दिवस मी अापल्या कोटींत बसलें असतां बाहेरून रडण्याचा ध्वनि अेकूं आला. माझें हृदय धडपडूं लागलें. डोक्याला घाम आला. पण जीव मुठींत

घरून बाहेर आलें नि पाहते तों त्यांचें नांव घेऊन ' फांशीची शिक्षा-फांशीची शिक्षा झाली !! हे शब्द अैकू आले.'

त्यांचें अंतिम दर्शन घेण्यासाठीं मी पुन्हां दिल्लीला गेलें. ज्या बंदींत तरुणांचें तारुण्य नष्ट होतें, सुकुमार नि मृदु अंतःकरणें करवतलीं जातात त्या बंदींत पोहोंचलें, दर्शन घेतले. अंतःकरण सांगत होतें कांही बोलून घ्यावें! ओठ सांगत होते आम्हांत सामर्थ्य नाहीं—अितक्यांत त्यांचे ओठ हालले. ते म्हणाले, 'प्राणप्रिये ! जो प्राणी जन्माला आला त्याला अेक ना अेक दिवस जावेंच लागणार ! कोणी कोणाला सोबत होअू शकत नाहीं. तूं आपल्याला भाग्यवती समज की मी देशाकरितां सर्वस्वाची आहुति देत आहे !!!' माझ्या कानानें हे शब्द अैकले नाहीत तोंच डोळे अश्रु ढाळूं लागले. डोळ्याचे अश्रु थांबेनात. त्या अश्रूमुळें त्यांचें मनसोक्त मुखावलोकन देखील मला करतां येअीना ! पुष्कळ प्रयत्न केला परतु अश्रूंनी यथेच्छ दर्शन करूं दिले नाही.

दुसरे दिवशी हवनाची सामग्री अेकत्र केली गेली. लोक बोलूं लागले की त्याना अतेष्टीसंस्कार आज होअील. मी ह्मटलें, 'फार सुंदर संधी आली. आता मी त्याना जाअून मिळेन. परंतु थोडयाच वेळांत कळलें कीं, त्यांचें प्रेत सरकारी अधिकारी देत नाहीत, मग काय झालें—मी सांगूं शकत नाही. आज पधरा दिवस मी व्रतस्थ आहे. आतां घटका भरत आली—आतां माझे मनोरथ पूर्ण होणार ! " अितकें बोलून देवी लज्जावती चूप झाली. देवीनें अन्नाचा कण वा पाण्याचा थेंब घेतला नाहीं. याप्रमाणें १८ दिवस गेले. अेका स्थलावर आसनस्थ होअून ज्या मूर्तीवर तिचें ध्यान आकर्षित झालेलें होतें त्या ध्यानांत ती निमग्न होअून चूर होती. तिनें तपस्या पूर्ण केली. अंतिम दिवशी सूर्यबिब पूर्ण तेजानें प्रकाशमान् होतें. लोकानीं आपापल्या कार्याला आरंभ केला. देवी आपल्या आसनस्थ स्थानावरून अुठली, स्वतः स्वच्छ पाणी आणलें—स्नान केलें—स्वच्छ वस्त्र परिधान केलें आणि ध्यानस्थानीं अंग टाकलें. ह्मणाली, "प्रिया ! फार दिवस आपण माझी परीक्षा पाहिलीत ! आज आपला सांपडता हात सोडणार नाहीं—आतां

नाहीं विभक्त राहूं शकणार!" असें ह्मणून तिनें आपलें प्राण खेचून घेतले आणि देहत्याग केला, अिच्छापूर्वक देह सोडला. साध्वी लज्जावतीनें देशभक्त हुतात्मा पति बालमुकुंदशी अेकरूप होण्यासाठीं परलोकाचे देवद्वार अुघडून स्वर्गीं प्रवेश केला.

**आ—(२)** अहमदाबादला डॉ. थत्ते नांवाचे अेक ५५ वर्षांचे तरुण ब्राह्मण गृहस्थ राहत होते. त्याचेपूर्वी त्यांच्या मृत्यूचें भविष्य त्याच्या पत्नीनें केलें होतें. त्याचप्रमाणें डॉ. थत्ते यांचा मृत्यु झाला. त्या वेळी त्याची पत्नी केवळ १६ वर्षांची. देह १६ वर्षांचा अबोध बालिकेसारखा. परंतु त्या साध्वीच्या अिच्छासामर्थ्याची योग्यता अनेक जन्म खटपटणाऱ्यांनाहि साध्य होअील कीं नाहीं कोणास ठाअुक! त्या दिव्य तरुणीने मी पतीमागें थोड्याच वेळांत अमुक वाजतां जाअीन म्हणून सांगितलें होतें. पतिमृत्यूनंतर ठरल्यावेळीं जगाचें बाह्यभान नाहींसें झाल्यासारख्या लहरी तिला आलेल्या दिसू लागल्या आणि पूर्वी सांगितलेल्या नेमक्या वेळीं तिनें आपला देह भूतलावर सोडून पतीशीं अेकरूप होण्यास ती निघून गेली.

**अि—(३)** अुत्तर हिंदुस्थानांत मुरादाबाद येथें अेक बॅरिस्टर श्री गंगाप्रसाद मिश्र नांवाचे ब्राह्मण राहत असत. ते मरण पावले. त्यांचें शव जेव्हां स्मशानांत नेअू लागले तेव्हां त्यांची पत्नीहि त्यांचे बरोबर स्मशानांत गेली आणि 'मला सती जाअू द्या' अशी त्या साध्वीनें सर्वांची विनंति केली. सांप्रतच्या सरकारी निर्बंधानुसार सती जाण्याला बंदी आहे आणि तशी गोष्ट होत असतां ती बंद न करता स्तब्धपणानें नि निष्क्रियतेनें ती गोष्ट होअू देणाऱ्यांनाहि शिक्षा ठेवल्या आहेत. अर्थात् ही त्या बॅरिस्टर पत्नीची—ती सती जाअू अिच्छिणाऱ्या दिव्य स्त्रीची विनंति—मान्य होणें शक्यच नव्हतें परंतु नुसतें 'नको जाअू सती—आम्ही तुला तसें जाअ देणार नाहीं.' असें निघृण अुत्तर न देतां त्या मंडळींनीं तिची समजूत घालण्याचा प्रयत्न केला. त्या मंडळींनीं तिला सांगितलें 'परमेश्वरानें तुम्हाला वैधव्य दिलें आहे—तेव्हां ही अीश्वरी अिच्छा समजून आहे त्या स्थितींत राहावें.' पण दुर्बल मनें धारण करणाऱ्या अैहिक मानवी प्राण्यांची ही

समजूत तिला कशी पटणार? विदेहमनस्कता प्राप्त झालेल्या त्या दैवी सतीनें अुत्तर दिलें, 'कोण म्हणते मी विधवा आहे म्हणून? माझ्या पतीशीं माझें आयुष्य संलग्न आहे.' पतीचें शव दहन होअू लागलें–ही तें बघत अुभी राहिली. शवाचे पूर्ण दहन झालें. त्या साध्वीनें पतिशवाबरोबर दग्ध न करतां आलेला देह भूमातेला अर्पण करून–देह धरणीवर सोडून–आपण विदेह स्थितीत पोहोचलेल्या आपल्या पतीच्या दर्शनाला निघून गेली.

---

## अेका ब्राह्मण तरुणीचें सहगमन

**ओ—(४)** कुबेरपुर (आग्रा जिल्हा) गावात अेक ब्राह्मण तरुण राहत असे. त्याचे नाव रामप्रसाद. (१९३६) १० तारखेस त्याची प्रकृति अेकदम बिघडली आणि दुपारी तीन वाजता तो मरण पावला. त्याच्या मृत्यूची बातमी अैकतांच त्याचे आअीबाप आक्रोश करून रडू लागले. परतु मृत ब्राम्हणाची पत्नी कलावती हिने मात्र डोळयांतून अश्रू देखील काढला नाही. अुलट आतल्या खोलीत आअून शृंगार केला. आपल्या पतीस स्नान घातले आणि अेका देवळाच्या पुजाऱ्यास हाक मारून सती जाण्याची अिच्छा दर्शविली. पुजाऱ्यास बोलावून तिनें सांगितलें कीं मला थोडी देवळाजवळ जागा द्या. मी आपल्या पतीबरोबर सती जाणार आहे. पुजाऱ्यानें तिला सती जाण्याची मनाअी केली. त्याबरोबर ती त्या पुजाऱ्यावर संतापली आणि म्हणाली, 'या संबधात बोलण्याचा कोणासहि अधिकार नाही. जर कोणी माझ्या कर्तव्यास आडवे येअील तर मी त्याला शाप देअीन'.

शापाच्या भयाने ग्रामवासी गांगरले नि कांहीं म्हणण्याचें कोणीहि धाडस केलें नाहीं. तिने देवळाच्या आवारात अेक चिता रचली. ती स्वतः चितेवर चढली. पतीचें प्रेत आपल्या मांडीवर घेतलें आणि हातांत विस्तव घेअून तिनें प्रथम आपल्या केसास अग्नि लावला. त्याबरोबर चितेस अग्नि लागून चिता भडकली आणि अुभयतां पति-पत्नी चितेंत जळून भस्म झाले. चितेंत जळून भस्म झाल्यावर पोलीस तेथें आले आणि त्या संबंधांत देवळाचा धनी नि दुसरे दोघे जणांना अटक केली. त्यामुळें त्या गांवांत फार खळबळ अुडाली.

अु—(५) युक्तप्रांतांत फत्तेगडजवळ असलेल्या माअीणपुरी येथें अेक गृहस्थ राहत होते. (दुर्दैवानें त्या गृहस्थाचें नांव मिळू शकले नाहीं.) ते पुष्कळ दिवस आजारी होते आणि त्यांची सेवाशुश्रुषा त्यांची अेकनिष्ठ पत्नी करीत असे. पुढें ते गृहस्थ त्याच दुखण्यांत वारले. त्यांच्या मृत्यूने पत्नीला वास्तविक दुःखशोकाने व्यग्र करावयाचें. पण नसें कांही झालें नाही. त्यांची पत्नी आपल्या घरांतील वस्त्रें नेसण्याच्या खोलींत गेली, अुत्तम मूल्यवान् वस्त्रे तिने धारण केली, अगावर आभरणे घातली नि लग्नसमयी सजून आलेल्या नववधूप्रमाणें बाहेर येअून पतीच्या शवाचे पायाला तिने स्पर्श केला. याप्रमाणे पतिपदाला वदन करून–जणूं पतिदेवाची त्याचेबरोबर येण्याची आज्ञा मागून–ती त्याचे शवाशेजारी निजली. आपण तर त्याचेबरोबर जातोच आहोंत पण आपलें शवहि त्यांचे शवाबरोबर नेलें जाअून अग्निसात् व्हावें–शरीरानें, मनाने, बुद्धीनें आपण सहगामी आहोत हें सार्थक व्हावे ह्मणूनच ती निजली असल्यावाचून आणखी तिची कोणती अिच्छा असणार ? देह आपल्या पतीशेजारीं आडवा केला आणि आपण दिव्य अशा अपार्थिव स्वरूपांत पतीबरोबर निघून गेली. अिच्छामरणी होण्याचें अतिमानवी सामर्थ्य देहाहून स्वतंत्र अशा चिच्छक्तीलाच असणार! रासायनिक परिणामानें आपण होअून त्या रसायनाला सोडले नि तो परिणाम रसायन–स्वतत्र झाला असें भ्रमिष्टासारखें बडबडण्याचें शहाणपण अशा स्थली कोण मूर्ख करूं शकेल बरें !

अू—(६) याच पुस्तकांत पुनर्जन्मस्मृतीच्या अुदाहरणभागात मुकुंद ब्रह्मचारी याचें अुदाहरण आलेलें आहे. आपण आतां त्याचा प्रपंच करूं. त्यानें केलेला आत्मयज्ञ समर्थनीय होता की नाहीं ? त्याच्या अिच्छेप्रमाणे त्याला त्यामुळेच फल मिळालें काय ? तसें फल मिळविण्यासाठी हा असा मार्ग पत्करणें खरोखरीच फलदायी होण्यासारखें आहे की काय ? अित्यादि प्रश्नांकडे न बघतां येथें केवळ त्यानें केलेल्या आत्मयज्ञाचें अुदाहरणांत आत्मयज्ञाचें महाभयंकर कार्य करणारी कोणती शक्ति होती–तिचें स्वरूप काय होतें–अेवढेंच पाहावयाचें आहे. आपल्या अंगप्रत्यंगाचे कचके तोडीत ते होमांत आहुति म्हणून समंत्रक विधीनें अर्पण करीत करीत

राहावयाचें ! ! किती असामान्य सामर्थ्याचें हें दृश्य आहे बरें ! पायांत काटा मोडला तर चैन पडत नाहीं, नखाला न्हाव्यानें जरा निष्काळजीपणें जिव्हाळी लावली तर तळमळ सुरू होते, डोळयांत किंचित्सा कण गेला तर कांही सुचेनासें होतें. मग अंगावर अेखादा घाव झाला तर गोष्टच बोलावयास नको. हा ब्रम्हचारी आपली अंगेंप्रत्यंगें आपल्या हातानें तोडीत अचल नि अविकल मनस्कतेनें त्यांचा होम करीत आहे ! ! आणि तोडतां येण्यासारखीं अंगेंप्रत्यंगे संपल्यावर पूर्णाहुति म्हणून—आपला स्वतःचा देह आपल्या मनातील अेका अिच्छेच्या पूर्तीसाठी पूर्णाहुति म्हणून—आपला स्वतःचा देह शांतचित्तानें अर्पून जाळून घेत आहे हें दृश्य पाहून वा मनोदृष्टीपुढें चित्रित करून मनाला विचारलें असतां ही शक्ति जडाच्या विविध पदार्थांच्या परस्पर मिश्रणाने अुत्पन्न झालेल्या रासायनिक परिणामाची होती हे कसें पटेल ? देहाचे मर्मस्थानातील भाग—अंगेंप्रत्यंगे छेदिलीं जात असताहि हा 'रासायनिक परिणाम' अभंग कसा राहिला ? पुढें अग्नीत देह जळू लागूनहि त्या रासायनिक परिणामांत कांहींच बिघाड कसा झाला नाही ? कोणाहि खऱ्या विचिकित्सक मनाला देहातीत नि देहाहून वेगळी शक्ति नि तीहि ज्ञानवान् नि स्वतत्र अशी जीवशक्ति वा चिच्छक्तीच तेथें हे असामान्य दृश्य अुत्पन्न करणारी होती हे मान्यच करावें लागेल

अ—(७) हिंदुमधील शीख या अुपजातीला क्षात्र धर्माचा अुपदेश करून त्याना वीरत्वदीक्षा देणारा महापुरुष गुरु गोविंदसिंह यांनीं दिल्लीच्या मुसलमानी सत्तेशी हिंदुराष्ट्ररक्षणप्रयत्नासाठी विषम लढा चालविला असता त्यांची दोन अर्भकें पंजाबच्या लाहोरमधील सत्ताधीशाच्या हातीं सापडली. त्यांची वये सुमारें १० नि १२ वर्षांची होतीं. त्या दुष्ट मुसलमानी सत्ताधीशाच्या हातांत सांपडल्यावर त्या मुलांना त्यानें आपल्यापुढें बोलावलें. तीं गोजीरवाणी दोन अर्भके पुढे आणतांच त्यांचें रूप, त्यांचें तेज, त्यांची निर्भयता आदिक गुणांवर या मुसलमान अत्याचाऱ्याचें मन लोभावून त्यानें त्यांना "मुसलमान तुम्ही झालांत तर जीवदान देतों—तुम्हाला माझ्या मुलीहि देतों !—पण तुम्ही मुसलमान व्हा—नाहींतर जिवें मारले जाल !" असें सांगितलें. ते दोन बालक सिंहाचे छावे होते. त्यांना जीवभय कशाला

म्हणतात तें ठाअूकच नव्हतें. त्यांनीं त्या म्हणण्याचा नि मुसलमानीपणाचा धि:क्कार करून त्याचें म्हणणें झिडकारलें. या त्यांच्या कृत्याभुळें या मुसलमानाच्या मनांतील मुसलमानीपणाला प्रकट व्हावयाला पूर्ण वाव मिळाला. मुसलमानी क्रूरता त्यांच्या मरणाचा मार्ग ठरवूं लागली. नि शेवटीं जिवत अुभें करून भोंवताली भित बांधावयाची नि याप्रमाणें भितीत चिणून जिवें मारावयाचें–भितीत जिदें गाडावयाचें!! अशी दडाज्ञा मिळाली. ती वीर बालकें वीर मनस्कतेनें धर्मासाठी आपणाला हौतात्म्य लाभत असलेल्या आनंदानें हर्षित होअून हत्यास्थानीं अुभी झालीं. दोन्हीहि भावंडे शेजारीं शेजारीं अुभी केली गेली नि भोंवताली विटांची चुनेगच्ची भित बांधली जाअू लागली. जों जों भित त्यांचे अंगास खेटून बांधली जाअू लागली, तो तो दोघांच्याहि देहाला तणावे बसू लागले. देहाचा निसर्ग हा थोडाच चुकणार ? रक्ताभिसरणाला होणारा प्रतिबंध, भोंवताली बांधली जाअू लागलेल्या भितीचा अंगावर पायापासून चढत जाणारा दाब, त्यामुळें शरीरात अुत्पन्न होअून वाढत जाणाऱ्या वेदनाहि वृद्धिगत होत होत्या. विटांचा अेक थर झाला कीं विचारीत, 'क्यों! मुसलमान होंगे?' त्या मुलांनीं किचित् सुद्धां मृदुता नसलेल्या दृढ प्रतिज्ञेनें 'नही' अुत्तर द्यावें. याप्रमाणें चाललें होतें. जसजशी भित वाढत गेली तसतशी या दृढ प्रतिज्ञेच्या गंभीर नकाराची गर्जना अधिकाधिक कठोरपणा व्यक्त करूं लागली. शेवटीं नाकातोंडापर्यंत थर आला. पुढचे थराला श्वासोच्छ्वास बंद व्हावयाचा येथपर्यंत येअून ठेपलें. तेव्हां तो मुसलमान अधिकारी ह्मणतो "देखो, अब अखेरकी बात अेक पूछतां हूं–मुसलमान हो जाव–तो छोड दूगा!" हे बालवीरात्मे अुद्गारतात, "नहीं! अब हम अुत्तर नही देंगे! भगवानके ध्यानमें हम अपवित्र शब्दपर लक्ष देना नही मंगते!!!" हे अुत्तर देअन प्रणवाच्या अखंड घोषांत श्वास बंद होअीपर्यंत ते भगवत्ध्यानांत मग्न झाले!! ही निर्भय नि भीषण निष्ठाशक्ति, हा दुर्दमनीय देहदु:खातीतपणा, ही अचल नि अभंग अीशभक्ति आणि ही अतिमानवी हौतात्म्यशक्ति जड पदार्थांच्या रासायनिक मिश्रणाचा परिणाम ह्मणावयाला जिव्हा कशी धजावेल! ही देहापासून भिन्न असलेली, देहाचा अुपयोग

करणारी, देहाची–पालक–चालक–अनुशासक अशी जीवशक्तिच आहे असें मानण्यावाचून गत्यंतर नाही. देहाला होणाऱ्या आत्यंतिक वेदनांमुळें त्यातील रसायनांनीं बनलेला रासायनिक परिणाम त्या वेदनांच्या योगे रसायनांत त्या होणाऱ्या बिघाडाच्या योगें निर्बल, निःशक्त नि संज्ञाहीन होत आला पाहिजे होता. परंतु शरीराच्या वेदना जसजशा वाढत गेल्या, देहांतील रक्तावर जसजसा बसणारा दाब वाढत गेला नि त्यायोगें देहक्रिया नि देहांतर्गत सर्व रसोपरसामध्यें आणि अवयवामध्यें अनिष्ट असा बिघाड होत गेला तसतसा या रासायनिक–परिणामात बिघाड होण्याचे स्थली उलट तो अधिक प्रबल, अधिक निश्चयी, निग्रही, अधिक प्रखर नि शरीरनाशा-विषयीं किंचित् सुद्धा खंत न करणारा बनला. ही गोष्ट ते शरीर वा तदतर्गत रासायनिक प्रक्रिया यांचा परिणाम ह्मणजे जीव नसून याहून संपूर्णपणे स्वतत्र नि स्वयसिद्ध अशा शक्तिरूपानेंच अस्तित्वांत असणारी वस्तु असला पाहिजे असेच मानणें भाग आहे. वरील वस्तुस्थिति बघता दुसरे निगमनच निघू शकत नाही.

अे—(८) गुरू गोविंदसिहाच्या अनन्वित छळानंतर हा घायाळ सिंह पजाब सोडून दक्षिणेत नांदेड गावी येअून आपले अंतिम दिवस व्यतीत करता झाला. त्यांची करुण कहाणी नि पंजाबमधील हिंदू जातीच्या छळाची हृदयविदारक मुस्लीम कृत्यें अैकून तेथेच पूर्वी निवसत असलेला वीर वैरागी हिंदुछलाची मुसलमानी दुष्ट कृत्ये करणाऱ्या मुसलमानी सत्तेला प्रायश्चित्त देण्याची प्रतिज्ञा करून पंजाबमध्यें गेला. तिकडे गेल्यावर १४ वर्षेपर्यत पजाबमधील हिंदूंचा कैवार घेअून मुसलमानी सत्तेशी झुंजत राहिला. अनेकशः स्थली मुसलमानी सत्तेला त्यानें माती चाटावयाला लावली. पराक्रमाने रणांत अजिंक्य ठरणाऱ्या वीर वैरागीला भेदाच्या कुटिल नीतीने परास्त करावयाचें ठरवून शीखांतील लोकामध्यें मुसलमानी बादशहानें आपसातली फूट पाडली नि त्यांचे करवी वीर वैरागीविरुद्ध काहूर अुठवून शिखांकडूनच त्याला बंदी करविला. त्याला मुसलमानी शिपायांनी गच्च बांधलें आणि अशा प्रकारें हा सिंहवीर बद्ध होअून दिल्लीला आणला गेला. वीर वैरागीचे ७७० जीवाला जीव देणारे निःसीम अनुयायी होते, तेहि बंदी केले जाअून

वीर वैरागीबरोबर नेले गेले. या सर्वांना मेंढयाची कातडी पांघरवून नि गाढवांवर बसवून दिल्लीच्या गल्यांगल्यांतून त्या नीच मुसलमानी बादशहानें त्यांची धिंड काढली. वीर वैरागीच्या तोंडाला काळें फासलें होतें आणि हें सर्व राक्षसी कृत्य हिंदु जातीच्या स्वाभिमानाला चरके देत तुम्ही पददलित झाला आहांत असें जाणवण्याकरिता करण्यांत आलें.

त्या सर्व साथीदारांसह वीर वैरागीला मुसलमानांच्या काजीसमोर अुभा केला. काजीनें आपल्या धर्मांधतेच्या सवयीप्रमाणें त्या सर्वांना सांगितलें "मुसलमानी धर्ममताचा स्वीकार कराल तर प्राणदान करण्यांत येअील." असा प्रस्ताव कानावर पडणें म्हणजे धर्मवीरत्वाचा असह्य छळ होय. त्या सर्वांनी तुच्छतेनें अुत्तर दिलें "प्राण हरण करणें वा न करणें हे तुमच्या स्वाधीन आहे. प्राणदान तुम्ही कोठवर करूं शकणार?" या अुत्तरानें चिडून जाअून त्यांना ठार मारण्याची आज्ञा मिळाली. देहदंडाची आज्ञा मिळतांच त्यांचीं वीरमनें प्रफुल्लित झालीं–ते आनंदी दिसूं लागले. कोतवालीसमोर वीर वैरागीच्या दृष्टीला पडेल अशा रीतीनें प्रत्यही शंभर शंभरांची हत्या होअूं लागली. जेथें भीरू मनुष्य मरणकल्पनेनें भयभीत होअून रडूं लागतो तेथेंच प्रत्यक्ष मरण आ पसरून पुढें अुभें असल्यावेळीहि वीरहृदयी हुतात्मा कर्तव्यानंदाच्या भरानें हसत हसत मृत्यूला कवटाळतो.

या ७७० हुतात्म्यांत अेक १६ वर्षांचा कोमल कुमार होता. त्याच्या आअीनें येअून करुणा भाकली नि म्हणाली, "माझा मुलगा वीर वैरागीचा अनुयायी नाहीं–त्याला सोडा." त्या कुमाराची पाळी आली. तेव्हा मांगाने अधिकाऱ्याचे आज्ञेनें त्याला सोडून दिलें. तेव्हां तो वीर बालक म्हणतो, "माझ्यासाठी अद्याप अुशीर कां? मला स्वर्गांत जावयाची संधि मिळत आहे." मांग म्हणतो, "तुझी आअी तुझ्या प्राणाकरिता प्रार्थना करीत आहे." कुमार म्हणाला "ती चुकते आहे." आणि आअीकडे वळून म्हणतो, "तू मोठी हत्यारी आहेस! मला स्वर्गांतून नरकात फेकून देअूं अिच्छितेस काय?" हाहि वीर कुमार मारला गेला.

आठव्या दिवशीं अेका वीर बालकाची पाळी आली. त्या बादशहाने वीरवर वीर वैरागीला विचारलें, "तुला कशा प्रकारचें मरण पाहिजे!"

वीर अुत्तरला, "मला मृत्युचे सर्व प्रकार सारखेच. मी या देहालाच सर्व दु:खाचें मूल समजतों. तुला हवें तसें कर!!" वीर वैरागीच्या चारी बाजूला भाल्याच्या पंक्ति अुभ्या केल्या होत्या नि त्या प्रत्येक भाल्यावर त्याच्या अनुयायापैकीं अेकेकाचें शीर लटकावलेलें होतें. बादशहानें वीर वैरागीच्या लहानशा कोमल वीर शावकाला त्याचे मांडीवर बसवला नि अेक सुरा देअून आज्ञापिलें "आपल्या हातानें या पुत्राला ठार कर." अर्थातच त्या वीर वैरागीनें काय केलें हें सांगणें नकोच. वीरानें सुरा फेकून दिला. लागलीच त्या हत्यारी मांगानें वैरागीच्या देखतां देखतां त्या वीर बालकाच्या शरीराचे दोन तुकडे केले नि त्याचें रक्तमय हृदय (काळीज) काढून वीर वैरागीच्या हृदयावर फेकून मारलें. नंतर त्याचे तोंडांत तें काळीज कोंबण्याचा प्रयत्न केला. मानवी मनाला असह्य होणाऱ्या यातना देतांना आनंदाच्या अुकळ्यांनीं डुलणाऱ्या अधमाधमांना राक्षस ह्मणणें म्हणजे त्या जातीचाहि भयंकर अपमान करणें होय; कारण त्यांना सुद्धा ही कृत्यें करवणार नाहीत. यांना अुपमा द्यावयाची तर हे मुसलमान होते नि मुसलमानासारखे वागले असेंच म्हटलें पाहिजे.

या क्रूर महाधमी कृत्यानंतर तापवून लाल केलेल्या सांडसांनीं (चिमट्यांनी) वीर वैरागीच्या अंगातून मांस तोडून काढावयास आरंभ झाला. अेकामागून अेक तापवलेल्या चिमट्यांच्या चिमट्यांनीं मांसाचे गोळे बाहेर निघू लागले. वीराचा देह निर्मांस बनला. आंतील हाडें सर्व शरीरभर दिसूं लागली. प्रत्येक वेळी मुसलमान होतोस काय? हा प्रश्न विचारीत नि 'नाहीं' हें निर्भय नि निश्चित अुत्तर येतांच त्या तापलेल्या सांडसानें अंगांतील मांसखंड तोडून काढला जात असे. याप्रमाणे चारी बाजूला अुभ्या राहिलेल्या क्रूरांकरवीं तप्त सांडसानें मांस काढलें जाअून वीर वैरागीचा देह पूर्ण निर्मांस बनला. तरीहि त्या अतिमानवी वीरवराच्या तोंडावर खेदाची वा दु:खाची अेकहि छटा अुमटलेली नव्हती. हें कादंबरीवर्णन नव्हे–अितिहास लेखन आहे. जेव्हां वीर वैरागीच्या अंगाप्रत्यंगांतून मांसखंडें तापल्या लोहसांडसानी अुतरली जात होती तेव्हाहि वीर वैरागी विदेही धीरात्म्याप्रमाणें विदेह–निर्देह–देहातीन अवस्थेंत बसलेला होता. निजाबुद्दौल्यानें

विचारलें, "अितके महाभयकर क्लेश होत असतांहि तू अजून प्रसन्न कसा राहिला आहेस ?" यावर तो विदेहीवीर हुतात्मा अुत्तरतो. "ज्याला आत्मज्ञान आहे त्याला आत्मा सुखदुःखातीत नि देहापासून अलिप्त आहे हें ठाअूक असतें.'

जडवादी मनाने स्याद्वादी (agnostic) बनलेल्या संशयात्म्या, बघ. ही अैतिहासिक सत्यघटना आपल्या प्रयोग शाळेतील प्रायोगिक संशोधक दृष्टीच्या दुर्बिणीने बघ. देहातील मासमयता नष्ट झालेल्या नि अगालाच नव्हे तर नर शरीरातील अत्यत कोमलतम भागाला तप्त साडसाचे डावावर डाव–भाजण्यावर भाजण्या–बसत असलेल्या नि अशा केवळ अस्थिपंजर अुरून तो बाहेर दिसत असलेल्या देहातील तुझ्या 'रासायनिक मिश्रणाच्या परिणामाने अुत्पन्न झालेली जीवन स्थिति' कशी टिकू शकली याचा विचार कर. शरीरातील सर्व रासायनिक द्रव्ये पार होरपळून जळून गेलेली, शरीरात अेका अस्थिपजरावाचून रक्तमासादिक काहीच अुरलेले नाही आणि तरीहि स्वानुभवाने देहातीतपणाची साक्ष देत प्रसन्न मनानें–दुःखाचा वा क्लेशाचा वाराहि ज्या मुद्रेला शिवू शकला नाही अशा प्रसन्न मुद्रेनें–देहाहून वेगळा स्वतत्र आत्मरूप मी आहे अशी साक्ष देणारा पुरुष तुझ्यापुढें अुभा, अशा वेळी खऱ्या नि प्रामाणिक वैज्ञानिकाची भूमिका घेतलेला तू, प्रामाणिकपणाने 'जीवशक्ति' ही जड द्रव्यांच्या विशिष्ट प्रमाणाने संयोग होअून अुत्पन्न झालेला रासायनिक परिणाम आहे' असें म्हणण्याचें धाडस करू शकशील काय ?

याच लढयांत भाअी तारूसिंह याला तीक्ष्ण धारेच्या फिरत्या शस्त्रानें सोलून काढला. भाअी मणिसिहाने आपल्या देहाचे अेक अेक बंध हासत हासत करवतू दिले. साप्रतचे प्रख्यात हिंदू राष्ट्रमवत भाअी परमानंदाचे सातवे पूर्वज श्रीमान् मतिदासजी डोक्पायासून करवतीनें कापून दुभंग करण्यांत आले नि करवतीनें कापण्यास आरंभ झाल्यापासून तो मेंदू करवतला जाअून जीव निघून जाअीपर्यंत डोळयांत आसवें देखील आलीं नाहीत–तोंडीं अुस्स नाही आणि धर्माकरितां बलिदान होत आहोंत या समाधानांत मग्न झालेला असा तो पुरुष हुतात्मा झाला. असे अनेकशः

हुतात्मे झालेले आहेत. त्यांची दृढ निश्चयशक्ति नि त्या शक्तीवर कमावलेलें देहातीतपणाचें सामर्थ्य—अशा या सामर्थ्याचें नि शक्तीचें धारण करणारी जीवशक्ति शरीराहून निश्चितपणे स्वतत्र नि निराळी आहे—असेंच सिद्ध करीत आहेत. याप्रमाणे अनेकशः नव्हे तर सहस्त्रशः अुदाहरणे या भारतांत मिळू शकतील. अितरत्रहि पुष्कळ मिळतील. ही सर्व अुदाहरणे अेकमुखानें जो संदेश देतात तो हा की, जडद्रव्याची रासायनिक परिणाममय जीवशक्ति असती तर हे असामान्य दृश्य दिसू शकलें नसतें. ही जीवशक्ति—हे आत्म-तेज—ही चैतन्यप्रभा वास्तवतः दहातीत नि स्वतंत्र आहे—रासायनिक परिणाम खास नव्हे.

---

## चिच्छक्तीचें स्वातंत्र्यदर्शन

जीवनसमस्या सोडवणारे अुत्कृष्ट तत्वज्ञान, ते तत्वज्ञान प्रत्यक्षतेंत अनुभवण्याचे मार्ग आणि अध्यात्मशक्तीच्या सामर्थ्याने करतां येणाऱ्या विविध कार्यक्षेत्रांतील विविध प्रक्रिया या गोष्टी हिंदुस्थानातच पराकोटीला पोहोचलेल्या आहेत. जडवस्तुमात्रातील रहस्ये ओळखण्यासाठी ज्याप्रमाणे जडयत्राचे साहचानें मूर्तामूर्त द्रव्यावर प्रयोग करून ती रहस्यें अुलगडण्या-करिता प्रयत्न केले जातात नि प्रायोगिक रहस्यें अुलगडली जातात, त्या-प्रमाणे आध्यात्मिक जगातील अनेक गूढ रहस्यें अुलगडण्यासाठी साहचभूत होणाऱ्या मन नि बुद्धिरूप साधनानी मानसिक नि बौद्धिक प्रक्रियेच्या प्रायोगिक पद्धतीनें आध्यात्मिक जगतांतील रहस्यशोध करण्याकरिता अेक आध्यात्मिक प्रयोगशास्त्र या भारतवर्षांत अुदयास आलें नि तें येथच परिपूर्णावस्थेप्रत पोहोंचविलेले आहे. तें शास्त्र म्हणजे योगशास्त्र होय. या योग प्रक्रियेनें घडवितां येणारे चमत्कारांचे स्पष्टीकरण—जडात्मक प्रायोगिक शास्त्रबुलावर करतां येणें सर्वथैव अशक्य ठरलेले आहे. त्या शास्त्राच्या बळावर स्वतःचे देहावर नि बाहेरील जड जगतावर अशा प्रकारें स्वामित्व कमवतां येतें की त्या सामर्थ्याचे प्रदर्शनानें अनेकशः भौतिक सिद्धांत लंगडे पडतात, जडवाद जड नि पंगू पडतो; आणि जगांतली चालक—पालक—

संचालक केवळ चिच्छक्तीच काय ती असूं शकते, जडांपासून तिची अुत्पत्ति असूंच शकत नाही, हे स्पष्टपणे दृष्टिगोचर–मनोदृष्टिगोचर–होतें. त्यासाठी या आध्यात्मिक शक्तीच्या जडावरील सत्तेची, प्रभावाची, सामर्थ्याची, अुदाहरणें येथें पुढें मांडून ठेवली आहेत. ज्यांचे सत्यतेविषयी–ज्या अुदाहरणांच्या प्रत्यक्ष घटनाविषयी–सर्वांची निश्चिति पटेल, ज्याच्या सत्या-सत्यतेविषयी कोणीहि शंका घेअू शकणार नाही अशापैकी कांही ताजी नि प्रमुख अशी अुदाहरणें निवडली आहेत.

अ—(१) बौद्धधर्मपथ हा या हिंदु धर्माची अेक थोरली मोठी शाखा आहे. या पंथाचा विस्तार तिबेट, चीन, सयाम, जपान, ब्रम्हदेश आदिक पूर्व अुत्तर भागीय देशात झालेला आहे हे सर्वांना ठाअुक आहे या पथाबरोबरच योगाभ्यासाची विद्याहि थोडया बहुत प्रमाणात त्या देशात गेलेली आहे. जपानच्या टोकियो या राजधानीत बुद्ध मंदीरामधील अेक मुख्य धर्मगुरू कांहीं दिवस आजारी होते. अेके दिवशी त्यानी आपल्या शिष्यांना आपले जवळ बोलावून त्यांना, "आपण तीन दिवसांनी अिह-लोकांतून प्रयाण करणार आहोंत." असें सांगितलें. तिसरे दिवशी त्या धर्मगुरूंनी आपल्या हातानें आपले अंत्यविधि अुरकून मी दोन तास समाधिस्थ होतों म्हणून सांगितलें नि समाधीत बसले. 'अन्ते मतिः सा गतिः'–ज्या-प्रमाणें अंतीं मति होअील त्याप्रमाणें गति मिळते या सिद्धांताची सर्व हिंदु-मात्राला जाणीव आहे. तेंच तत्वज्ञान बौद्ध पंथांतहि असल्यानें आपलें मरण-कालीन प्रयाण आत्मचिंतनांत व्हावें या अिच्छेनें त्या धर्मगुरूनी समाधीत प्रवेश केला आणि त्या स्थितीत दोन तासांनी देह विसर्जन केला. यांत रासायनिक परिणामानें आपल्या रासायसिक द्रव्यमिश्रणापासून सुटका करून घेअून स्वयं स्वतंत्रपणें तो मोकळा झाला, असें, जडवाद्यांचें मत स्वीकारल्यास, म्हणावें लागेल; पण ते तसें म्हणणें म्हणजे अर्थहीन शब्दाची ती पक्तीच होअून बसेल. कार्य हें कारणापासून स्वतंत्रपणें अस्तित्वात असू शकत नाही. कार्यकारणांचे संबंध अतुट असतात. हा जडसृष्टीतील नियम आहे; पण येथें रासायनिक संमिश्रित द्रव्यपरिणाम हा स्वतंत्रपणें रासायनिक परिणाम-कारणाला सोडून गेला असें म्हणण्याची आपत्ति येते नि तसें जडवादी

म्हणू शकणार नाहीत. त्याला ही जाअू अिच्छिणारी नि गेलेली शक्ति जडद्रव्यात्मकतेहून सर्वस्वी स्वतंत्र आहे हे मान्य करणे भागच पडेल.

**आ—(२)** बरेलीचे जवळ भैरवजी मंदिराचे महंत नि विख्यात योगिराज शंभुनाथ यांनी स्वेच्छेनें जिवंन समाधि घेतली. हा जिवंत समाधि घेण्याचा समारंभ १९३४ च्या मे महिन्यांत मोठ्या प्रमाणात झाला. त्यांचें वय त्या वेळी १५० वर्षांचें होतें. समाधि अवस्थेंत देह न सोडतां देहासहच समाधि ध्यावयाची, अेक विवर करून तेथें बसावयाचें नि समाधिस्थ व्हावयाचे. समाधिस्थ योग्याचे देहाला कोणताहि किंचित् सुद्धां आघात होणार नाहीं अशा प्रकारे त्या विवराचा वरचा भाग पक्का आच्छादून नि माचून घेतात आणि त्यावर समाधिमंदीर बांधतात. याला जिवंत समाधि घेणें म्हणतात. विचक्षण विचारकांनी ही समाधि जडद्रव्याच्या रासायनिक परिणामानी घेतली किंवा जडदेहाचा अुपयोग करीत असलेल्या जीवशक्तीनें वा योगपटु मुक्तात्म्याने घेतली याचा आपल्या बुद्धीकरवी निर्वाळा घ्यावा.

**अि—(३)** पुणे येथें ता. १२-१-३४ या दिवशी वीरशैव लिंगायतांच्या धर्मशाळेत श्रीगुरु मुर्तिरुद्रदेवरू विरक्त स्वामी महाराज नामक योगी महाराजानी समाधि घेतली आणि ता. २१-१-३४ या दिवशी दुपारी १२ वाजता समाधि विसर्जन करून ते स्वामी योगसमाधीतून बाहेर आले. या मध्यंतरीच्या १२ ते २१ पर्यंतच्या काळात स्वामी महाराज अेका विवरात बसून त्यानी ते विवर बंद करविले होते. याप्रमाणे १० दिवस निर्वात स्थली देह जिवंत राहावा कसा? ज्या मिश्रणावर आपले अस्तित्व अवलंबून आहे त्या मिश्रणाची स्थिति बिघडवून तो रसायनिक परिणाम तें मिश्रण नष्ट करण्यासारखी परिस्थिति अुत्पन्न करील नि नष्ट झालेले मिश्रण पुन्हा अुत्पन्न करून स्वत: त्यातून अुदित होअील हे म्हणणे आणि पहिल्यानें बापाला जन्म देअून मग पुन्हा त्याचा मुलगा म्हणून अुत्पन्न झाल्याच्या मूर्खतेची कल्पित कथा ही दोन्ही सारखींच खरी वा खोटी म्हणावी लागतील.

**अी—(४)** हे अुदाहरण महाराजा रणजितसिंहाचे वेळचे आहे. दक्षिणेंतून अेक महान् योगी त्या वेळी लाहोरला गेला होता. त्याची परीक्षा

करण्याचें महाराजा रणजितसिंहाचे मनांत आलें नि त्यांचे अिच्छेला योगी महाराजानें संमति दिली. योग्यानें समाधि लावली. नंतर त्या योग्याचा समाधिस्थितींतला देह पंजाबी पद्धतीनें बनविलेल्या अेका पेटीत घातला नि ती पेटी सर्व बाजूंनीं पूर्णतया बंद केली. त्या पेटीला अेक भलें मोठें कुलूप लावून त्यावर मुद्रा ठोकली. ती पेटी सरदार भोलासिंह भवानियावाले यांचे रावी नदीच्या तीरावरील असलेल्या बागेमधल्या बारद्वारींत ठेवली आणि त्या बारद्वारीला जाण्याचें असलेले दार (अेकच असलेलें दार) पक्क्या विटांनी माचून बंद केलें. त्यावर त्या बारद्वारीवरील छत नि विटांनी बंद केलेलें द्वार यांवर पहारा करण्याकरितां आपले अत्यंत विश्वासू देहरक्षक नियुक्त केले. ४० वे दिवशीं तो समाधिस्थितीतला देह बाहेर काढावयाचा असें ठरलें होतें. जेव्हां अेकूणचाळीस दिवस झाले तेव्हा टॉड–राजपुतान्याचा प्रसिद्ध अितिहास लेखक–पोलिटिकल अेजंट, डॉ. मरे, मगग्रेग्यू नि अन्य प्रतिष्ठित लोक लाहोरला गेले. महाराजा रणजितसिहाने आपल्या अेका विश्वासु मनुष्याहातीं योग्याचें सर्व वृत्त कळवून त्या जमीनीत पुरलेल्याला अमुक दिवशी काढावयाचें आहे, तुम्ही डॉक्टर लोक नि अितर युरोपियन लोकांसह तें बघावयास याल तर फार चांगलें होअील- असें कळविलें होते. त्याप्रमाणें ठरल्या दिवशीं कर्नल टॉड आपल्या मित्रगणासह तेथें अुपस्थित झाले. राजा हीरासिंह नि अितर अन्यान्य शिष्ठगणांसह महाराजा रणजितसिंहहि अुपस्थित झाले. महाराजांनी बंद केलेल्या वाड्याची किल्ली आणावयाला सांगून अुघडण्याची आज्ञा दिली. वाडा अुघडला. बंद केलेल्या द्वारापुढील विटांची भिंत पाहिली. ती पहिल्यासारखी होती. पुढे ती पाडून त्यांतून ती बंद केलेली नि कुलूप लावलेली पेटी बाहेर आणली गेली. त्यावरील मोहोर परीक्षून ती मग फोडली गेली. कुलूप अुघडलें, पेटी अुघडी केली. तेव्हां योगी महाराजांच्या शिष्यानीं योग्याचे देहाला बाहेर काढून बारद्वारीचे समोर बसविला.

साधूचे अंगावर भगवीं वस्त्रें होती. तीं सर्व थैल्याप्रमाणें शिवून टाकून त्यांत साधूला बंद केलेला होता. ती वस्त्रें फाडली नि काढून टाकलीं. कर्नल टॉडनें आपले डॉक्टराकरवीं त्या देहाची परीक्षा करविली. नाडी

सर्वस्वी बंद होती. शरीरांत प्राणाच्या अस्तित्वाचें किंचित् सुद्धां चिन्ह नव्हतें. साधूच्या शिष्यांनी साधूच्या डोक्यावर (ब्रम्हरंध्रावर) कानांत, नाकांत नि ओठावर तीं ती देहछिद्रे बंद करण्यासाठी कापूस नि मेणगोळयांत बदामाचें रोगण घालून मळून सिद्ध केलेले गोळे बसविलेले होते ते काढले. वरील-प्रमाणें अतीव प्रबंधात बंद करून ठेवलेल्या देहांतील तो जडवाद्यांचा रासायनिक परिणाम मेला होता—नष्ट झाला होता. तेव्हा वास्तविक सर्व मिश्रण बिघडल्यामुळें नि सुयोग्य रसायनस्थिति न असल्यानें नष्ट झालेला रासायनिक परिणाम पुन्हां जिवत व्हावा हे अत्यंत अस्वाभाविक, अनैसर्गिक नि म्हणून अशक्य होतें. ही जीवशक्ति त्या जडवाद्यांचे म्हणण्याप्रमाणें जर खरोखरी रासायनिक परिणामच असता तर त्याची पुनरुत्थानाची आशा करणे सुद्धा वेडेपणाच ठरता—मग शक्यता कोठली ? पण रासायनिक परि-णाम ही जडवादीकल्पित भगड कल्पना होय—खरी वस्तुस्थिति नव्हे. साधूचे देहछिद्रावरील गोळे काढल्यावर पूर्वी डॉक्टरांनीं परीक्षून मृत स्थितीतल्या ठरविलेल्या देहांत पुनरुत्थानाच्या नियुक्त वेळी योगी महाशयाचा आत्मा वा जीवशक्ति पुन्हा प्रकट होअू लागली. साधूचे नेत्र अुघडले गेले. त्यानें अुच्च स्वरानें ध्वनि करून जोरात वायू आंत खेचला नि महान् कृष्णसर्पाप्रमाणें अेक भयंकर सुस्कारा टाकला. यानंतर साधूच्या देहांत सर्वत्र प्राणसंचार झाला. शिष्यानें आणून ठेवलेल्या गंगाजलानें त्यानें स्नान केलें. महाराजांनी घ्यावयासाठी आणलेले दूध घेतले नि योगिराज पूर्ण सुस्थ झाले. त्याना विचारतां ते म्हणाले की, अिंग्रज लोकांना परीक्षा करावयाची असली तर करावी. अेक वर्षभर याप्रमाणें मी समाधीत राहून दाखवतों; पण त्याकरितां मला कलकत्ता नगर प्रदान करावें लागेल. अर्थात् अिंग्लिश लोकांच्या गुरूनें त्याना शिकवलेल्या विद्येंत घेतलेलें परत देण्याचा धडा शिकवलेला नव्हता. तेव्हां तें घडलें नाहीं हें निराळ सांगणें नकोच.

देहाचीं नाकतोड आदिक सर्वद्वारें पूर्ण बंद करून कपडयाचे पिशवींत शिवला जातांनाच जड द्रव्याच्या रासायनिक परिणामानें राम म्हणावयास पाहिजे होता. सामान्य देहधाऱ्यांचे तसेंच झालें असतें. पुढें तो देह पेटींत बंद, ती पेटी चोहोंकडून छिद्रें बंद झालेली, चोहोंबाजूनीं पक्क्या भिती अस-

लेल्या नि वर गच्चीसारख्या बांधलेल्या घरांत ठेवली जाऊन त्या घराचें दारहि पक्क्या विटांचे भितीनीं बंद झालेलें, ४० दिवस या स्थितींत तो देह ठेवला गेला. अशा स्थितीत त्या रासायनिक परिणामाला आंतच मूठ-मातीं मिळून पुन्हां प्रकट होण्याचें सामर्थ्य स्वप्नांतहि दिसले नसतें. पण ही वस्तुस्थिति घडून आली खरी; येथे अध्यात्मशास्त्राच्या जीव वा आत्म-शक्तीचेंच अस्तित्व मानावें लागतें. त्यावाचून सुटकाच नाही.

**अु—(५)** लाहोरला १९३४ च्या अेप्रीलचे पहिले आठवडयात अेक विलक्षण सामर्थ्याचे योगी आले होते. त्याचे नाव योगी हीरानद हें आहे. दिसण्यात ३० वर्षांचे दिसत होते. त्या योग्याचा प्रयोग पाहण्यासाटी अर्धा तास त्यांना पुरून ठेवलें होते. हा प्रयोग करतेवेळी लाहोरचे पुष्कळ प्रसिद्ध गृहस्थ अुपस्थित होते. त्यात पंजाबच्या गुप्त पोलिस खात्याचे मुख्याधिकारीहि अुपस्थित होते. अर्ध्या तासानंतर त्याना पुरलेल्या स्थितीतून अुकरून बाहेर काढले. थोडयाच वेळांत पुन्हा भानावर येअून अर्ध्या तासाच्या पुरून घेण्याच्या क्रियेचा त्यांचेवर काहीहि परिणाम झालेला दिसला नाही. योगिराज म्हणाले की, योगी वाटेल तितक्या काळपर्यंत आपणाला पुरून घेअून राहू शकेल.

सहा अिच लाम्बीचे धार लावून तीक्ष्ण सुळे काढलेले खिळे ठोकलेल्या फळ्यावर ते निजले. पुढें त्यांचे छातीवर दगड ठेवून ते वरून मोठाले घण मारून फोडले आणि हें सर्व होत असताना ते अगदी निर्विकार स्थितीत निजले होते. शरीरांत तीक्ष्ण सुळे घुसूं न देता वा त्यामुळे घावहि न होअूं देतां हा योगी पुरुष स्वस्थ निजलेला होता. रानात वा अरण्यांत सिह-व्याघ्रादि हिंस्र पशु समोर येतांच त्याच्यापुढे गोगलगाया बनतात. त्याच्या अगी असलेल्या कांही शक्ति याप्रमाणें प्रकट झाल्या. त्यानी सांगितले की, दगडातून पाणी काढणारे वा नुसत्या स्पर्शाने प्रचड वटवृक्ष जमिनीला लोळवणारे योगी पाहिलेले आहेत. त्याचे गुरू ३०० वर्षांचे आहेत; ते श्रीगोदावरी तीरीं कोठेंतरी वास्तव्य करीत असतात. अितकीं वर्षे कसें जगतां येतें अशा प्रकारें विचारतां ते म्हणाले, "जे कालातीत आहेत त्यांचेवर कालाचा परिणाम काय म्हणून व्हावा?"

हें प्रचंड सामर्थ्य, हा कालातीत असण्याचा अनुभव नि तत्प्रतिपादक स्वानुभवी निश्चितीचे बोल जडद्रव्याचा रासायनिक परिणाम बापडा कसें काढू शकणार? ही शक्ति त्या जगत्स्वामित्व गाजविणाऱ्या चिच्छक्तीच्या चिदशाचीच असूं शकणार!

अू—(६) समाधिस्थ होअून प्रेतवत् असलेल्या योग्याला दुसरा अेक सिद्ध विशिष्ट अवधीनंतर शुद्धीवर आणून पुन्हा समाधिस्थ स्थितीत जाअूं देतो. 'बगाल लॅन्सर' नामक पुस्तकात लेखक मेजर यीटम् ब्राअून म्हणतात, "मी प्रेत (प्रेतासारख्या स्थितीत असलेला समाधिस्थ योगी) दोनदां अुठवलेले पाहिले आहे. प्रेत होअून पडणारा सिद्ध पहिल्यानें आपली सिद्धता करतो. कोठा स्वच्छ करून अुपवास करतो नि केवळ वायुभक्षणावर २४ तास राहतो. त्यानतर तो समाधिस्थ होण्यापूर्वी खूप प्राणवायु भरून घेतो नि नतर त्याला गुगी येअू लागते. ती येअू लागली म्हणजे मुख्य रक्त-वाहिन्या नियंत्रित करून समाधान पावते. त्याचे शिष्य त्याला पुन्हां पुरतात. पुन्हां सावध होण्याच्या वेळी पूर्वी डॉक्टरांनी त्याची परीक्षा केली नि तो मेल्याचे सागितले. त्याचे अगात चैतन्य किंचित् सुद्धा असल्याचें आढळून आले नाही. पण ठरलेली वेळ येताच प्रेतवत् झालेला सिद्ध जिवंत होताना फार विलक्षण प्रकार घडतो. आधी त्याचे शरीर सरळ नि ताठ होअू लागते. मिटलेले डोळे किंचित् किलकिले होतात नि तोंडांतून कर्कश शिळेसारखा कर्णभेदक ध्वनि निघूं लागता नि तो योगी जिवत होतो.

अे—(७) फ्रेंच विदुषी डेव्हिड नील बुद्धपथ स्वीकारून योगिनी बनल्या आहेत. त्यानी तिबेटात १४ वर्षे घालविली. त्यानी तिबेटांतील लामाच्या नि अितर योग्याच्या अनेक अद्‌भुत गोष्टी पाहिल्या आहेत. त्यात योगनिद्रेत अन्नपाणी मुळीच न घेता शेकडो मैलांचा प्रवास अत्यंत वेगानें करताना त्यानी काही योग्याना पाहिलेले आहे. जे अतर कापावयाला घोडेस्वाराला अेक महिना लागतो तेच अंतर हे योगतंद्रीत थोडया दिवसांत कापूं शकतात. त्यांपैकी असाच अेकजण चालला असतां त्यांचे जवळून गेला. त्या वेळी तो कसा दिसला याविषयी त्या वर्णन देतात, "तो सिद्ध

आपल्या वेगांत असतां अगदीं आमच्या जवळ आला. त्याची मुद्रा अगदीं शांत दिसत होती. त्याचे विशाल नेत्र अगदीं अुघडे होते. तो धावत नव्हता— चालत होता. पण फार त्वरेनें चालत होता. जणूं काय त्याचे पाय जमिनीला लागत नव्हते. त्याची गति हालत्या लंबकाप्रमाणें प्रमाणबद्ध होती. आम्ही दोन मैलपर्यंत त्याचे बरोबर त्याचे मागेमागें गेलों. नंतर तो मार्ग सोडून बाजूची चढण चढूं लागला नि कडे मागें टाकीत तो डोंगरात कोठल्या कोठें निघून गेला.”

अै—(८) डॉ. कॅनन नावाचे अेक विद्वान् गृहस्थ अिंग्लंडमध्यें आहेत. M. A. M. D. नि F. R. C. S. आहेत. रॉयल मेडिको सायकॉलॉजिकल असोसिअेशनचे (राजकीय वैद्यकी मानसशास्त्र मंडळाचे) सभासद, रॉयल सोसायटी ऑफ मेडिसिन (राजकीय औषध समिति)चे सहाय्यक (फेलो), वैद्यकीय नि शस्त्रवैद्यकीय महाविद्यालयाचे मानसशास्त्रीय औषधोपचारक म्हणून पदवीधर (डिप्लोमेट अिन् सायको–मेडिसिन ऑफ दि रॉयल कॉलेज ऑफ फिजीशिअन्स् ॲन्ड सर्जनस्) आहेत. “प्रिन्सिपल्स ऑफ सायकिॲट्रि” नांवाच्या शिक्षणक्रमासाठी निवडलेल्या प्रसिद्ध पुस्तकाचे लेखक आहेत. त्यांनी अेक नुकतेंच (अदृश्य शक्तिप्रभाव) ‘अिन्व्हिजिबल अिन्फ्लुअन्स’ नांवाचें पुस्तक लिहिलें आहे. त्यांत त्यानी हिंदुस्थानांतून तिबेटांत असा जो प्रवास केला त्या प्रवासांतील अनुभवलेल्या नि पाहिलेल्या गोष्टींचें नि घटनांचें वर्णन आहे. त्यांतील कांही प्रमुख नि मुख्य अशा दोन तीन गोष्टी येथें अुद्‌धृत करावयाच्या आहेत. त्या येणें प्रमाणें:—

(अ) ‘जस्टिस मॅककार्डी हे प्रवासात असता अेका परक्या देशात (हिंदुस्थान वा तिबेट) अेका गृहस्थाशी त्यांचें वांकडें आलें. तो गृहस्थ जारणमारणादिक विद्यांचा जाणता होता. तो रागावून मॅककार्डीला म्हणाला, “आजपासून ७ वर्षांनीं हें तुझें शरीर नष्ट होओील. माझ्या आज्ञेनें अेक जुनी बदूक तुला अस्तित्वांतून नाहीसें करील आणि तूं लज्जास्पद मरणाचा वाटेकरी होशील. तुझा प्राण कोणी घेतला हें जगाला ठाअूक असणार नाहीं; कारण तो मृत्यु तुझ्या हातानें घडणारा नसून अदृश्य

जगांतून माझा हात तुला ठार करणार आहे–याचा प्रत्यय तुला लवकरच येईल." आणखी त्याचप्रमाणें घडलें. सात वर्षें झाली आणि वर्तमानपत्रांतून जस्टिस मॅककार्डीनें आत्महत्या केली अशी बातमी प्रसिद्ध झाली. ही कांहीं आत्महत्या नव्हती–तो त्या जारणमारणी मनुष्याचा हात होता. त्यापूर्वी १४ दिवस या थोर गृहस्थाला रात्री २ वाजता प्रत्येक दिवशी दोन चमकते डोळे दिसत. मला याचा अर्थ कळला होता; पण त्या गृहस्थाच्या समाधानार्थ मी त्याला, "अं:, त्यात काय आहे?" असें सांगून शात करण्याचा प्रयत्न केला. माझे हे सांगणें चुकीचें होतें. त्या मांत्रिकाचे ते डोळे होते नि वेळ येताच तो गृहस्थ त्याने ठार केला. ग्रँड लामानें मला पूर्वी असें होणार म्हणून सांगून तुम्हांस हवे असल्यास त्याचें मरण मी हवे तेवढें लाबवूं शकेन असें सागितले होतें; पण मला त्याचें विस्मरण झालें होते.

(आ) डॉ. कॅननचा अेक स्नेही प्रो. अेक्स् (खरे नांव दिले नाही.) हे अेक योगी आहेत. रात्री शय्येवर आपला देह ठेवून ते देहाबाहेर दुसरीकडे जातात. त्यांचे वय १०० वर्षांहून अधिक असल्याचे ते योगी सागत असून ते दिसण्यात ४० वर्षें वयाचे दिसतात. ते नि डॉ कॅनन अेक दिवस द्राक्षीच्या बागेंत फिरावयास गेले. तेथें बागेच्या टोकाशी अेक मोठा जुनाट वृक्ष होता. तेथील घटनेचे वर्णन डॉ. कॅनन पुढीलप्रमाणें करतातः–बागेजवळ गेल्यावर त्या वृक्षापासून बरेच अंतरावर अुभे राहून ते योगी त्या वृक्षाला अुद्देशून म्हणाले, "तुझे आयुष्य चागलें गेले आहे. आयुष्याचे धक्के–चपेटे बरेच सोसलेस. तूं माझ्या आत्म्याला सुख दिलेंस आणि सरक्षिलेस. आतां तुला हे जगत् सोडावयाचा समय आला आहे. आतां देह सोड नि पुन्हां जन्माला येअू नकोस." हें म्हणणें संपले नाही तोंच तो वृक्ष तत्काळ वाळून गेला. मला त्याजजवळ जाअून परीक्षिण्यास सांगितले. कदाचित् ही दृष्टिबद्धता असेल असें वाटून त्या वाळत्या वृक्षाची छायाचित्रें घेतली. त्यांतहि त्याच वस्तुस्थितीचें प्रतिबिंब वटले. आता त्या स्थलावर अेक गवताची काडी देखील अुभी नाही. रखरखित अुखरभूमि तेथें आहे."

(अि) प्रति सात वर्षांनीं शुद्धीवर येअून पुन्हां समाधींत जाणाऱ्या योग्याला डॉ. कॅननने पाहिलें. त्याचें तें वर्णन पुढीलप्रमाणें देतात, "श्रेष्ठ

लामा आपल्या सिंहासनावर बसलेले होते. नंतर हातानें मशाली पेटवून घेतलेले पुष्कळ संन्यासी तेथें आले. ती जागा वाटोळी होती. ते सर्व वर्तुळाकार बसले नि तोंडानें मंत्र म्हणत होते. त्या लामानें प्रार्थना म्हटली नि नंतर आठ जणांनी अेक दगडी पेटी आणली. त्यावरील झाकण बसवलेला दगड काढला गेला. त्यांत अेक प्रेतासारखी आकृति मला दिसली. सुवर्णध्वजापासून खाली जाअून ती आकृति तपासण्याची आम्हाला अनुज्ञा मिळाली होती. त्याला नाडी नव्हती. हृदयाचें स्पंदनहि नव्हते. तें शरीर पाषाणाप्रमाणें अगदी थंडगार होते. अेक दिवसाच्या मृत मनुष्याप्रमाणें डोळे दिसत होते. मी नाकाशी काच धरली. हेतु हा की किंचित् जरी श्वास असला तरी कांचेवर श्वासातली वाफ लागून श्वास असल्याचे कळेल; पण किंचित् सुद्धां ओलावा असल्याचे काचेवर दिसले नाही. ते शरीर अगदीं प्रेतच होतें असें वाटले. त्याची समाधि अुतरली. त्याने लामाला वंदना दिली नि पुन्हां समाधिस्थ होअून त्या पेटीत जाअून निजला.

(अी) डॉ. कॅननंनी आपल्या पुस्तकात आपणाला अुत्क्रांतिशक्ति (पाण्यावर आदिक स्थली स्पर्श न करता अुर्ध्वगामित्व प्राप्त होते त्याला योगशास्त्रांत अुत्क्रांतिशक्ति असें म्हणतात.) काही अंशाने प्राप्त झालेली आहे असे अुल्लेखलेलें आहे. अेकदां अेक वेळ त्यांचे योगी स्नेही पर्वतश्रेणीतून अनुल्लंघनीय अशा मार्गानें श्रेष्ठ लामाकडे जात असता वाटेत अेक ३०० फूट लांबीचा पर्वतमार्ग लागला नि त्याचे खाली अेक नदी वाहत होती. नदीच्या पलीकडे साधारणत. ५० फुटांवर लामानें पाठविलेला मार्गदर्शक अुभा होता ती नदी कशी पार लंघावी हें समजेना; पण लामाचे निरोप्याने सूचना दिल्या. त्या अुत्क्रांतिशक्तीविषयी सहसा कोणाचा विश्वास बसणें शक्य नाही. ती शक्ति योगी स्नेह्याच्या साह्यानें डॉ कॅननंनें स्वायत्त केली होती. डॉ. कॅनन सांगतात, "थोड्याशा तासांच्या प्रयत्नाने आमचे देह हलके झाले नि आम्ही दोघेहि नदीवरून अधांतरी चालूं लागलों आणि आम्ही याप्रमाणें अधांतरी चालून थोड्याच वेळांत पैलतीराला पोहचूं शकलों." *

---

* डॉ. कॅननंनी हें पुस्तक लिहिल्यावर असलें भोळेपणा वाढविणारें नि १७ वे शतकांतील अज्ञान फैलावणारें पुस्तक लिहिल्यामुळें सरकारी शाळेच्या

बेल्जमच्या ब्रुसेल्स राजधानीमध्यें या विद्यांचा, अभ्यासकांना नि अिच्छुकांना शिक्षणक्रम देअून शिक्षण देणारे शिक्षक अेलमर अी. नोबेल्स म्हणून गृहस्थ आहेत. त्यानी 'सायकालाजी फाअुडेशन सोसायटी' म्हणून सस्था काढलेली आहे. त्या संस्थेच्या वतीने दिल्या जाणाऱ्या अभ्यासक्रमाचे माहितीच्या 'कंप्लीट सिस्टिम ऑफ पर्सनल अिन्फ्ल्यूअन्स अँड हीलिंग' नामक पुस्तकांत पुढची अेक घटना दिलेली आहे.

" मनाच्या सामर्थ्याने भौतिक शक्तीवर योगी विजय मिळवून पाश्चात्य प्रायोगिक विज्ञानशास्त्रानी शोधून काढलेल्या भौतिक जगाचे निसर्गनियम लगडे पाडतो. मी तें कसें होतें याचा अुलगडा करण्याचे भानगडीत न पडता घडलेली घटना केवळ पुढें ठेवीत आहे आणि ती पुष्कळांना बोधप्रद वाटेल. दादी मिश्र नांवाचा अेक अेकान्तवासी साधु होता. त्याच्या अेकान्तवासाच्या गुहेपासून जवळात जवळचे गांव १०० मैलावर होते. त्याच्यांत फार मोठाल्या शक्ति होत्या आणि शेकडो जण आपल्या संकटा-अडचणीतून सुटण्याचा मार्ग विचारावयाला त्याचेकडे जात असत. अेकदा अेक युरोपियन प्रवासी त्याची कीर्ति अैकून आपल्या अेका विशेष महत्वाच्या प्रश्नाचा अुलगडा करून घेण्याकरिता त्याचेकडे जाण्यास निघाला. पुष्कळ कष्टानी नि दुर्गम मार्ग तुडवीत तो त्या तपस्याचे गुहेकडे गेला; पण हा अजाणता युरोपियन गृहस्थ त्या गुहेचे द्वार अेका मोठया प्रचड शिळेने बंद झालेले

अध्यापकाचे जागेवरून त्यांना अधिकाऱ्यानीं काढून टाकलें; पण पुढें अनेक प्राध्यापकानीं अर्ज करून कळविलें कीं, डॉ. कॅननने पुस्तकामधून ज्या गोष्टी प्रतिपादल्या आहत त्या नि तसल्याच गोष्टी सत्य आहेत असें आम्हालाहि प्रामाणिकपणें आणि अनुभवानें वाटतें. तेव्हां ज्या कारणाकरिता त्याना काढलें त्याच कारणाकरिता आम्हालाहि काढावें अथवा त्यांना पुन्हा कामावर घ्यावें. अर्थात् अधिकाऱ्यांना अितक्या प्राध्यापकांना काढणें अिष्ट न वाटून त्यानीं डॉ. कॅननवरील दोष परत घेऊन त्यांना पुन्हा पूर्वपदावर नियुक्त केलें. यावरून त्यांचे पुस्तकाला नि त्यांतील गोष्टींचे सत्यतेला विद्वानांचा किती नैतिक पाठिंबा आहे हें स्पष्ट होईल.

पाहून आश्चर्यचकित झाला. ती शिळा वजनांनीं कित्येक टन भरेल अितकी मोठी होती. ( २८ मणाचा अेक टन होतो. ) वास्तविक त्या पर्वताकडे येतांना, पर्वताच्या समोरच्या बाजूनें त्या गुहेंत जातांना, फिरून आत शिरतांना नि बाहेर पडताना त्या साधूला त्यांनी पाहिलेलें होतें. गोंधळून जाअून निराश नि थकलेला असा तो प्रवासी खडकाचे समोर त्या साधूची वाट पाहत निश्चय करून बसला. साधारणत: २० मिनिटांनी धुकटशी आकृति त्याचे दृष्टीस पडली. ती आकृति त्या खडकाचे मध्यभागांतून बाहेर येत आहेसें वाटलें. हळू हळू त्या धुक्याचे आकृतीनें त्या साधूच्या देहाचा आकार धारण केलेला दिसूं लागला. नंतर तो साधु गंभीरपणें पावले टाकीत त्या प्रवाशासमोर येअून म्हणतो, 'बेटा! मला काय विचारावयाला आला आहेस?' अुत्तराकरता वाटहि न पाहतां त्या योग्याने त्या प्रवाशाला त्या गुहेत चलण्याविषयी हाताने खूण करून सुचविलें. ज्या खडकामुळें गुहेंत जाणें त्या प्रवाशाला कांही क्षणापूर्वी अशक्यसें होअून बसलें होतें तो खडक जादूप्रमाणें अेकाअेकी नाहीसा झाला. आपल्या प्रश्नाचेंहि त्या प्रवाशाला भान होअीना अितका तो गोंधळून गेला होता. पण त्यामुळें अडचण पडली नाही. आंत गेल्यावर साधूनें आपलें आसन घेतले नि प्रवाशाला बसावयास सांगून तो म्हणाला, 'बेटा! बैस. तुझ्या मनांतला प्रश्न मला ठाअूक आहे. थांब मला मनोजगतांत ( etherial plane ) प्रवेश करूं दे. मग मी तुझें अुत्तर देअीन' असें म्हणून त्यानें डोळे मिटले नि त्याचें शरीर क्षणार्धांत निश्चेष्ट झालें. पूर्वीची धुकट आकृति त्याचे देहाबाहेर पडली नि तिनें शरीराभोंवतीं प्रत्येक प्रदाक्षिणेचे वेळी वर्तुळ वाढवीत वाढवीत १३ प्रदक्षिणा घातल्या नि शेवटीं ती नाहीशी झाली. पुन्हां परत येअीपर्यंत किती तरी काळ लोटला असें त्या प्रवाशास वाटलें. ती आकृति परत आल्यावर पूर्वीप्रमाणें या वेळीं प्रदक्षिणा संकुचित करीत करीत घातल्या नि ती आपल्या देहांत शिरली. हळू हळूं निश्चेतन झालेली त्या योग्याची मुद्रा सजीवतेचीं चिन्हें धारण करूं लागली. डोळे अुघडले नि अगदीं गंभीर नि मृदु स्वरांत जें कांही मार्गसूचन त्या प्रवाशाला पाहिजे होतें तें त्या योग्यानें दिलें. हें सर्व होत असतां त्या गुहेंत मंद पण सुंदर प्रकाश पसरलेला होता आणि अवर्णनीय सुगंध दरवळलेला होता."

याच पुस्तकांत मागें अेके स्थली फ्रेंच डॉक्टराच्या प्रयोगांत शरीरांतून जीव जातेवेळी धुकट आकृति बाहेर पडते हें दिसून आल्याचें वाचकांना आठवत असेलच. वेदान्तशास्त्रात सांगितलेला लिंग वा सूक्ष्म देह तो हाच. हाच जडदेहांत प्रवेश करतो नि जन्म घेतो. योगी याच देहानें स्वेच्छेनुसार शरीरांतून जा-ये करूं शकतात नि तीच घटना वरील गोष्टीत घडलेली आहे

---

## आणखी अेक प्रत्यक्ष घडलेली गोष्ट

( ले. ना. का. सोमण पेन्शनर हे. मा., अकोलखेड. )

ओ—(९) अकोलखेड येथील पुरुषोत्तम नरहर अर्थात् आप्पा भटजी, वय ३०-३२, हे येथून जवळ असलेल्या अकोली जहागीर येथील आपल्या मित्राला निरोप देण्याकरिता पौष वद्य पक्षात दुपारी १२ वाजता पणज रस्त्याने गेले. अर्ध्या वाटेवरून परत येत असतां अेक जटाधारी भव्य तेजःपुंज सत्पुरुष अंगात पाढरी स्वच्छ कफनी, हातात कमंडलू, पायांत खडावा, दाढी पाढरी पण जरा सोनेरी, पिंगट रंगाचा असा दिसला. त्याला नमस्कार केल्यावर तो अुद्गारला, 'तुम्हाला मृत्यु-गडांतर आहे. तीन महिन्यात मराल.' यामुळे भिअून ते गृहस्थ हातीपायी पडूं लागले. ते त्याची जन्मवेळ नि मृत्युयोग अित्यादि सागूं लागले. चैत्र कृ. १३ मृत्युयोग हे अकून जास्तच भिअून आम्हाला अुपाय सांगा म्हणूं लागले नि जवळचा कमरेचा अेक रुपया काढून कमडलूंत टाकला. त्यामुळें ते साधु सतापले, रागावून बोलूं लागले. कमंडलूंतला रुपया काढून फेकून दिला नि जाअूं लागले. हेहि मागून जाअूं लागले. "मत आना. जलके खाक हो जाओगे' असें म्हणाले, तरीहि अुपाय सांगावा म्हणून-'मरणांतून वाचवा' अशी विनंति करीत ते मागून जाअूं लागले. तोंच ते म्हणाले, 'कोअीभी साधू तुमको मिलेंगे, मत आना, जाव' असें म्हणाले नि थोडेंच अंतरावर गुप्त झाले. समोर चालत असतां त्यांचे पाय जमिनीला लागत नव्हते. मूर्ति पुढें मागें चालत होती. रूपया तेथें शोधला. तो सांपडला नाहीं.

घरीं आल्यावर लागलीच हा वृत्तान्त वडिलांना नि अितरांना सांगितला. मृत्युयोग तीन महिन्यांनी ह्मणजे चैत्र कृ. १३ चा सागितला यामुळें चैन पडेना, अन्न धकेना, संतपुरूष कोण पाहावा, पत्रिका पाहिली तो योग असलेला दिसला. पहाडांत कोणी साधु पाहिले, अकोल्यास राजेश्वराचे देवळाजवळील ज्योतिष्यास पत्रिका दाखविली तों खडतर योग म्हणून समजलें. ध्रुव चांदणी दिसेना. कानांत बोटें घातलीं पण् ण् वा गुं ''असा शद्व अैकू येअीना. ते घाबरून गेले. काशीस जाअून विश्वेश्वराच्या मंदिरात पडून राहावें असा विचार आला; पण साधुसतांची भेट या शब्दाची तळमळ लागली.

नंतर ते सुनगांव ता. जळगांव येथें मामाकडे गेले. ते ज्योतिषी आहेत. त्यांना सर्व वृत्तान्त सांगितला, पत्रिका पाहिली, तसा योग आहे असें म्हणाले. मग त्यांनी समीपच्या पळशी येथील बाबाजी महाराज या साधुपुरूषाचे दर्शन करण्यास सागितलें. त्याना या साधुमहाराजांचा अनुभव आलेला होता; पण त्यांनीं बाबाजी महाराजांना कधीं पाहिलें नव्हतें. घरी परत आल्यावर चैत्र व. १२ चे दिवशीं अेक सत्पुरुष स्वप्नांत येअून 'आ जाव' अितकें म्हटल्याचा भास झाला. दुसरे दिवशी पळशीजवळ बोडखे या गावी त्याचा मावस भाअु राहतो त्याला घेअून पळशीस बुवांचे मठांत आले. या दिवशी अंग भारी पडलें होतें. बाबाजी महाराजांचे दर्शन घेअून त्याना सर्व वृत्त सांगितलें. त्यांनी धुनीतील विभूति सर्व अंगास लावली नि दुसरे दिवशी येण्यास सांगितलें. श्री बाबाजी महाराज जटाधारी असून अगदी कृश नि शुष्क झालेले आहेत. पहांटेस ४ वाजता अुठून स्नान केलें नि मठाला लागून श्री शंकराचे मंदीर आहे त्यांचे दर्शन घेअून मठापुढील बागेंतील दोन झाडे ध्यानस्थ बसण्याची आहेत, त्या झाडाखाली ध्यानस्थ बसतात. त्यानंतर तेथून आटचे पुढें अुठून धुनीपुढील ओटयावर बसतान, सर्वांशी बोलतात, भूतबाधा, रोगबाधा यांवर अंगारा देतात.

दुसरे दिवशीं हे तेथें गेल्यावर घरापासूनच त्यांचे अंग जड वाटूं लागलें होतें. महाराजांनीं सर्व अंगास विभूति लावून दिली नि अुद्यां

अमावस्येला १२ वाजेपासून ३ वाजेपावेतों या शंकराचे देवळांतून हलूं नका, कशीहि स्थिति प्राप्त झाली तरी भिअूं नका, अभिषेक टाकूं नका असें सांगितलें. मग अमावस्येच्या दिवशी ४ ब्राम्हण सांगून पूजेची सर्व सिद्धता करून दहा वाजतां देवळांत गेले. ११–११॥ चे सुमारास यांनीं हातांत अभिषेकपात्र धरून ब्राम्हणासह रुद्राभिषेकाला आरभ केला. त्या दिवशीं त्यांचे वडील तेथेंच आले होते. बाहेर सोमवार सोमवती म्हणून नवसाच्या दर्शनाच्या गाड्या अुतरल्या होत्या. स्वयंपाक चालूं होता.

सुमारें १२ चे सुमारास आप्पा भटजीस घेरी येअून अभिषेकपात्र खाली पडलें नि ते आडवे झाले. लागलीच दुसऱ्या भटजीनें तें अभिषेकपात्र त्यांच्या हातांत देअून तो त्यांचा हात आपल्या हातांत धरला नि अभिषेक चालूं ठेवला. महाराज दाराबाहेर झाडाखाली ध्यानस्थ बसले होते. बाहेर मंडळीत देवळामध्यें भटजीस झीट येअून ते पडले. याविषयी कुलकुल चालूं झाली. वडिलाना वाअीट वाटले. बाहेर लोक शोक मानूं लागले. स्वयंपाक बंद झाले. तामगांवचा वैद्य ( डॉक्टर सदृश ) होता. त्यानें नाडी पाहिली ती बद झाली आहे असे गांगितलें. अशा निश्चेष्ट स्थितीत ते पडले होते. या अवस्थेंत काळ पुरुष आपणांस दोरा बाधून वर वर नेत आहेत असा प्रकार दिसे पण बोलतां येत नव्हते. बरेच वर वर नेल्यावर त्याना तीन सत्पुरुष दिसले. त्यांतून अेक तीन महिन्यापूर्वी भेटलेले अेक, दुसरे मठांतील बाबाजी महाराज नि तिसरे अेक कोणी अज्ञात पुरुष होते. बाबाजी महाराजांनी त्या काळपुरुषाबरोबर बोलणें करून त्याना जावयास सागितलें. ते निघून गेले. दोर सोडले गेले नि त्या अवस्थेंत तोंडाला हात लावला. तोंच निश्चेष्ट देहाचे तोंडांतून किंकाळी निघाली. ते भटजी सावध होअन झटक्यासरशी अुठून बाबाजीच्या धुणीजवल येअून पडले. बाबाजी नुकतेच ध्यान आटोपून मठांत ओटयावर येअून बसले होते. भटजीच्या अंगाला दोऱ्याचे वळ होते. बाबाजीनी विभूति लावली नि काय काय दिसलें ते विचारलें. तेव्हां वरप्रमाणें वृत्तान्त सर्वांसमक्ष सागितला. संध्याकाळी थोडा स्वस्थपणा वाटूं लागला. दुसरें दिवशी नित्याप्रमाणे वरे वाटूं लागलें. श्री बाबाजी महाराजांची तेव्हांपासून यात्रेंत आलेल्या मंडळीमध्ये हें वृत्त फैला-

वून विशेष प्रसिद्धी झाली नि त्या वेळेपासून त्या शंकरपिंडीला नि मठाला प्रकटेश्वर हें नांव प्राप्त झाले.

**औ—(१०)** बंगालमध्यें पटीराम या गांवी हिरालाल नांवाचा अेक मनुष्य राहत होता. त्याला मंत्रविद्येचा नाद होता. आसाम सीमेत कामरूप कामाक्षा नांवाचें देवस्थान आहे. तेथे फार प्रचंड सामर्थ्याचे मांत्रिक राहत असतात. ते स्थान त्या विद्येचें माहेरघर समजलें जातें. हिरालाल हा तेथें मंत्रविद्या शिकावयाला गेला होता. तेथून शिकून परत आल्यावर आपले अंगीं आलेल्या मंत्रसामर्थ्याचा प्रभाव आपले ग्रामबंधूंना दाखवावा या हेतूनें त्यानें ग्रामस्थांना अेकदां विचारलें, "सांगा मी कोणतें रूप घेअूं? मी रूपांतराची विद्या शिकून आलों आहे. वाघ, हत्ती, मगर, माशी, तुम्ही सांगाल ते रूप घेअीन!" असें तो म्हणाला. तेव्हा सर्वांनी 'सुसरीचे रूप घे' म्हणून सांगितले

'अच्छा'! असे अुत्तर देअून त्याने सिद्धता केली सिद्ध केलेले दोन पाण्याचे लोटे पुढे करून म्हणाला, "या पहिल्या लोटयांतील पाणी माझेवर ओता. ते पाणी पडल्याबरोबर माझे रूप पालटेल. मी सुसर होअीन. नंतर दुसऱ्या लोटयांतील पाणी माझेवर टाका म्हणजे पूर्ववत् माझें रूप मला प्राप्त होअील." त्याप्रमाणें पहिल्या लोटयातील पाणी त्यावर टाकतांच तो हिरालाल सुसर झाला. सुसरीचें रूप पाहून लोक घाबरले आणि दुसऱ्या भांडयांतील पाणी घालावयाचें विसरून भयानें पळाले. अत्रेयी नदी जवळच होती. त्यांत हिरालालच्या सुसररूपानें प्रवेश केला आणि तो नदींतूनच यालुरघाटला पोहोंचला.

तेथें त्या सुसरीला पाहण्यास शेकडो लोक जमतात. 'हिरालाल' हाक मारताच ती सुसर अुसळून वर येते. आणि ३-४ फुट पाण्याच्या पृष्ट-भागावर अुसळी घेते. हिरालालचे नातलग पुन्हां पूर्वरूप प्राप्त करून देण्यासाठीं कामाक्षाला पोहोंचले नि त्याचे मांत्रिक गुरूची नि भैरवीची फार काकुळतीनें विनंति केली. हिरालाल ज्या नदींत होता त्या नदीजवळ हिरालालचें पूर्वरूप झालेलें बघावयास मिळावें म्हणून लोक रात्रंदिवस तेथें

बसलेले असत. सर्व लोक हिरालालचे पूर्वरूप देण्यास येणारे त्या मांत्रिक भैरवोची नि त्याचे गुरूची मोठ्या अुत्सुकतेने वाट पाहत होते. पुढें मगर झालेल्या हिरालालचें मगरमास्याच्या रूपांत रूपांतर झालें. नातेवाअिकांनीं अती आग्रह केल्यावर गुरूनीं समाधि लावून बघितले नि सांगितलें "हिरा-लालनें मगररूप धारण केल्यावर अभक्ष्य भक्षण केले आहे. आतां त्याला पुन्हा पूर्वरूपात आणणे माझ्या शक्तीच्या बाहेर आहे." तेव्हा हिरालालचे नातेवाअिकांनी रडून रडून आकात केला नि त्याला पुन्हां पूर्वरूपांत आणल्यावाचून आम्ही आपले पाय सोडणार नाही म्हणून म्हणाले. तेव्हां गुरूना दया येअून म्हणाले, "हिरालाल त्या नदीतून गगानदीत प्रवेश करील तेव्हा तो पावन होअून आपल्या पूर्वरूपात येअील." या नगरातील बरेच वजनदार लोक नि विशेषतः डॉ. अेस्. अेन्. सिंह हे या माशाचा अभ्यास करीत राहून त्याच्या प्रत्येक हालचालीवर त्याचें लक्ष्य होतें. त्याचा आकार गगेच्या वाहनाप्रमाणे अर्थात् मगरमाशाप्रमाणे होता. या माशाचीं तेथें अनेक छायाचित्रें घेण्याचा प्रयत्न केला गेला पण तीं कोणालाहि घेतां आलीं नाहीत. पुढे कांही दिवसांनी तो मासा पटनीताला नांवाच्या नगराजवळ नदीत दिसला; पण त्यानतर जितेनराम नांवाच्या अफू विकणाऱ्याने दुष्टपणा करून त्या माशाला गोळी घालून ठार केले. त्याचा मृतदेह अुचलण्यास ६० लोक लागले. त्याची लांबी २० फूट होती नि वजन ३० मण होते. शरी-रावर लोकानी मारलेल्या पुष्कळ गोळ्याच्या खुणा होत्या. त्याचा देह मगर नव्हता हे निश्चित. ही गोष्ट १९३६ या वर्षात घडली.

अं—(११) हगेरीमधील ल्याजरा पॉप नांवाचा मनुष्य अेक अद्वितीय असा आश्चर्यकारी माध्यम आहे. माध्यम म्हणजे ज्याचे द्वारा सूक्ष्म देहधारी वा अशरीरी जीवात्मे या भौतिक जगांत अनेक कृत्यें वा चमत्कार करून दाखवितात असा जो तो माध्यम. अगदी कुलपें लावून नि चारी बाजूला पहारे बसविलेल्या खोलीत तो पशू, किडे, अन्न, ( शिजविलेले नाना खाद्य-पेय पदार्थ ) छायाचित्रें वा अितर अनेक वस्तू आणून दाखवितो आणि सध्यां या सर्व वस्तु आध्यात्मिक परिशोधन मंडळाच्या संग्रहालयांत (museum of metaphysical research) बुडापेस्टमध्यें—हंगेरीच्या राजधानींत—राखन ठेवलेल्या आहेत.

त्याजरा पॉप हा तेथें जिवंत प्राणी अज्ञात प्रकारानें आणूं शकतो. जीवात्मविद्याशास्त्रांत (स्पिरिच्युआलिझम) ही शक्ति फार दुर्मिळपणें प्रकट झालेली दिसते. अेकदा अशाच परीक्षकांच्या बैठकीत तो तंद्रीत गेला आणि त्या अर्धनिद्रित स्थितीत असता पूर्वी सर्वांनी तपासलेल्या, रिकाम्या, त्या सर्वांनी पुढें केलेल्या अेका पाढऱ्या पेटीत तीन सरडे त्याचे द्वारा आणले गेले. पुढें अेका प्रसंगी त्याला आणावयाला सांगितलेले प्राणी दुर्मिळ असावे अशासाठीं जपानी पांढरे अुंदीर आणावयास सांगितले. त्या माध्यमाचें तोंड, हात, पाय सर्वांनी दाबून घट्ट धरले. आश्चर्य की अंगांत आलेल्या 'रबी आयझ्याकनें' दोन पांढरे अुंदीर चटदिशी तेथें अुपस्थित केले. ते अुंदीर बुडापेस्टच्या प्राणीसंग्रहालयात ठेवलेले आहेत. धान्याचा वर्षाव छतातून करणे, लसूण आणून त्याचा पसरलेला दुर्गंध बदलीत अज्ञात अशा सुगधाने तेथील वातावरण भरून काढणें अित्यादि अनेक चमत्कार केले जातात. त्या बैठकींत रसायनशाळेंत भौतिक विज्ञानशास्त्र्यांच्या तीव्र नि तीक्ष्ण अशा भेदक दृष्टीपुढें आणि सर्व बाजूनें कांहीहि हस्तचापल्य करता येअू नये अशी सावधानता घेअूनहि त्याच्या शक्तिप्रकटनाचें कार्य घडत असतें.

अः—(१२) जोन्स राड्रीग्ज नांवाचा पोर्तुगीज नि परिशोधक आपले अनुभवांत लिहितो, "युरोपमधून हिंदुस्थानांत जादुगिरी नि यौगिकशक्ति अनुभवासाठी गेलेल्या पुष्कळ चतुर युरोपियनांना बहुधा ढोंगी लोक भेटतात नि फसवतात. हजारात अेखादाच खरा मनुष्य असतो; पण जे आहेत ते खरोखरच विलक्षण शक्तीचे अद्वितीय लोक आहेत हे मान्य करणें भाग आहे. मी तसल्या खऱ्या योग्यांना हिमालयांत अगदी पूर्ण नग्न स्थितीतहि हिमवर्षाव चालू असतां नि भोंवतालीं दाट हिमाचे (बर्फाचे) थर जमले असतां तशा स्थितीत कांहीहि बाधा होत नसलेल्या अवस्थेंत पाहिलेले आहे; कारण त्यांचीं मनें अतींद्रिय अनुभवांत ह्मणजे दैवी गीतश्रवणांत व अनंताच्या ध्यानांत मग्न झालेलीं असतात. ते प्राणायामाच्या योगानें शरीरें अुष्ण, तेजस्वी, तरुण आणि बलवान् अशीं राखूं शकतात. अर्थात् यासाठीं त्यांना वर्षानुवर्षें खटपटावें लागते. योग ह्मणजे शारीरिक लाघव वा युक्ति नव्हे. तें अेक मानसिक तत्वज्ञान नि विशेष जीवनदशा आहे. मी अेक योगी

हिमालयांत पाहिला. त्याचे जवळून खेटून मांठाले वाघ जातात, पायानळीं प्रचंड सर्प अिकडे तिकडे फिरत असतात, पण त्याला त्याचेपासून कांहीहि अपाय होअू शकत नाही. त्याला भीति स्पर्श करू शकत नाही. तो अगदीं तरुण आहे. कारण तो ह्मणतो समाधीतच खरी विश्रांति नि पुनर्जीवनीकरण साध्य आहे. स्वप्नात वा झोपेत पुष्कळ वेळा नि प्रकारे मनुष्य हालचाल करतो. खरी विश्राति मिळत नाही. मृतवत् निश्चल देहस्थिति ठेवून मन समाधिस्थ झाले ह्मणजे खरे तेज, ओज नि विश्राति मिळते. त्याचे वय १५० वर्षांचें आहे. काहीची वये तर विश्वास ठेवण्यास कठिण अितकी अधिक असल्याचे सागतात आणि सरते पदी मी तरी त्यांवर अविश्वास करूं शकत नाही. या गृहस्थानी योग्याचे पुष्कळ चमत्कार वर्णन केले आहेत; पण स्थलाभावामुळे येथे दिले नाहीत.

क—(१३) डॉ. मॅक आयव्हर टिडाल हा नअू वेळां मेलेला ठरूनहि जिवंत असलेला ९२ वर्षांचा तरुण आहे. त्याचे डोक्याचे सर्व केस पाढरे झाले आहेत. अमेरिकेतील अेक महान् अध्यात्मशास्त्री ह्मणून लोक त्याला ओळखतात. त्याने स्थायीरूपानें तरुण राहण्याची सिद्धि प्राप्त करून घेतली आहे त्याच्या नसांनसांतून तारुण्याचें रक्त रसरसत आहे. तो मनुष्याचे मनातील विचार काय चालू आहेत हें ओळखू शकतो. चोर, खुनी, लुटारू, याचेकडून सत्य काय आहे हें त्याला काढून घेता येते. फांसावर लटकलेल्या लोकाना त्याने फांसावरून सोडविलें आहे. तो अनेक दिवस समाधि लावून बसतो आणि समाधीच्या स्थितीत असताना अनेक वेळां त्याचे हृदय बद पडते. नअू वेळां तो मेल्याचे ठरूनहि पुन्हां जिवत नो जिवंतच राहिला !

त्याचे शरीराचे तेज अपूर्व आहे. त्याच्याकडे पाहून कोणीहि मनुष्य आकर्षित झाल्याविना राहत नाही. त्याची सभाषण पद्धति मोहक आहे. सुंदर स्त्रिया त्याच्या रूपाला भाळून त्याचेशी लगट करूं धावतात. पण तो शुकाचार्यासारखा अढळ राहिला आहे. तो बालब्रह्मचारी आहे. त्यानें आत्म्याची अनंत शक्ति प्राप्त करून घेण्यासाठी आजन्म ब्रह्मचर्यपालनाची प्रतिज्ञा केली आहे नि त्याला मोहाचे अनेक प्रसंग आले तरी ती त्यानें टिकवून धरली आहे.

जडवादी अमेरिकन लोकांना त्याचा अेक संदेश आहे आणि तो म्हणजे 'कायेन मनसा वाचा' ब्रम्हचर्य पाळा म्हणजे अिच्छित वस्तूची प्राप्ति तुम्हाला सहज होअील. विलासप्रिय अमेरिकन लोकांना हा अुपदेश नवीन आहे. ब्रम्हचर्याचा नि आत्मशक्तीचा काय संबंध आहे हेंच त्यांचे ध्यानी येत नाही. डॉ. टिडाल हा कित्येक दिवस समाधि लावून बसतो. कांही दिवसांनी त्याची नाडीहि बंद होते. निष्णात डॉक्टर तो मेला असें मत देतात. त्याचे शरीर प्रेतवत् भासते. त्याच्या मृत्यूविषयी कोणालाच शंका राहत नाही. त्याला मृत पेटिकेत (coffin) घालण्यांत येते. अितक्यात त्या पेटींतून आवाज येतो नि सर्व जण आश्चर्याने पाहतात तो डॉ. टिडाल आळस देत अुठून बसतो आणि जमलेल्यांना आशीर्वाद देत निघून जातो. या गृहस्थाची ही अद्भूत शक्ति पाहून अध्यात्मविद्या झूट मानणारेहि श्रद्धावान् बनले आहेत. फिलाडेल्फिया नगराध्यक्ष (Mayer) नास्तिक होता. तो अीश्वराचें अस्तित्व मानीत नव्हता. डॉ. टिंडालला हें समजले. तो त्याचेकडे गेला आणि आत्मविद्येचा परिचय देण्याचे अुद्देशानें त्याला म्हणाला, "आपण वाटेल ती वस्तु मनांत धरा". आणि डॉ. टिडालचे शरीर हालू लागले. त्याचे मुद्रेवर अपूर्व तेज चमकू लागले. तो त्या खोलीत पुढें पुढें जाअू लागला नि तेथें पडलेल्या तक्यातूनच अेक पिवळ्या रगाचा तक्या अुचलून त्यानें त्या नगराध्यक्षाचे हाती दिला. तो पाहताच त्याला आश्चर्य वाटले. कारण तोच त्यानें मनांत धरला होता. तरी आणखी अेकदा प्रतीति पहावी म्हणून नगराध्यक्ष म्हणाला, 'डॉक्टर' सांगा पाहूं माझ्या खिशांत वस्तु काय आहे ती? पुन्हां त्याचें सर्व शरीर हालू लागले आणि म्हणाला, 'वाजवायची शिटी'. नगराध्यक्ष श्रद्धाळु बनला हे सांगणें नकोच.

गोथनबर्ग येथें त्यानें अेक अद्भूत नि अशक्य कार्य करून दाखविलें. त्याचे डोळे बांधण्यात आले आणि अेक मस्त घोडा त्याला देण्यांत आला. त्या घोड्यावर बसून नगरभर जोरानें पळवून अेका खाणावळीचे नोंदवही- मधून नगरांतल्या पोलीस कमिश्नरनें मनांत धरलेल्या माणसाचें नांव काढून देण्याचें काम त्याला सांगण्यांत आलें.

डोळ्यांना फडकें बांधून तो निघाला. नगरांतील दाट वस्तींतून त्यानें घोडा भरधाव सोडला. अेखाद्या निष्णात घोडेस्वाराने घोड्यावर रपेट करावी त्याप्रमाणें त्यानें मोठ्या कुशलतेनें घोडा फिरविला आणि कुणालाहि दुखापत न करता वा अेखादाहि अपघात न होअू देतां त्याने त्या भोजनालयासमोर घोडा अुभा केला. तो आत गेला आणि टेबलाच्या खणांतून नोंदवही काढून पो. कमिश्नरनें मनांत धरलेलें नांव काढून दाखविलें. अितकें झाल्यावर तो लागलाच बेशुद्ध झाला आणि नअू दिवसपर्यंत समाधिस्थ राहिला.

**चोर पकडला:**—अेकदां अेक मनुष्यानें आपल्या सोबत्याच्या साह्यानें हजारो डॉलर चोरले आणि ते अेका सुरक्षित स्थली पुरून ठेवले. या दोघां चोराना पोलिसानी पकडले; पण अेकहि स्वीकृति देअीना नि पैसे कोठें ठेवले हे सागेना. तेव्हा टिंडालसमोर त्यापैकी अेकाला आणण्यांत आलें. डॉ. टिंडालने त्याला अर्धवट बेशुद्ध स्थितीत आणले आणि अेका डिटेक्टिव्हला त्याचेजवळ अुभे करण्यात आले. या अर्धवट शुद्धीत त्या चोराला तो गुप्त हेर ( डिटेक्टिव्ह ) हाच आपला मित्र आहे असे वाटू लागलें. त्या हेरानें विचारले, ‘ काय गड्या ! आपण ते चोरलेले पैसे कोठें ठेवले आहेत बरें ! ’ यावर त्या चोरानें अुत्तर दिलें, ‘ अरे गड्या ! येवढेहि विसरलास ! तूं चोरीच्या व्यवसायाला अगदीच अयोग्य दिसतोस. अरे ! लासअंजेलिसमधील ‘ गोल्ड गेट हेअर कटिंग सलून ’च्या मागच्या बाजूला आपण ते पुरले नाहींत काय, यावर पोलीसानें शोध केल्यावर त्या स्थलीं ते पैसे ठेवल्याचें त्यांना आढळून आलें.

रिओव्हिस्टामध्यें अेका चौकीदाराची हत्त्या केल्याबद्दल अेका मनुष्याला फांशीची शिक्षा झाली होती. हा माणूस आपण निर्दोषी आहे असे म्हणे पण त्याला पुरावा मात्र देता येत नव्हता. त्याला डॉ. टिंडालसमोर आणण्यांत आलें. नित्याप्रमाणें त्यानें त्याला अर्धसंज्ञ (बेशुद्ध) स्थितीत आणलें. नंतर विचारलें असतां तो बोलला, “चौकीदाराची हत्त्या झाली त्या दिवशीं मी सॅन्फ्रॅन्सिस्कोच्या भोजनालयांत होतों. अर्थात् भोजनालयाचे धन्याकडून नोंद-

वही मागविण्यांत आली. त्याचें वक्तव्य नि नोंदवहीमधील नोंद यामुळें तो आरोपी निर्दोषी ठरला.

डॉ. टिंडाल ह्मणतो, 'अनेक वेळां मी माझें शरीर पृथ्वीवर सोडून सूक्ष्म रूपानें आकाशाच्या अनंततेतून फिरून येतों. त्या वेळी जें सुख मी अनुभवतो तें अवर्णनीय आहे.

**ख—(१४)** योगिराज आचार्यसम्राट जगद्‌गुरु योगीद्रचूडामणि नामक अेक साधुमहाराज अेका मोठ्या समारंभाचे वेळी मारवाडमधील विशालपूर नामक खेड्यांत अुपस्थित होते. तो समारंभ अुन्हाळ्यात होता. तेथें पाण्याचें दुर्भिक्ष्य होते. महाराज आल्यावर त्याना ही चिंता निवेदन केली. महाराजानी निश्चित व्हावयाला सांगितले. त्या समारंभाला अनपेक्षितपणें अतोनात गर्दी लोटली. समारंभाचे दिवशी शिजवलेले अन्न त्या समारंभार्थ अनपेक्षितपणें लोटलेल्या जनसमर्दाला पुरें पडणें शक्य दिसेना; पण महाराज समारंभस्थली बसल्यावर पाण्याचें दुर्भिक्ष्य जाणवले नाहीच—अुलट विपुल पाणी सर्वांना मिळाले—पण अपुरे अन्नहि कितीतरी पटीने वाढलेल्या जनसंमर्दाला पुरूनहि खूप अुरले. तेव्हा हा अन्नपाण्याचा अपुरा पुरवठा अतुट ठरला. हे महाराजांच्या प्रभावाने घडून आलें आहे याविषयी कोणालाहि शंका अुरली नाही. अेरव्ही कोणत्याहि अुपायांनी अन्नपाणी पुरवणे अशक्य होतें हें सर्वांना ठाअुक होते.

**ग—(१५)** 'दी ट्वेंटियेथ सेंचरी' मासिकाच्या सेप्टेंबरच्या अंकांत निकोल्स रोरिच यांनी गार्कीविषयी (मॅक्झिम गार्की, अेक विख्यात रशियन नास्तिक) कांही आठवणी लिहिल्या. पुढील अुतारा त्यात आहे. "अेकदा आम्ही कांही मित्रमंडळी जमून गप्पा चालू झाल्या. विषय 'आध्यात्मिक शक्ति नि हिंदुस्थानांतील योगी' असा निघाला होता. त्या विवादात गार्कीने बराच वेळ मुग्धता स्वीकारली होती. ह्मणून आह्माला वाटले की, सर्व शांतपणे अैकल्यावर गार्की बहुधा योगशास्त्राची टर अुडवणार. पण आम्ही सर्वस्वी फसलों—नव्हे तर चकितच झालों. कारण गार्कीने स्वत:ला आलेला अेका हिंदु योग्याचा अनुभव मोठ्या आदरानें नि आस्थेनें सांगितला. तो

असा'—हिंदु लोक फार विलक्षण आहेत. प्रत्यक्ष मला तसा अनुभव आला आहे. मी कॉकेशसमध्यें होतों. त्या वेळीं मला अेक हिंदु योगी भेटला. तो अनेक यौगिक चमत्कार करून दाखवितो अशी त्याची ख्याति पसरली होती. प्रथम मी त्याची टवाळी करावी असा हेतु धरला होता; पण त्यानें माझे डोळे अुघडले. त्यानें अेक दोऱ्याची गुंडाळी घेअून वर आकाशांत जोरानें भिरकावून दिली. आश्चर्याची गोष्ट ही की दोरा खालीं न येतां तारेसारखा ताठ अधात्री अुभा राहिला. खाली आला नाही. मग तो योगी मला म्हणाला, तुला मी वाटेल ते देखावे दाखवितो. कुठला पहायचा आहे, बोल' मी म्हटलें, 'मला हिंदुस्थानातील नगरें बघावयाची आहेत.' 'अच्छा! अुघड ही पोथी आणि पहा.' हें म्हणून त्यानें आपली पोथी माझ्यापुढे टाकली. पोथीचीं पाने पितळी पत्र्याची होती नि त्यावर हिंदुस्थानांतील शेकडो देखावे रंगांत चितारलेले होते. ते पाहून झाल्यावर मी पोथी मिटून त्याचेकडे सारूं लागलो. त्या बरोबर तो म्हणाला, 'झाले पाहून!' पुन्हा अेकदा पहा! म्हणून त्याने त्यावर अेक फुंक मारली नि ती पोथी माझ्याकडे सारली. मी पोथी अुलटू लागलो. तों काय! त्यातील सर्व चित्रें नाहींशी झालेली होती मी हा चमत्कार पाहून हतबुद्धच झालों. या प्रसंगापासून हिंदु लोक कांहीं असामान्य लोक आहेत अशी माझी आदराची भावना बनली आहे."

घ—(१६) अमेरिकेतील 'सेंचरी प्रोग्रेस'चे प्रदर्शनांत श्रीकृष्ण भगवान् यानी गीतेत सांगितलेलें योगशास्त्र काल्पनिक थोतांड नसून खरेंखुरें शास्त्र आहे हे सप्रयोग दाखविण्यांत येअी. योगसामर्थ्यानें २ हजार अश्व-शक्तीची विजेची शक्ति हातांत धरणें, निरनिराळे रोग बरें करणें, परस्परांचे विचार परस्परास कळविणें याची प्रत्यक्ष माहिती दिली आहे.

ङ—(१७) 'संडे अेक्सप्रेस' मध्यें श्री. विल्यम गेरहार्डो नामक सुप्रसिद्ध कादबरीलेखक आपला अनुभव देअून सूक्ष्म शरीराविषयीच्या अखंडनीय अशा प्रत्यक्षानुभवाच्या पुराव्यावर त्याचें अस्तित्व सत्य असल्याचें निश्चितीपूर्वक सांगतो. ते येणेप्रमाणें:—"बहुतेक विज्ञानशास्त्री सूक्ष्म शरीराच्या अस्तित्वावर विश्वास ठेवित नाहींत; कारण विज्ञानशास्त्री केवळ

प्रत्यक्षानुभवाच्याच गोष्टी खऱ्या मानतात. मग तसलाच प्रत्यक्ष अनुभव संशयातीतपणें जर अेखाद्याला आला तर त्या गोष्टीला खोटी ह्मणण्याचा त्यांना काय अधिकार आहे? मला माझा अनुभव नाकारता येणार नाही. माझ्या स्वतःच्या निःशंक नि स्पष्ट अशा अनुभूत सत्यावर मी अविश्वास करूंच शकत नाही. अितकेंच नव्हे तर सर्व जग माझ्यापुढे अुभे राहून माझा अनुभव नि त्या अनुभवाचें सत्यत्व खोटे ह्मणू लागले तरी मला पटलेलें सत्य खोटें वाटणें, त्याचे सत्यत्वावरील श्रद्धा अुडणें शक्य नाही. मला आलेले अनुभव येणेंप्रमाणें:--

मला आतांपर्यंत सूक्ष्म देहाचें अस्तित्व असल्याचें पांच अनुभव आलेले आहेत. पहिले अनुभवांत मी जणू काही विलक्षण स्वप्न पाहतो आहे असें वाटून जागें होण्याचा प्रयत्न केला आणि मी झोपलेला नसून जागाच आहे असें ठरलें. कारण मी खरोखरीच जागा होतों; पण मी जागाच आहें-झोपेंत नाही-ही निश्चिति पटते वेळी मला झटका बसल्यासारखे झाले. कारण मी जागा आहे तेव्हां दिवा लावायला ह्मणून जो हात पुढें पसरला तो हात विद्युद्दीपाच्या किल्लीला (स्विचला) न जातां मी निजलों होतों, त्या स्थानावरील पुस्तकांच्या खणावर पोहोंचलेला नि अधांतरी असा राहिला आणि अधांतरी अुच असलेल्या पुस्तकांच्या खणासमोर मीहि अधानरीच अुभा आहे असें अनुभवाला आलें.

त्या खोलीत विजेच्या शेगडीच्या किंचित्शा तेवढ्या स्थलीच्या मिणमिणत्या प्रकाशाव्यतिरिक्त खोलीभर अधार होता. परंतु माझ्या शरीराभोंवतीं दुधासारख्या पांढऱ्या निर्मल प्रकाशाचे वाफेसारखें तेजोवलय मला दिसलें. त्या वेळी मी पूर्ण जागृत होतों. मला होणाऱ्या सानुभव ज्ञानाविषयी शंका येण्याला कांहींच कारण दिसेना. पूर्वी कधींहि न अनुभवलेली माझी ती अवस्था अनुभवून मला आश्चर्य वाटूं लागलें. अितकेंच नव्हे तर अेकप्रकारें साभिमान आनंदहि वाटला.

मी माझे मनांत म्हणालों, 'हा भ्रम आहे काय? मी कधींतरी अशा स्थितीवर भरंवसा ठेवला असता काय? आणि हें कांहीं स्वप्न नव्हे.

हा आपला प्रत्यक्ष अनुभव आहे. मी माझा मला अगदी हलका–जणूं पक्षाच्या पिसासारखा हलका-वाटत होतों; पण मला कोणीतरी पोलादी हातांनी पकडून धरल्यासारखा धरला गेलों असल्याचा अनुभव आला. या माझ्या बंधनामध्यें जण कांही विद्युद्वेग अुत्पन्न झाला आणि माझ्या पूर्वीच्या साश्चर्य आनंदभासानंतर लागलीच अेक धक्का मला बसला. जणू काही 'पुन्हा आपल्या स्थली जा' अशी आज्ञा झाल्यासारखा मला माझ्या देहाकडे–झोपेसाठी अथरुणावर पडलेल्या देहाकडे–वळावें लागले. माझी बाहेर जाण्याची गति थांबली आणि या जड देहाकडे लक्ष जाअून तो माझ्या देहाच्या अितर साधनांप्रमाणे आपला हा देहहि आपली अेक साधन-वस्तु आहे असें वाटू लागले. या वेळी माझ्या पाठीशीं प्रकाश किरणांची अेक गुडाळी असून त्या प्रकाशाचा झोत त्या देहावर पडला होता. त्या प्रकाशांत माझें मुखमंडल शांतपणें श्वासोच्छ्वास करीत तोंड अुघडें असलेलें पाहिलें आणि या प्रकाशाचा धागा भ्रूमध्याशी जोडलेला दिसला. माझ्या देहाचे गाल अंगावरील जाड ब्लँकेटचे योगानें वाटणाऱ्या अुष्णतेनें हुंबरून आल्यासारखे वाटले. डोक्याखालच्या अुशीमुळें माझे केस अुलटून माझ्या तोंडाभोवती पसरलेले दिसून पूर्वी माझ्या मुद्रेचे कधीहि न पाहिलेलें नि झोपेंत होणारें माझ्या देहाचें विचित्र दृश्य मी पाहिले. माझा देह कुशीवर होता आणि मअु अुशींत माझें डोके खोल घुसलेलें दिसून झोपेमधील त्या देहाचें तें दीन-वाणें स्वरूपांत तो खाली पडलेला नि मी त्याचे बाहेर त्या देहापासून दूर असलेला दिसून मला कांही आनंद नि कांहींशी भीति वाटूं लागली. माझ्या मनावर दारुण गंभीरता पसरली आणि बायबलांत सांगितलेल्या न्याय-दिनाच्या पुनरुत्थानी देहांत तर मी नाही असें वाटून मला भय वाटूं लागलें. किती अभूतपूर्व दृश्य हे !"

पण आपण मेलेलो नाही असें मी आपलें समाधान केलें. माझा भौतिक देह मुखानें श्वासोच्छ्वास करीत झोपला आहे नि मी पूर्वींप्रमाणेंच माझ्या पायावर अुभा आहे. तरीपण पूर्वीचा अनुभूत 'मी' या वेळचा 'मी' नव्हे. जणूं कांहीं नव्या सांच्यांतला मी या जडशा नि अंधेऱ्या प्रकाशांत फिरत आहे. अेक देह टाकून त्याच्या अस्तरणामधील निराळ्या देहाचा मी बाहेर पडलों आहे–

मी जर लवकर परत न आलों तर त्या त्यक्त देहाचा आकार नष्ट होईल–
अित्यादि विचार मनांत आले. परंतु त्या भौतिक देहांत नि या नव्या देहांत
निश्चित सबंधरक्षक प्रकाशमय दोरीचा बंध गर्भाच्या नालाप्रमाणें बांधलेला
आहे आणि त्याचेच योगे अंथरुणावरचा देह जिवत ठेवला गेलेला आहे.
आणि हा सूक्ष्मदेह या जड आकाशांतून फिरत आहे असे लक्षांत आलें;
आपण पाण्यांत गेल्यावर जसा पाण्यांतील हालचालीला पाण्याचा अड-
थळा होतो त्याचप्रमाणें माझ्या त्या सूक्ष्म देहाला आपणाला नित्य प्रतिसुसूक्ष्म
वाटणाऱ्या आकाशामध्ये फिरताना वाटू लागला. खरोखरी माझ्या असा-
मान्य हलक्या असलेल्या देहाने मी अस्थिर समुद्रात फिरत आहे असे वाटले.

मी नित्याच्या सवयीप्रमाणें दार पाहतांच अडखळलो. दाराची मूठ
धरून अुघडण्याचा प्रयत्न केला. मूठ धरली पण जणू कांही हातांतली शक्ति
नष्ट झाल्यासारखी वाटून हात दार अुघडावयाला सर्वस्वी असमर्थ भासला.
आतां मी बाहेर कसा पडणार? हा प्रश्न माझ्यापुढें अुभा राहिला मला
भयापेक्षां दुःख अधिक वाटलें; कारण जणू कांही माझ्या मनगटातून शक्ति
कोणीशी सर्वस्वी काढून घेतली असें भासले.

अितक्यांत बाहेर जाण्याचे अिच्छेने जणू कांही मलाच पुढें ढकललें.
मी दरवाज्यांतून अथवा दरवाजाच माझ्यांतून निघून गेला. बद दरवाजा
असूनहि माझ्या जाण्याच्या क्रियेला दरवाज्याच्या भौतिक स्वरूपाचा काहीच
प्रतिबंध झाला नाही. त्या वेळी मला काय वाटले हे जगांतल्या
कोणत्याच अनुभवाशी साम्य नसल्यामुळें मला वर्णिता येत नाही; मी स्नान-
घरांत गेलों तेव्हा आरशांत मी माझें प्रतिबिब पाहिलें. मी ज्या वेषात झोपी
गेलों होतों तशाच वेषांत मी आतांहि या सूक्ष्म देहात आहे असें मला दिसले.

असेच अेक अंतर स्पष्टपणे दिसून आले नि तें म्हणजे भौतिक देहां-
तील जो भार तो या नव्या देहांत नाहीसा होअून ते शरीर जणू काही
अगदी जडद्रव्यहीन आहे असें अनुभवास आले. नतर मी निरनिराळ्या
खोल्यांत जाअून या नव्या अनुभवाची सत्यता पटविण्यासाठी निरनिराळे
पुरावे जमवूं लागलों. त्या तलावर (मजल्यावर) मी अेकटा होतों आणि

सर्वत्र अंधार होता. केवळ माझ्या या नव्या देहांतून जो अेक अुजेड येत होता तेवढाच काय तो प्रकाश. माझी त्या देहांतील जाणीव वाऱ्यामध्यें जसा दिवा लहान मोठा होतो त्याप्रमाणें कमी अधिक होअू लागली; आणि त्यामुळें हे स्वप्न नव्हे—प्रत्यक्ष अनुभव आहे हें सिद्ध करण्याला फारच थोडा वेळ अुरला आहे असे लक्ष्यात आले.

मी माझ्या हातानें कांही पदार्थ हालवू वा अुचलून घेअू शकलों नाही. केवळ तेथील वस्तूच्या प्रत्यक्ष स्थानाविषयी नि स्थितिसबधी पुरावे लक्ष्यांत ठअू लागलो. काणते पडदे अुघडे—कोणते लावलेले आहेत, घड्याळांत किती वाजले आहेत आणि अशाच अितर गोष्टी मी जेव्हा सकाळी माझ्या नित्याचे देहात जागा झालो त्या वेळी रात्री स्मरणांत ठेवलेल्या पुराव्याच्या गोष्टी सर्व खऱ्या ठरल्या.

माझे पुरावे गोळा झाल्यावर या प्रकट झालेल्या शक्तीने माझ्याशी खेळ आरभिले. मी वातावरणात निर्वात केलेला फुगा अुडतो तसा मी वातावरणांत वर जाअू लागलो. ' स्थिर रहा, स्थिर रहा. ' असें जणू मी अथवा माझेमध्ये असलेली अज्ञात अिच्छाशक्ति आपल्याशीच अुद्गारल्यासारखे झाले आणि मी माझ्या घराच्या त्या तलावरून अधर वातावरणात बाहेर निघालों. घराच्या पुढच्या भागातून मी घराबाहेर अुंच वातावरणात अुडालो आणि अवर्णनीय सूक्ष्म नि हलक्या देहाचे जाणीवेने माझे अंतःकरणहि फार अुल्हासले. आतां अिच्छिल्यास आपण अिच्छावेगानें न्यूयॉर्कमध्ये सुद्धा चटकन् जाअू शकू याची स्पष्ट जाणीव झाली.

पण कदाचित् फार दूर जाण्याने माझ्या जड देहाशी संबद्ध असलेला तो रुपेरी बध तुटून मला पुन्हा आपल्या झोपल्या देहात जातां येणार नाही आणि हा विलक्षण अनुभव माझ्या अिष्टमित्राना सांगता येणार नाही अशी सभय शका आली. "नाही, आज नको, पहिल्याच वेळेला अितके पुरे ! चला परत जाअू" असा माझ्या मनाशी युक्तिवाद केला. याप्रमाणें मनांत आल्यावर थोडा वेळ तें सूक्ष्म शरीर तेथेच थांबून लागलेंच झटकन् परतले आणि माझ्या झोपल्या देहाचे अथरुणाभोंवती फिरूं लागलें. माझी जाणीव

## २२ यावरून काय ठरतें ?

या पुस्तकारंभी जीव ह्मणून निराळी शक्ति जर नसेल, जर जड द्रव्याच्या मिश्रणापासूनच अुत्पन्न ह्योणारा रासायनिक परिणामच जीवरूपानें दिसू लागतो नि ते मिश्रण बिघडले की जसा दिवा विझला ह्मणजे मागें काही अुरत नाही, त्याप्रमाणे जीव विझून नि जड द्रव्ये जड रूपांत विरून मागे कांहीं अुरत नाही असें असेल, तर धर्माची आवश्यकताच अुरत नाही. या जगतात जगता येअील त्याप्रमाणें जगावे नि ज्या रीतीने मिळवितां येअील नि भोगणे शक्य असेल तितके सुख मिळवावे नि भोगावे; आणि निसर्ग ह्या जीवदीप विझवील तेव्हा विझून जाअून शून्यरूप व्हावें. धर्मादिक झझाटाची काही आवश्यकता नाही; पण जर जीव ह्मणून स्वतंत्र, स्वयंभु, स्थायी नि ह्मणून कांही सत्य वस्तु असेल तर त्याचा शोध करून पहावा नि तसें आहे असे ठरेल तर धर्माचे अस्तित्व असण्याचें कारण अुत्पन्न झालेलें आहे असे मानून ते कारण शोधण्यास लागावे अशा हेतूने परिशोधनास आपण प्रारंभ केला. त्या परिशोधनात आपणाला काय आढळलें याचा निष्कर्ष आता काढला पाहिजे.

जडवादाला प्रमाणसिद्धता येण्याचा संभव भौतिक शास्त्रांच्या वाढीने अुत्पन्न झाला. भौतिक शास्त्राच्या विविध शास्त्रीय ज्ञानाच्या दृष्टीनें क्षणभर जडवाद खरा हाच दृष्टिकोन यथार्थ आहे असें वाटूं लागलें होतें; पण भौतिक शास्त्रज्ञाच्या कक्षेत परिशोधकाप्रमाणेच गंभीर तत्वविवेचक नि विचारक निर्माण होअून प्रायोगिक शास्त्रप्रतिपादित सत्याचे साह्याने जगद्गूढ अुलगडण्याचा भगीरथ प्रयत्न होअू लागला; आणि जगद्गूढाचा, 'अमुक हें अशाप्रकारें सत्य आहे' अशाप्रकारें निर्णय ते लावूं शकले नाहींत. तरी जगाचे आदि-अंती जडमयताच आहे असें वाटण्याचा मनाचा भ्रम अुडवून देअून जडवादाने जगद्गूढाची समस्या सुटू शकत नाही-जगाच्या मूळाशीं ज्ञानवान् सत्ताच मूळकारण असली पाहिजे असें मानणें भाग पडले. त्यामुळें ज्या भौतिक शास्त्राच्या पायावर-आधारावर-आणि साह्यानें जडवाद सिद्धवत् ठरूं पाहत होता तो आधारच तुटून जडवादाला निराधार नि ह्मणून अस्वीकरणीय ठरावें लागलें.

याप्रमाणें जडवादाचे पुरस्कर्त्यांकडूनच जडवाद अस्वीकृत झाल्यावर त्याचा विचार करावयाचा नाही असें ठरलें. तरी दुसऱ्या पक्षी जगाचें गूढ चैतन्यवादानें सुटतें असे मानण्यास काय पुरावा आहे हें पाहणें ओघप्राप्तच झालें; नि त्याप्रमाणें त्या शोधनास आरंभ करून जड हें परतंत्र असणें नि चेतनालाच स्वातंत्र्य असणे कसे अपरिहार्य आहे–स्वतत्राचेच स्वाधीन परतत्र राहणे हे कसें स्वाभाविक आहे हें थोडक्यांत पाहून पुढे जीवशक्ति वा चिच्छक्ति देहधारण करण्याला कां प्रवृत्त व्हावी याचें कारण शोधलें नि त्यामुळें त्या कारणांची सर्वव्यापिता बघून ते कारण नाहीसे होओीपावेतो देहधारणकार्य अपरिहार्य आहे हें लक्षात आलें.

परंतु तर्कपद्धतीनें निघालेल्या वरील निगमनाला काही पुरावे मिळतात कीं काय हें पाहिल्यायांचून तो तर्क निःशक रीत्या खरा म्हणून स्वीकारतां येणार नाहीं, याला सिद्धाताचें स्वरूप मिळणार नाही, म्हणून तो तर्क सिद्ध करणाऱ्या पुराव्याकडे वळावें लागले. जगात स्थूलाचें चालक सूक्ष्म कसें असतें हें पाहून शारीरिक मानसिक आदिक सर्व क्रियादिकांचे पासून होणारें संस्कारशक्तीचें स्वरूप लक्ष्यांत घेतले; आणि हा सस्कारसमूह त्या मूळ अेका प्रेरक अिच्छेनुसार देहधारणाला कसा कारण होतो याचा अुलगडा केला.

या जन्मांतराविरुद्ध विस्मृतीच्या अेका मोठ्या नि प्रबल वाटणाऱ्या आक्षेपाचें वैय्यर्थ्य दाखवून जन्मतःच प्रचंड सामर्थ्याची जन्माला येणारी माणसें कां जन्माला यावीत याचें मानसशास्त्रदृष्ट्या विवेचन करून पूर्वजन्मींच्या तत्तद्विषयांच्या अभ्यासावांचून अशा शक्ति प्रकट होअू शकणार नाहींत हें ध्यानांत घेतलें. याहि पुढे जाअून मरणानतरच्या अस्तित्वाचे पुरावे मिळतात की नाहींत हें पाहिलें; नि त्यावरोबरच सर्व देशात तत्वज्ञान्यादिक विचारक लोक नि सामान्य जन याचा पुनर्जन्मतत्वावर असलेला विश्वास सर्वत्र कसा आहे याचें निरीक्षण केलें.

यापुढें आणखी प्रबलतर पुरावा म्हणून पूर्वजन्मस्मृतीची परिशोधनानें सत्य ठरलेल्यांपैकीं कांहीं अुपलब्ध असलेली अुदाहरणें देअून पुनर्जन्म

असल्याविषयींचा भरभक्कम पुरावा पुढें मांडला. त्यानंतर विशेष चमत्कारांच्या घटना देऊन पुनर्जन्म नि पूर्वऋणाबंध न मानल्यास त्यांचें स्पष्टीकरण करणें कसें अशक्य आहे हें दाखवून तदनुषंगाने नि येथपर्यंत सिद्ध होत आलेली गोष्ट अधिक सिद्ध होते काय हे पाहण्यासाठी अिच्छाशक्तीच्या प्रभावानें देहातीतपणा कसा प्रकट होतो याची कांही रोमहर्षणकारी अुदाहरणें देऊन 'जडद्रव्याचा रासायनिक परिणाम म्हणजे जीव' हें म्हणणें कसें हास्यास्पद आहे हें दाखविलें.

शेवटी चिच्छक्तीच्या स्वातंत्र्यसामर्थ्याची कांही योगी लोकांचीं लोकविलक्षण अशी प्रत्यक्ष अनुभवाला आलेली नि ह्मणून लोकांना पटणारी अुदाहरणें देऊन चिच्छक्ति पूर्णप्रकटनकाली सत्ता कशी गाजवूं शकते हें सिद्ध केले.

---

## २३ विश्व नि त्याला जाणणारा

हे विश्व, त्यांतील विविध सूर्यमाला, या सूर्यमालेंतील आपल्या सूर्याभोवती फिरणारे ग्रह, त्या ग्रहांमधील आपली पृथ्वी, पृथ्वीमधील दिसणारे पदार्थ, पृथ्वीचा पूर्वेतिहास, मानवी प्राण्यांची अुत्पत्ति–वाढ–प्रगति, मानवी मनबुद्धीचे ज्ञानविस्ताराच्या विविध शाखा, प्रत्येक ज्ञानशाखीय शास्त्राचा प्रचंड विस्तार, आदिक जितकें कांही ज्ञानविश्व ह्मणून आहे तें सर्व जाणणारें मानवी मन हे आहे. हें ज्ञान नि या ज्ञानामुळें नि शास्त्रद्वारा समजलें नि जाणले जाणारें जग ही दोन्हीहि जड आहेत. जाणलें जाणारें सर्व विश्व नि त्या विश्वाचें ज्ञान, ही दोन्हीहि आपली आपणाला जाणू शकत नाहीत. ती 'आहेत' असे वा 'नाहीत' हें ह्मणण्यासाठी ज्ञानवान् शक्तीची आवश्यकता आहे. या ज्ञानशक्तीवांचून हें सारें विश्व नि विश्वज्ञान असूनहि नसल्यासारखीच आहेत. असून नसल्यासारखी म्हणण्यापेक्षां नाहीच म्हणणें अधिक समजण्यासारखें ठरेल. या सर्व अवाढव्य पसाऱ्याला आपल्या अस्तित्वाचे मान्यतेसाठी जीवशक्तीच्या तोंडाकडेच जणूं वाट पाहत बसावें लागत आहे. ती ज्ञानशक्ति नसेल तर हें जगहि नाहींच. अुलट सर्व विश्व नाहीसें

झाल्यावर वा नसल्या स्थितीतहि ज्ञानशक्ति स्वयंस्फुरणेनें आपल्या अस्तित्वाचे आहेपण निश्चित अुपभोगूं शकेल. विश्वाला मात्र ही ज्ञानशक्ति नसली तर स्वतःच्या अस्तित्वाचा अुपयोग वा अुपभोग स्वतःला कांहींहि करून घेता येणे शक्य नाही. जडवत्तेला ज्ञानयुक्ततेचे अभावी कांहीच करता येणे वा केलेलें जाणता येणें अशक्य आहे. हे सर्व जड विश्व ज्ञानशक्तीचे क्रीडास्थल आहे. या विश्वाला जाणणारी, विश्वाचा अुपयोग करून घेणारी, अखिल विश्वाला अुपभोगणारी अशी अेकटी ज्ञानशक्तीच काय ती समर्थ आहे. स्वतःच्या अस्तित्वासाठीं सुद्धां या प्रचंड विश्वपसाऱ्याला या ज्ञानशक्तीवरच अवलंबून राहावे लागणारें आहे; आणि म्हणून ज्ञानशक्ति ही स्वतंत्र तर हे जड सर्वस्वीं–स्वत.च्या अस्तित्वाच्या खरेपणासाठी सुद्धा ज्ञानशक्तीवरच अवलंबून राहावे लागणारे असल्यामुळें सर्वस्वी–परतंत्र आहे. अशा या सर्वस्वी परतंत्र, जड विश्वापासून वा विश्वातील काही पदार्थांच्या संयोगा–वियोगापासून सर्वथैव स्वतंत्र नि चिन्मय अशा ज्ञानशक्तीची अुत्पत्तिच होणे अशक्य, अस्वाभाविक नि निसर्गबाह्य गोष्ट आहे. तत्वज्ञानाचे विश्लेषक विचारपरंपरेच्या तीक्ष्णतम धारेपुढे या जडाचेच अस्तित्व संशयाच्या कोलहलात सापडून विलुप्त होण्याची वेळ येते. हा येवढा अवाढव्य दिसणारा विश्वविस्तार विचारकाच्या सुसूक्ष्म निरीक्षक बुद्धीच्या विश्लेषणापुढें पार वितळून जातो; आणि या दृश्यामागें अवर्णनीय नि वाचा–मन यांना अगोचर असे महान् चैतन्यतत्वच सर्वत्र पसरलेले आहे असे अधुकपणें कां होअीना पण निश्चिततेनें भासूं लागते.

If absolute existance and intelligence is a position which is acceptable to modern philosophy, it must follow that whatever has come into being by its intelligence, must partake of the character of that being. If that absolute being is spirit, the character of the universe must be spiritual; **and** however unwilling we may be, to accept the situation, we are bound to recognise its spiritual

character. If evolution is a scientfic fact, we are bound to acknowledge that there is unity of method running through the entire universe of mind and matter, and that what is called matter manifests marvellous capacities which are inherent in it; the old notion of matter being dead, must now be abandoned as scientifically untenable. (Dr. Sterlıng's Hegel's Philosophy Made Intelligible) अर्वाचीन तत्वज्ञानाला ज्ञानशक्तियुक्त 'केवला'चें अस्तित्व मान्य आहे; त्याअर्थी त्या केवलाच्या ज्ञानवत्तेनें झालेले व्यक्तीकरणांत सुद्धां त्याचेच गुणधर्म अुतरले आहेत असेंच मानलें पाहिजे. तें 'केवल' जर चैतन्यस्वरूप असेल तर या विश्वाचेहि स्वरूपांत चैतन्यमयता असणारच. आपण कितीहि आढेवेढे घेतले तरी शेवटी या विश्वाची चैतन्यमयता मानावीच लागेल. गुणपरिणामवाद वा अुत्क्रांतिवाद हे जर शास्त्रीय सत्य असेल तर चिच्छक्ति आणि जडद्रव्य यानी युक्त असलेल्या या विश्वांतील पद्धतीची अेकमयता वा अेकसूत्रता आपल्याला मान्य करणे प्राप्त नि भाग आहे. त्याचप्रमाणें ज्याला आपण जडद्रव्य म्हणतों तें जडद्रव्य आपणामध्ये सुप्त असलेल्या आश्चर्यकारी गुणाचें ज्याअर्थीं प्रकटन करते त्याअर्थीं जड हें जड नि चैतन्य-शक्तिशून्य आहे ही जुनी कल्पना वैज्ञानिकशास्त्रदृष्टया असमर्थनीय नि म्हणून आपण टाकून दिलीच पाहिजे. (हेगेलच्या तत्वज्ञानाचें स्पष्टीकरण— डॉ. स्टर्लिंग) प्रो. डयूमाड म्हणतात, "The preponderating view of science at the present day is that it (world) is not a physical one". सध्यां वैज्ञानिकांचें प्राधान्ये-करून असें म्हणणें आहे की जगत् हें भौतिक स्वरूपाचें नाही. प्रो. फिटझ् गेबाल्ड म्हणतात, "It is impossible to resist the conclusion that all nature is a living thought".'हा सर्व निसर्गाचा पसारा सजीव विचाररूप आहे' हा विचारनिर्णय अमान्य करण अशक्य आहे. प्रसिद्ध विचारक लिबनिटझ् याचेंहि याचप्रमाणें म्हणणें आहे.

शोपेनहोर सांगतात, 'हें जग आपल्या कल्पनेचें बनलेलें आहे.' अत्यंत प्रख्यात जर्मन तत्वज्ञ कँटचे म्हणण्याप्रमाणें, 'In fact what we call matter we know not. Its nature is unknowable. This can be designated as thing-in-itself". वास्तवतः जडद्रव्य म्हणून ज्याला आपण म्हणतों त्याचें खरें स्वरूप आपणाला समजत नाही. (आपण आपल्या अिंद्रियांकडून मिळणाऱ्या कल्पनाचा आरोप त्याचे-वर करतो.) ती 'थिंग-अिन्-अिटसेल्फ'-सद्वस्तू-आपणाला अज्ञेयच आहे. आपणाला दिसणारें स्वरूप खरे नव्हे "बर्क्ले, टेन, जे. अेम् मिल, बेन यांचेसारखे प्रमुख विचारक म्हणतात, 'That the bodies have no real existance and our own minds under illusion have transformed them into substances." 'पदार्थांना खरें अस्तित्व नाही. आपलीं मने भ्रमणवशतेनें त्यांना द्रव्याच्या सत्यतेचें रूप कल्पितात.' टेनच्या म्हणण्याप्रमाणे 'Exterior perceptions are mere hallucinations'. 'बाह्य दृश्ये हा निव्वळ भ्रम आहे'. "Spiritual essences are only real". चित्सत्तारूप सत्वेंच (त्या त्या पदार्थांतील) काय तीं सत्य आहेत.' असे लॉसिनचें म्हणणे आहे. 'Outside Spirit there is no reality' 'आत्मसत्तेच्या विरहित दुसरें सत्यच अस्तित्वांत नाही' असें बर्क्ले सांगतात; आणि शेवटी अेक विचारक संशयी मनाला अुत्तर देण्याच्या दृष्टीनें म्हणतात, 'The criterion of illusory cannot itself be illusory" 'अमुक अेक भ्रमात्मक आहे हें निर्णित करणारा निर्णायक स्वतः भ्रमरूप होअूं शकत नाहीं.' प्रो. फेरीयर म्हणतात, 'Our intellect is quite engrossed in external objects and that we do not properly investigate into the right sources of knowledge.' 'आपली बुद्धि बाह्य वस्तूंमध्येंच गुंतून पडलेली आहे आणि ज्ञानाच्या खऱ्या अुगमाचा आपण योग्य प्रकारें शोध करीत नाहीं'. आद्य श्रीमत् शंकराचार्य महाराजांनीं कित्येक शतकांमागें वेदान्ताचे विवरणांत त्यांचप्रमाणें सांगून पुढें ते म्हणतात, "आत्मा स्वयंसिद्ध आहे. कोणत्याहि

वेळी नि कोणालाहि तो अज्ञात राहू शकत नाही. ज्ञान होणाऱ्या प्रत्येक वस्तूमधूनहि तो अगदी तसाच प्रकट होतो. त्याचे अस्तित्व प्रकट करण्याला बाह्य पुराव्याची किंचित् सुद्धा आवश्यकता नाही. त्याचे यथार्थ ज्ञान होण्याला केवळ अनात्मबुद्धीचे आवरणच काय ते गेले पाहिजे. बाकी काही करावयाला नको. त्याचे अस्तित्व सिद्ध करावयाला तर्कशास्त्राचे (Logic) सहाय्य घ्यावयाची आवश्यकताच नाही. वेदान्ताचे परिभाषेत हा आत्मा 'प्रतिबोधविदित' म्हणजे सदासर्वदा अनुभवाने अस्तित्व जाणविणारा वा कळणारा असा आहे. ज्ञानक्रियेच्या आरंभाची ही पहिली अपरिहार्य गोष्ट आहे **आपल्या स्वरूपाच्या 'मी' म्हणून होणाऱ्या जाणीवेवांचून ज्ञानक्रियाच शक्य नाहीं**. अनुभवाचा हा आधार हे ज्ञानाचे मुख्य मूळ आहे. त्याच्यावाचून कोणताहि अनुभव येणे अशक्य आहे. अनुभवात्मक सर्व ज्ञानकणाचें अेकत्रीकरणरूपाने ज्ञान धारण करणारी ही अेकमेव ज्ञानशक्ति-संपन्न चित्सत्ता आधारस्थानी वास करीत आहे" हिच्या ज्ञानवत्तेमुळें जगाच्या अस्तित्वाला शक्यता येते. हिच्यावर जगाचें अस्तित्व अवलंबून आहे. अशा या जगातील सर्व अस्तित्वाला अस्तित्व देणाऱ्या–सर्व सत्यतां-मधील मूल सत्यता असणाऱ्या या आत्म्याची–या चिच्छक्तीची सत्यता नि अस्तित्व ही त्रिकालाबाधित, स्वयंस्वतंत्र नि स्वयंपूर्ण अशी आहेत. आत्मा वा चिच्छक्ति भ्रमरूप जडद्रव्याच्या मिश्रणांतून अुत्पन्न होणारा क्षणजीवी पदार्थ नाही. **बर्क्लेच्या** म्हणण्याप्रमाणे हे जगत् 'मनोरूप' आहे. **कँट** या जगाचे दिसणारे बाह्य स्वरूप नाकारून त्याचे मागे आपणाला याथार्थ्यानें न कळणारी 'thing–in–itself' 'सद्वस्तु' आहे असें म्हणतो. **स्पायनोझाला** हें जगत् मूलभूत सत्स्वरूप दिसतें. **ब्रॅडले** याला 'केवल' स्वरूपात पाहतो **हेगेलला** हे जगत् 'स्वयंनिर्मित आत्मानुभवाचे रूपानें भासते. आणि **बर्गसन** "वैश्विक प्रबुद्धता" वा "ज्ञानसत्ता" म्हणून ठरवितो. याप्रमाणें हे नि अितर सर्व गंभीर विचारक जड स्वरूपाचे मागें असणाऱ्या अजड चित्स्वरूपाचेच निरनिराळ्या रूपात त्याच्या विचार–दृष्टीला दर्शन झाल्याचें सांगतात. जडाची जडताच खोटी. चिच्छक्तीच काय ती सत्य आहे असा सर्वांचा निर्णय. मग आमच्या वैज्ञानिक प्रयोग-

शास्त्र्याचें, स्थूल दृष्टीला दिसणाऱ्या जगाच्या जडस्वरूपांतील कांही पदार्थांच्या मिश्रणांतून या चिच्छक्तीचा प्रादुर्भाव झाला, हें मत विचाराच्या नि अनुभवांच्या कसोटीला कसें टिकूं शकणार?

---

## २४ अेक नवीन संभवनीय आक्षेप नि त्याचें निराकरण.

प्रायोगिक विज्ञानशास्त्रांचे परिशोधक जेव्हां भौतिक जगातील अेखाद्या नवीन शक्तीचा शोध लावतात, तेव्हां ती शक्ति आम्ही निर्माण करतों असा त्यांचा दावा केव्हांहि नसतो. ते जे म्हणतात तें अितकेंच की आम्हाला अेका नव्या शक्तीचा शोध लागला आहे. नवी शक्ति निर्माण केली असें ते म्हणत नाहींत. जगांतील बाष्पादिकांतील शक्तीचा अुपयोग यंत्रांत करून घेतेवेळी ती ती शक्ति त्या त्या अुपकरणद्वारा प्रकट झाली वा केली अशीच त्यांच्या म्हणण्याची भूमिका असते. जडवाद्यांच्या शास्त्र-दृष्टीला जड जगताचे स्थूल दृष्टीनें द्रव्य (matter) आणि शक्ति (force) हे दोन ठोकळ भेद दिसतात. ती जगच्छक्ति वाफेद्वारा, वायूद्वारा वा अितर साधनद्वारा नि निरनिराळ्या यंत्ररचनेंत प्रकट झाली तरी ती शक्ति त्या जगच्छक्तीचाच अंश होय; नि ती अुत्पन्न झाली नसून प्रकट झाली असेंच त्याचे म्हणणें असतें. विद्युत्‌चा शोध लागला तेव्हांहि ही भूमिका पालटली नाही. जगांत विद्युच्छक्ति आहे नि ती अप्रकट स्थितींत असते. ती जेथें जेथें प्रकट होण्यास अनुकूल साधनें सुयंत्र स्थितीत नियोजिलेली असतात तेथें तेथें ती प्रकट होते—अुत्पन्न होत नाही असेंच त्यांचें ह्मणणे असते; नि हेंच सत्य—वस्तुस्थितीला धरून आहे हे कोणाला सांगावयाला पाहिजे असें नाही.

सध्यां पाश्चिमात्य देशांत—विज्ञानशास्त्रांत पुढारलेल्या देशात मृत शरीरांत पुन्हा जीव घातल्याचे वा नवीन देहरचना करून त्यांत जीवशक्ति ओतण्याचे भगीरथ प्रयत्न केले जात आहेत. त्याचप्रमाणें वीर्यातील जीव-जंतूंना गर्भावस्थेंत जाण्याची आवश्यकता न ठेवतां गर्भांत मिळणाऱ्या सर्व अनुकूलता कृत्रिमरीत्या निर्माण करून तद्द्वारा जीवनिर्मिति करण्याचेहि प्रयोग चालले आहेत. आणि कदाचित् लवकर वा अुशीरानें ते प्रयोग

यशस्वी होतीलहि; आणि तसें झाल्यास जडवादी लोक आम्ही जीवशक्ति निर्माण करतो असा टाहो फोडू लागण्याचा पुष्कळ संभव आहे. तेव्हा त्याहि शक्यतेचा विचार करून त्या दृष्टीनें आपल्या सिद्धांतावर त्या संभवनीय नवशोधनाच्या प्रकाशाचा झोत पाडून त्याची सत्यासत्यता नि अभंगता कितपत टिकते हे बघणे अत्यावश्य आहे.

सजीव सृष्टिनिर्मिति शक्य कोटींत आली आहे असें गृहीत धरूनहि जीवशक्ति वा चिच्छक्ति निर्माण केली असें ठरणें विज्ञानशास्त्राच्या आजपर्यंतच्या सिद्धानदृष्टीने अशक्य आहे. जीवशक्ति प्रकट करण्याचा—विशिष्ट प्रकारच्या अेका वा अनेक जीवसृष्टीच्या प्रकटीकरणाचा मार्ग सांपडला अितकेच त्याना म्हणतां येअील. कोणत्याहि प्रकारच्या विविध पदार्थसंयोगाने वा मिश्रणाने आणि विशिष्ठ रचनाकौशल्याने जीवशक्ति निर्माण केली—जगात नवी शक्ति अस्तित्वांत आणली असें म्हणतां येणार नाही. ी गोष्ट विद्युत् आदिक जडशक्तीच्या परिशोधकांच्या म्हणण्यावरून स्पष्ट लक्ष्यात येण्यासारखी आहे. तेव्हा अमुक अेका मिश्रणातून नि रचनेनें ती शक्ति प्रकट झाली अितकेच ठरेल. त्या नव्या शोधानें जडवाद्यांना विशेष प्रकारचा रासायनिक परिणाम तो आहे असें म्हणतां येणार नाहीं. ऑक्सिजन हैड्रोजनच्या अेकीकरणाने तिसरी अेक पाणी ही वस्तु निर्माण होते आणि त्या दोन वायूचें रूप अंतर्धान पावतें. तसे या जीवशक्तीचे होणें शक्य नाही. जीवशक्ति जेथें प्रकट होते तेथें जडवाद्यांची रसायनें स्वतःचें अस्तित्व टिकवून असतात. अर्थात् त्यांच्या मिश्रणाचें जीव हें स्वरूप नसून त्या संमिश्रण—रचनेनें प्रकट झालेली ती शक्तीच आहे असे स्पष्ट ठरेल. पण येवढ्यानें भागत नाही. यामुळें 'पूर्वकर्मानुरूप जन्म' या सिद्धांताला बाह्यतः तरी प्रबल धक्का बसल्यासारखा देखावा अुत्पन्न करणारें कारण झालें असें सकृत्दर्शनी वाटेल. कारण 'आम्ही वाटेल तेव्हां नि वाटेल तेथें तें तें मिश्रण नि रचना अस्तित्वात आणून जीवसृष्टि निर्माण करतों. त्यांत तुमच्या कर्मानुरूप जन्माचे सिद्धांताला स्थान कोठें आहे? आम्ही निर्माण केलेले सजीव प्राणी आम्ही निर्माण केले म्हणून जीवधारी झाले—नाहीतर झाले नसते. तेव्हां त्यांची सजीव स्थिति नि गति याला आमची अिच्छा कारण

झालेली आहे–तुमच्या कर्मसिद्धांताची आवश्यकता नाही आणि तें कारणहि होऊं वा ठरूं शकत नाही.' असे ते म्हणू लागतील; आणि म्हणून या संभवनीय अशा समर्पक दिसणाऱ्या परतु हेत्वाभासाच्या युक्तिवादाचा फोलपणा स्पष्ट केला पाहिजे.

जगात अुद्भिज. स्वेदज, अडज, जारज योनीतील अनंत कोटी जीवांचे अुत्पत्ति–क्षय क्षणोक्षणाला होत आलेले आहेत नि तसेच ते चालू राहणार. या अनतसंख्य योनीतून भ्रमण करणारे नि भ्रमण करू पाहणारे जीव आपल्या योग्य कालाची नि स्थलाची जणूं काही अगदी वाट पाहत बसलेले असतात; आणि कालापेक्षा आत्मप्रकटनाला वा कर्मभोगयोग्य योनीत जन्म घेण्याला योग्य स्थलाची वाट पाहत असण्याचाच सभव अधिक असणार. अनुरूप स्थल, परिस्थिति नि वस्तुस्थिति निर्माण होताच वा दिसून येताच तो तो जीव आपापल्या प्रकटनार्थ आतुरतेने पुढे सरत राहणार अथवा कर्मफलभोक्तृत्वशक्ति त्याला त्या त्या योनीत जाण्याला योग्य स्थल मिळतांच त्या त्या जीवाला जन्म घेण्यास भाग पाडीत राहणार. अुद्भिजातील चारी खाणींतील जन्मनिमित्ते सुद्धां जन्मघेत्या जीवाला सुयोग्य साधन निर्माण करून देण्याचेंच कार्य करतात–नवीन जीव निर्माण करीत नाहीत. या चार खाणीतील जीवजन्माला ज्या प्रकारच्या साधनाची अनुकूलता निर्माण करण्याचे कार्य फलबीज, स्वेद, अंड वा स्त्रीपुरुष रेत ही करीत होतीं, त्यातच विज्ञानशास्त्र्यांनी निर्मू घातलेल्या कृत्रिम साधनाची अेक नवी भर पडणार अितकेंच, आणि त्या चार खाणीतील साधनानुकूलता मिळताच ज्याप्रमाणें जीव जन्म घेत आले आहेत, त्याचप्रमाणे आत्मप्रकटनाला सुयोग्य शरीर–मग तें कोणत्याहि प्रतीचें, श्रेणीचें, योग्यतेचे वा प्रकारचे असो–निर्माण झालेले दिसतांच आत्मप्रकटनार्थ अुत्सुक जीवसमुहातून निमित शरीरभोगयोग्य जीव त्यांत प्रवेश करील नि आपले कर्मभोगाचे भोक्तृत्व संपविण्याचा प्रयत्न करीत राहील. त्या विज्ञानवाद्याला जीवप्रवेशयोग्य शरीरनिर्मितीचे काय तें श्रेय मिळेल अितकेंच; पण त्याचा अर्थ तो जीवनिर्मिति करूं शकतो वा करूं शकेल असा केव्हांहि धरता येणार नाही आणि म्हणून या घडूं घातलेल्या नव्या गोष्टीच्या यशानेहि आपल्या जीवशक्तीच्या स्वतंत्र अस्ति-

त्याच्या सिद्धांताला यत्किंचित्हि बाध येण्याचें कारण नाहीं–सभवहि नाहीं. तेव्हा या वस्तुस्थितीमुळे अुत्पन्न होणारा दृष्टिभ्रमकारी युक्तिवाद तत्त्व-विवेचकाच्या विवेकापुढे कसा टिकणार ?

वरे ! हें नुसत्या विचाराच्या कसोटीला टिकत नाही अितकेंच नाहीं तर प्रायोगिक विज्ञानशास्त्रांतील गहन विचारकांचे समतीनेंहि जडानागें अिच्छा नि संकल्पधारी शक्ति आहे, हें स्वीकृत करावे लागतें. येवढेंच नाही तर आता विज्ञानशास्त्रेंहि हें विश्व चिन्मयच आहे असे प्रतिपादावयास मिद्ध झालेली आहेत. त्याचप्रमाणे मानसशास्त्रदृष्टचा जन्मतःच लोकविलक्षण शक्तिमंपन्नता असलेल्या व्यक्तीच्या त्या त्या शक्ति पूर्वजन्म मानावयाला लावतात. पूर्वजन्मस्मृतीची निर्विवादपणें सिद्ध झालेली अुदाहरणें पाहिलीं असताहि जीवशक्ति वा आत्मशक्ति ही देहाबरोबरच विलय पावणारी नसून अनेक देहधारण करणारी आहे असेच ठरते. त्याचप्रमाणे मनःसामर्थ्याच्या अुदाहरणानी नि योगप्रवण योगिश्रेष्ठांच्या अुदाहरणावरूनहि वरील प्रमेय निर्विवाद सिद्ध होते. बौद्धिक विचारदृष्टचा, मानसशास्त्रदृष्टचा, पूर्वजन्म-स्मृतिदृष्टचा, प्रत्यक्ष प्रमाणभूत अनुभवदृष्टचा आत्मशक्ति ही स्वयस्वतंत्र, स्वयमिद्ध, चालक, प्रेरक नि ज्ञानशक्तिसपन्न अशी ठरून ती देहांतरें करीत काहीं अेका विशिष्ट हेतूसाठी जन्ममरणाच्या रहाटगाडग्यांतून अितस्ततः फिरत आहे हे मानल्यावाचून सुटका नाही.

तेव्हा विश्व वा जग हें जिचे कार्यक्षेत्र आहे अशा या विश्वाला वा जगाला जाणणाऱ्या जीवशक्तीचे जन्ममरणप्रक्रियेच्या द्वारें अिष्ट साधनकार्य सतत चाललेले असते, हे स्पष्ट झाले. यापुढें आपणाला या जीवशक्तीचें वा जीवाचे अिष्ट कोणते, त्या अिष्ट साधनेसाठी ते कसकसे प्रयत्न करीत आहेत, ते प्रयत्न स्वाभाविकतःच योग्य मार्गानें होत आहेत काय, नसल्यास तो योग्य मार्ग कोणता, अित्यादि गोष्टीकडे वळणें प्राप्त आहे. त्यांपैकीं जीवांचें अिष्ट कोणते, हा पहिला प्रश्न आपण हातीं घेअू.

---

## २५ जीवांचें अिष्ट कोणतें ?

आपल्या प्रश्नाचें अुत्तर शोधीत असतां वा या पुस्तकांतील अितर कोणतेहि प्रश्न अुलगडण्याचा प्रयत्न करीत असतां आवश्यक तितक्या नि तेवढ्याच तत्वज्ञाननिर्णित सिद्धांताकडे साधारणत: पटूं शकेल असा अंगुलिनिर्देश करावयाचा आहे. तत्वज्ञानाच्या गहनगंभीर प्रदेशांत सिंहसंचार करणाऱ्या बुद्धीवादाचें अवलंबन करावयाचे नाही नि त्याची तितकी आवश्यकताहि नाही. आपल्या पुस्तकाचा तो विषयच नाही. तथापि तत्वज्ञान प्रदेशाच्या सीमेवरून त्या प्रदेशांतील काही सिद्धांतस्थलांकडे प्रश्नोत्तर शोधनार्थ दृष्टिक्षेप करणें मात्र आवश्यक झालेलें आहे; आणि तेवढे प्रसंगवशात् करणे ओघप्राप्त होणार आहे. जगामधील वा या विश्वामधील अणुपरमाणूंपासून तो महान् प्रचंड गोलांपर्यंत नि त्या गोलांच्या सूर्यमालिकेपर्यंत आणि अत्यंत क्षुल्लकशा कीटाणूपासून तो अत्यंत सुपरिणत मनुष्यप्राण्यापर्यंत सर्व सजीव निर्जीव पदार्थमात्र हा गतिशील आहे. तो असलेल्या स्थितीत राहूं अिच्छित नाही. बसलेल्या स्थलीं ठरत नाही. पदार्थमात्र आपलें स्थान नि स्थिति सारखी बदलीत असतो. स्थिति नि स्थान बदलताना त्या त्या पदार्थांना अितर पदार्थांतून कांहीचें सहाय्य घ्यावें लागते नि कांहींशी विरोध करावा लागतो; आणि याप्रमाणें सर्व पदार्थ गतिशील वा अधिक अन्वर्थक बोलावयाचें तर क्रियाशील राहतो. सर्व पदार्थ क्रियाशील असल्यामुळें त्या पदार्थांच्या क्रियांचा अितर पदार्थांवर बरावाअीट अथवा अनुकूलप्रतिकूल परिणाम होत असल्यामुळें तदनुसार त्या दुसऱ्या पदार्थांकडून त्या क्रियाकर्त्या पदार्थावर अनुकूल प्रतिकूल प्रतिक्रिया घडत असते. कोणताहि पदार्थ घेतला तर तो क्रिया-प्रतिक्रिया करणारा नि त्याचेवर अितरांची क्रिया-प्रतिक्रिया घडत असलेला असा दिसतो. या विश्वातील सर्व पदार्थमात्रांची क्रिया-प्रतिक्रिया या रूपानें घुसळण चाललेली आहे, याचें कारण काय ? या क्रिया-प्रतिक्रियांना प्रवृत्त करणारी अशी कोणती प्रेरणा या प्रत्येक पदार्थाला प्रवृत्त करीत आहे ? विज्ञानशास्त्र सांगते कीं, प्रत्येक पदार्थमात्रामध्यें-मग तो निर्जीव कां असेना-संवेदनाशक्ति नि संकल्पशक्ति

वास करीत असते. यांपैकी संवेदनाशक्तीमध्यें कशाकशाचा अंतर्भाव होतो हें आपण पाहूं.

संवेदेनेत दोन भेद पडतात. अेक जागृत संवेदना, दुसरी अजागृत सवेदना परंतु हे दोन भेद पूर्णपणें लक्ष्यांत येण्यासाठी थोडेसे विवरण करण्याची आवश्यकता आहे. सर्व सजीव प्राण्यांमधील संवेदना-जागृत सवेदना आणि सर्व निर्जीव वा जड म्हणून ज्यांना म्हणतों वा समजतों त्याना–त्या पदार्थाना–असणारी अजागृत सवेदना म्हणावे लागेल. अजागृत सवेदना म्हणजे ज्या सवेदनेची स्पष्ट जाणीव–स्पष्ट ज्ञान ज्याचे त्याला होअूं शकत नाही ती होय. मुळीच कांही कळत नाही असें नव्हे. अुदाहरणार्थ आपण गाढ झोपेत असतां अेक प्रकारें आपला देह जडमूढ स्थितीला पोहोंचलेला असतो. अशा स्थितीत अंगाला जर प्रतिकूल संवेदनोत्पादी पदार्थांचा वा प्राण्यांचा स्पर्श झाला तर देह सुप्त स्थितीतच अंतर्गत पण अजाणत्या संवेदनेनें तो होत असलेला स्पर्श टाळू पाहतो. अंगाखाली खडा आला, ढेकूण चावूं लागला, नको असा गारपणा भासूं लागला अथवा अशीच कांही अनिष्ट गोष्ट घडूं लागली नि तिची तीव्रता देह जागा होण्याअितकी नसली तर तशा गाढ स्थितींतच त्या त्या स्पर्शाविरूद्ध देह क्रिया करीत असतो. सुप्त स्थितीत प्रतिकूल स्पर्शाविरूद्ध होणारी प्रतिक्रिया घडते म्हणून त्या स्थितीत संवेदनेचें अस्तित्व आहे असे निर्विवाद ठरतें. पण ती सवेदना कळण्याचे स्थितीची–जागृतीची नसते नि म्हणून तिला अजागृत सवेदना म्हणावी लागेल. अशाच प्रकारची अजागृत संवेदना, आपण ज्याना जड म्हणतों त्या पदार्थांमध्यें असते; कारण कोणत्याहि अिच्छेची प्रेरणा होणें हें सवेदनेचें अस्तित्व असल्यांवाचून शक्यच नाही असें विज्ञानशास्त्र ठामपणानें सांगतें.

प्रत्येक पदार्थ आपली स्थिति नि स्थल वदलीत असतो आणि याच क्रियेला आपण गति अशी संज्ञा देतो. या स्थिति नि स्थल बदलणाऱ्या क्रियेच्या संवेदनेमध्यें कांहीं विशिष्ट हेतु असला पाहिजे. या हेतूला वा अिच्छेला ( will ) अनुसरून आपलें स्थान नि स्थिति अमुक आहे असा अंतस्थलीं असलेला नि गूढ ठसा वा संस्कार आंतून त्या पदार्थाला हें स्थान

नि स्थिति तुझी नाहीं–ती सोड आणि अिष्ट स्थिति नि स्थलाकडे चल असें जणूं सांगत अवशतेने त्या त्या पदार्थाला ढकलीत आहे–स्वस्थ बसूं देत नाही. या वस्तुस्थितीमध्यें दोन गोष्टी आपणाला दिसून येतात. अेक अिष्ट वस्तुस्थितीच्या प्राप्तीची अिच्छा नि दुसरी अनिष्ट वस्तुस्थितीचा त्याग करण्याची अिच्छा–या त्या दोन गोष्टी होत.

ही अिष्ट स्थिति कोणती नि हें अिष्ट स्थल कोठें आहे याचा अुलगडा करण्यासाठी प्रयत्न केला पाहिजे. निर्जीव अशा वस्तूमधील क्रियेच्या पोटी प्रेरक अिच्छेचा हेतु काय आहे हे निर्विवादपणे समजण्यासाठी त्याच अिच्छेशी सजातीय असणाऱ्या सजीव प्राण्याच्या अिच्छेच्या मागे कोणता हेतु आहे हे पाहिलें पाहिजे. जो हेतु सजीव प्राणिमात्राला क्रियाशील बनवीत आहे तशाच प्रकारें निर्जीव पदार्थमात्राला क्रियाशील बनवण्याला तोच हेतु प्रेरक झाला असला पाहिजे, हे समजणे सोपे जाअील. सजीव प्राणीमात्र हा सुखार्थ, सुखप्राप्तीसाठी, क्रियाशील झालेला सर्वत्र निरपवाद दृष्टीनें दिसत असल्याने ती गोष्ट सहजपणें कोणाच्याहि लक्ष्यात यावयास जड जाणार नाही. सुख-प्राप्ति हा अेकमेव हेतु सर्व क्रियांचा जनक आहे. सुखाच्या प्रतिद्वंद्वी पदार्थाला दुःख अशी संज्ञा आहे. संस्कृत मानसशास्त्रकारानी या द्वंद्वाच्या ज्या व्याख्या केल्या आहेत त्या अत्यंत मार्मिक नि मूलग्राही आहेत. त्याहून अधिक समर्पक व्याख्या करता येणेंच शक्य नाही. त्याप्रमाणें **अनुकूल-वेदनीयं सुखम्**–म्हणजे अनुकूलतेचे वेदन अर्थात् संवेदनात्मक अनुभव येणे म्हणजे सुख होय. त्याचप्रमाणे '**प्रतिकूल–वेदनीयं दुःखम्**'–म्हणजे नको आहे–आपणाला विरोधक आहे अशाप्रकारचा संवेदनात्मक अनुभव म्हणजे दुःख होय. हीच गोष्ट आणखी निराळ्या प्रकारे मांडावयाची म्हणजे या क्षणी मिळत नसलेल्या अनुकूल संवेदनाची प्राप्ति म्हणजे सुख नि आधीच सुस्थितीत असलेल्या अनुकूलतेचा बिघाड करणारे अथवा मिळूं पाहणाऱ्या सुखाचे आड येणारें नि म्हणून प्रतिकूल संवेदक वाटणारें ते दुःख, असे म्हणतां येअील. प्राप्त वा शक्य सुखाचा बिघाड होणे ते दुःख नि अप्राप्त अनुकूल संवेदनेची प्राप्ति म्हणजे सुख अशीहि मांडणी करतां येअील. असें करण्याचें

कारण हें की दुःख म्हणून कांही निराळा पदार्थ वा प्रकार नाही; तर प्राप्त वा शक्य सुखाची हानि होणें यालाच आपण दुःख म्हणतों हें लक्ष्यांत यावे.

ही वरील गोष्ट लक्ष्यांत घेतली असता सर्व सजीव प्राण्यांची धडपड अट्टाहास नि प्रयत्नशीलतेचें अविश्रांत सातत्य हें केवळ सुखप्राप्त्यर्थच आहे हे स्पष्टपणे कळून येअील. ज्याप्रकारचे प्रयत्न सजीव प्राणी करतात त्याच प्रकारचे प्रयत्न निर्जीव वाटणाऱ्या सर्व स्थूल सूक्ष्म पदार्थांकडून होत आहेत. आणि म्हणून सजीवाचे प्रयत्नाचे मागें जो अेकमेव प्रेरक हेतु आहे तोच हेतु निर्जीव पदार्थमात्राच्याहि क्रियाशीलतेचा प्रेरक असला पाहिजे असें मानल्यावाचून गत्यतर नाही. ही सुखलिप्सा—ही सुखाची तीव्र नि चिरंतन अिच्छा—सर्व विश्वाला—चराचर अशा सजीवनिर्जीवाला—व्यापून राहिलेली आहे. या प्रचंड विश्वपसाऱ्यात असा अेकहि अणुरेणु सापडणार नाही की जो या सुखलिप्सेने प्रेरित होअून क्रिया—प्रतिक्रियाच्या कर्मचक्रांत सांपडलेला नाही; आणि म्हणून सुखलिप्साच काय ती अेकटी प्रेरक शक्ति या अखिल विश्वाला कर्मरत करण्यास कारणीभूत झालेली आहे हे स्पष्ट होतें. या प्रकरणाचे आधी जीवाचे अिष्ट कोणते असा प्रश्न आपल्यापुढे घेअून आपण त्याचे अुत्तर शोधता जीवमात्रांचे 'सुख' हे अिष्ट आहे हे वरील विवेचनावरून ध्यानी येअील. आता यापुढे दुसरा प्रश्न आपल्यापुढें जो अुभा राहतो तो त्या 'सुखरूप अिष्टसाधनार्थ प्रयत्न' ही जीवाची भ्रमशीलता आहे काय ? हा होय. या प्रश्नाकडे आपण आता वळू.

---

## २६ 'सुखसाधनार्थ प्रयत्न' ही जीवाची भ्रमशीलता आहे काय?

अेखादे अर्भक स्त्रियाचे घोळक्यात आपल्या चुकलेल्या प्रेमसर्वस्व मातेला हुडकण्यासाठी फिरत असता 'आअी' म्हणून हाक मारीत प्रत्येक स्त्रीच्या ओच्याला धरते, मातृभेटीच्या काल्पनिक आनंदानें त्या स्त्रीच्या मुखमंडलाकडे बघते नि मातृदर्शनाची निराशा होअून धरलेला ओचा सोडीत पुन्हां दुसऱ्या स्त्रीच्या ओच्यास पकडतें. असा क्रम त्याचे मातेची भेट होअीपावेतों चालूं असतो. मातृभेटीची आशा प्रत्येक प्रयत्नाच्या वेळी

तुटत असून सुद्धां त्याचे मनांत असलेल्या मातेच्या अस्तित्वज्ञानाने तें अर्भक आपल्या मातेची यथार्थ भेट होईपर्यंत आपला प्रयत्न अवशतेने करीत असतें. तसेंच या विश्वांत् सर्व जीवमात्रांचे प्रयत्न चाललेले असतात. प्रत्येक जीव सुखार्थ या वा त्या स्थितीला वा वस्तूला अडथळा करणारी म्हणून टाळीत सुखदायी म्हणून वाटणाऱ्या स्थितीची वा वस्तूची प्राप्ति करून घेण्याकरितां सारखा धडपडत असतो. प्रत्येक जीव प्रतिकूलता टाळीत नि सुखानुकूल वा सुखदायी वाटणारी अनुकूलता मिळवीत प्रयत्नशील झालेला असतो. अपेक्षेप्रमाणें सुखप्राप्ति खरोखरी झाली असती तर जीवांच्या प्रयत्नांना तेथेंच पूर्णविराम मिळाला असता. परतु तसे होत नाही. अनत स्थली, अनत स्थितीत अनेक वस्तूंना तो सुखार्थ चिकटतो. यावरून या धावत्या जीवाच्या मनांतील खरें अपेक्षित सुख अद्याप मिळाले नाही असेच म्हणावें लागतें. कारण अपेक्षित सुख मिळाले असतें तर जीवाचें सुखस्थानार्थ परिभ्रमण थांबलें असतें. तसें घडून येत नाही नि म्हणून अपेक्षित सुखप्राप्ति झाली नाही, हेंच अनुमान करणें भाग पडते. कदाचित् सुख ही भ्रामक कल्पना आहे नि ती भ्रमशीलता जीवांना निरर्थक काथ्याकूट करावयाला लावते असें म्हणावें तर निसर्गस्वभाव फसव्या आहे असे म्हणावे लागेल. परंतु तशी वस्तुस्थिति नाही, असें स्वानुभवानें सिद्ध करीत आहे. प्रकाशाच्या अस्तित्वानें जीवपेशींत डोळ्याची अुत्पत्ति झाली. ध्वनीने जीवपेशींमध्यें कानांना जन्म दिला. सृष्टीमधील नानाविध सुवासादिकानी घ्राणेंद्रिय निर्माण केलें असा अुत्क्रांतिवादाचा यथार्थ सिद्धांत आहे. जगामध्ये अिंद्रियग्राह्य वस्तूंच्या अस्तित्वामुळेंच अिंद्रियें त्या त्या बाह्य विषयांचा अुपभोग घेण्यासाठी जीवदेहांत निर्माण झाली. मनानें जाणण्यासारख्या अनुभवज्ञानाच्या अस्तित्वामुळें बुद्धींद्रियाची निर्मिति झाली. जगांतील स्थिरचर सजीव-निर्जीव जीवमात्रांत ही जी विश्वव्यापी निरपवाद अशी सुखप्रवृत्ति आहे तीच तेवढी भ्रमशीलता असेल असे म्हणणें म्हणजे निसर्गनियम अबाधित नाहींत असें अशास्त्रीय, अनुभवाला न पटणारें, नि सत्य वस्तुस्थितीच्या अुलट बडबडल्यासारखें होणारें आहे. सर्व जगाचें अेकमेव केंद्र होअून आपल्या भोंवतीं सर्व जगाला भ्रमण करावयास लावणारी ही सर्वव्यापी

निरपवाद सुखेच्छा सुखप्राप्तीच्या स्थानांचें निश्चित अस्तित्व असल्यावांचून विश्वामध्यें नि विश्वघटक जीवांमध्यें प्रादुर्भूत होणेच शक्य नाही.

---

## २७ सुखेच्छेमधील सुखकल्पनेचें स्वरूप

प्रत्येक जीवमात्रांत सुखेच्छा वास करीत आहे ही गोष्ट जरी निर्विवाद असली तरी सुखेच्छेला हवे असणारें सुखाचें अस्तित्वच मुळीं नसून ती कल्पना वा अिच्छा भ्रमात्मक आहे काय या शंकेचा विचार करतां आपणाला या विश्वाला केंद्रवर्तित्वाने निरपवादपणें आपल्या भोंवतीं फिरावयास लावणारी सुखेच्छा ही भ्रमकल्पना असूंच शकणार नाहीं हें ध्यानी आले. या सुखकल्पनेचें यथार्थ स्वरूप प्रत्यक जीव यथार्थदर्शी शब्दात कदाचित् प्रकट करूं शकणार नाही—पण प्रत्येक जीवाच्या बुद्धीन (will) मग तो जीव चेतन असो वा जड दिसो—त्या सुखेच्छेला अभोप्सित असलेल्या सुखाचे स्वरूप यथार्थतेने अंकित झालेले आहे हे थोडयाशा विचारांनी आपल्या ध्यानी येअील. अेखाद्याला अेखादी वस्तु हवी असली तर ती वस्तु मिळाली की त्या वस्तूपुरते त्याचे प्रयत्न बंद पडतात. पुढें प्रयत्न होत नाहीत. या जगामध्ये जेवढी म्हणून स्थूलमानाने सुखें मानली जातात त्याचे वा त्यातोल अेकाहि सुखाचे स्वरूप बुद्धीमध्ये जीवाने धारण केलेल्या यथार्थ सुखस्वरूपासारखे असते तर जीवाचें सुखार्थ प्रयत्नांना पूर्णविराम मिळाला असता. पण तसे घडून येताना दिसत नाही. यावरून मिळणाऱ्या सुखामधून अेकहि ते अभीप्सित सुख नाही हे स्पष्ट कळण्यासारखे आहे. जगामधील सुख म्हणवल्या जाणाऱ्या सुखांमध्ये सुखलिप्सु जीवाची काय स्थिति असते ती पाहिली म्हणजे वरील म्हणणे नीट पटेल. प्रत्येक सुखप्राप्तीच्या वेळी मनुष्याचे मन **सर्वतोपरी परिपूर्णपणें सुखमय** झालेले नसते. सुखाचा आभास होत असतांच—'सुखानुभव'—घेत असताच मनाच्या पृष्ठभागापासून नि आजूबाजूंनी त्या सुखरूप क्षणाची क्षणिकता मनाला बोचत असते. मिळतें सुख निरवधि, अखंड नि अनत नाही या जाणीवेनें सुखानुभवक्षणीहि तेवढया क्षणापुरत्या येणाऱ्या 'सुखानुभवा' ची 'सुख' मयता परिपूर्णपणें मन

अुपभोगूं शकत नाही. मनाचा मनपणा सुखात पूर्णपणें विरून जाअून मनाची **सुखलीनता** अुत्पन्न होअू शकत नाही. मागील अुदाहरणात चुकते अर्भक मातृ-भेटीसाठी काल्पनिक आनंदाने हाती आलेल्या स्त्रीला कवटाळू पाहते न पाहते तोंच निराशेच्या प्रदेशात शिरून त्याचा आनंद मावळतो–खऱ्या मातृभेटीने होणारा आनंद अुपभोगू शकत नाही. तद्वतच 'सुख' म्हणून ह्या कवटाळल्या जाणाऱ्या स्थितीत अभीप्सित सुखस्वरूपाची प्राप्ति नाही हीच जाणीव जणूं त्या मनाला पूर्ण सुखमय होअूं देत नाही. मिळणारें सुख कालाने मर्यादित आहे ही अेक बोचणी आणि ते मनाचा अंतर्बाह्यच सर्व प्रदेश व्यापू शकत नाही ही त्या 'सुखां'तील अुणीव या दोन गोष्टी मनाला पूर्ण सुखानुभवी होअू देत नाहीत; नि म्हणून ते सुख खरें सुखस्वरूपी असणे शक्य नसते. यावरून खरें सुखस्वरूप कोणते हे ठरण्यास अडचण पडणार नाही. जे सुख मनाचा अंतर्बाह्य प्रदेश (मानसशास्त्रवेत्यानी मनाचे अंतस्थलीय मन Sub-Conscious नि बाह्यमन Conscious असे दोन भेद केले आहेत–ते प्रदेश) पूर्णपणे व्यापून मनाचा मनपणा अुरू देत नाही आणि ज्या सुखाला कालाची मर्यादा नाही–अर्थात् अनंत आहे असे सुख जर जीवाला मिळालें तर तेथें जीवाच्या जीवपणाची क्रियाशील धडपड बंद पडून त्याला पूर्णविराम मिळेल, ही गोष्ट कोणाला पटणार नाही?

अर्थात् प्रत्येक जीवमात्राच्या 'सुखार्थ–प्रयत्ना'च्या मागें अशा मधन, अमर्याद नि अनंत सुखस्वरूपाची शक्ति प्रेरक होअून प्रत्येक जीवाला तशी सुखप्राप्ति करून घेण्याला प्रवृत्त करीत आहे, यांत शंका नाही; आणि तसें सुख त्याला सुखकल्पनेने कमावल्या स्थितींत वा प्राप्त करून घेतलेल्या वस्तूंत मिळत नसल्याने तो तो जीव चुकत्या अर्भकाप्रमाणे अिष्ट प्राप्ति–अभीप्सित सुखस्वरूपप्राप्ति–होअीपर्यंत सतत कर्मशील नि कर्मप्रवण होअून आपलें अिष्ट शोधनाचें कार्य करीत राहतो नि तें अभीप्सित सुखप्राप्त होतांच विराम पावतो. हें शेवटचें विधान वाचताच वाचकवर्गाचे मन अेका-अेकी चमकून अुठण्याचा संभव आहे. कारण कालाने नि परिसीमेने अनंत नि अमर्याद असलेल्या सुखाची प्राप्ति झाली असतां जीवमात्र तल्लीन होअून विराम पावेल ही तर्काला नि मनोमय साक्षीला पटणारी गोष्ट

घडल्याचें नि प्रत्यक्ष अनुभवाला आल्याचें प्रत्यंतर दाखविण्यापूर्वीच अनन स्वरूपी सुख मिळतें नि त्यांत जीव विराम पावतो हें विधान धाडसाचें वाटेल. पण थोडा विचार केला असतां हिंदुस्थानातील वाचकाना तरी तशी अुदाहरणे देअून ती गोष्ट पटविण्याचें विशेषसे कारण नाही—कारण असख्य आत्मतृप्त—असीम सुखतृप्त—महापुरुषाच्या स्वत.च्या आत्मतृप्तीच्या ढेकरेचे आपल्या आत्मतृप्तीच्या क्षणी काढलेले शतशः अुद्गार साधुसंत वाङ्मयात शेंकडो स्थली सापडतील. ज्या संशयी मनाना त्याच्या अुद्गाराच्या साक्षी पटणार नाहींत त्याना येथे अुदाहरणें देअूनहि त्याचा खरेपणा पटणार नाहीं. म्हणून त्याना वरील सर्व सामान्यत. तर्कानें काढलेल्या अनुमानावर नि सुखेच्छेच्या वैश्विक निसर्गप्रेरणेच्या मागें निसर्गनियमान्वयें खऱ्या असलेल्या स्वाभाविक सुखस्वरूपाच्या वस्तुस्थितीच्या सिद्धांतावरच अवलबून राहावें लागणार आहे. नि म्हणून आत्मतृप्तीच्या अनुभवांची अुदाहरणें न देता केवळ अेक ओझरतें विधान करावे लागलें.

---

## २८ असीम सुखप्राप्तीचें शास्त्र असूं शकेल काय?

जीव हा जीवोत्पत्तीचे वेळीच अुत्पन्न होअून देहनाशानें नष्ट होतो अशी वस्तुस्थिति नसून तो देहोत्पत्तीपूर्वी नि देहपातानतरहि अस्तित्वात राहून असीम सुखप्राप्तीच्या—सुखेच्छेच्या—प्रेरणेने या विश्वांत अितस्ततः धावत फिरत असतो. सर्व जीवमात्र या सुखरूपतेच्या मागें तिचा पाठलाग करीत फिरतात. त्यांत अेकहि अपवाद सापडत नाही—सांपडणार नाही. मानवीय जगांत प्रत्येक अिच्छाक्षेत्रांतील कार्यप्रवणतेला मार्गदर्शनाची आवश्यकता असते आणि अशा मार्गदर्शनालाच शास्त्र असें म्हणतात. मनुष्याच्या शारीरिक मानसिक, बौद्धिक, क्षेत्रांमध्यें व्यक्तिगत नि सामाजिक दृष्टीनें विविध प्रकारें आवश्यकता निर्माण होअून त्या त्या आवश्यकता पुरवून घेण्याचे मार्ग निर्माण झाले आहेत आणि त्या त्या क्षेत्रांतील मार्गनिर्मिति होअून तत्प्रतिपादनार्थ शास्त्रें बनवलेलीं आहेत. शारीरिक क्षेत्रांत सूपशास्त्र, व्यायामशास्त्र, शरीरशास्त्र, वैद्यकशास्त्र आदिक शास्त्रें; मानसिक

क्षेत्रांत गायनशास्त्र, चित्रकलाशास्त्र, नृत्यशास्त्र,वादनशास्त्रादि विविध शास्त्रें; बौद्धिक जगांत गणितशास्त्र, मानसशास्त्र, विज्ञानशास्त्र, ज्योतिषशास्त्रादिक; त्याचप्रमाणें सामाजिक क्षेत्रांत समाजशास्त्र, अर्थशास्त्र, राज्यव्यवहारशास्त्र, युद्धशास्त्र आदिक शास्त्रें नि तत्सम अनेकशः ज्ञानशास्त्रांचे ज्ञानविस्तार होऊन ती तीं शास्त्रें निर्माण झाली आहेत नि होत आहेत. अनुभवाचे पायावर सर्वशास्त्रसिद्धांत बसवून त्याच्या मांडणीने त्या त्या शास्त्रांची मांडणी झालेली असते. जी गोष्ट अजाणतेपणानें मिळविण्याचे प्रयत्न केले असतां साध्य होणें अत्यंत कठिण जातें अथवा अशक्य होऊन बसते, तीच गोष्ट शास्त्रदर्शित मार्गानें साध्य करणाऱ्याला कमीत कमी श्रमानें, अधिकाधिक सुलभपणे नि शक्य तितक्या अल्पकालात निश्चितपणें साध्य करून घेतां येणे शक्य ठरतें. शास्त्रविहीन अजाणत्या प्रयत्नात अत्यंत कष्टाची प्राप्ति नि अपयशाची भीति असते; आणि म्हणून प्रत्येक प्रकारच्या अिच्छातृप्तीचें शास्त्र बनलें जाऊन सुगम मार्गाने नि निश्चितपणें अिच्छातृप्तीचा हेतु सिद्ध होण्याचा मार्ग मोकळा होतो. सर्वच अिच्छा सर्वांना होत नाहीत. कोणाला ज्ञानलालसा असते तर कोणाला सामर्थ्य संपादनाची महत्वाकांक्षा अस्वस्थ करत असते. कांही संपत्तिप्राप्त्यर्थ निरनिगाळे मार्ग अवलंबू धावतात. कांहीना कलाप्रेम गुग करून सोडते. अशा अनेकविध अिच्छापरितृप्तीसाठी तर अनेकविध व्यक्ति नि व्यक्तिसमूह प्रयत्नशील होतात आणि त्याच्या त्याच्या अिच्छेनें अिच्छिल्या अिष्टप्राप्त्यर्थ निरनिराळी शास्त्रें निर्माण झालेली असतात. मग या अनंतविध व्यक्तीच्या अिच्छाभेदांचें पोटी जी अेक सर्वसामान्य, सर्वव्यापी, निरपवाद अशी आकांक्षा जीवमात्रांना कर्माकर्माच्या चक्रांत सारखी घुमवित आहे त्या विश्वव्यापी सुखेच्छेच्या–त्या असीम, अनंत अशा परमसुखाच्या अिच्छेच्या परितृप्त्यर्थ शास्त्र निर्माण झालेलें नसणें हे अत्यंत अस्वाभाविक आहे. निरनिराळ्या ज्ञानशाखांची शास्त्रें निर्माण होण्याला कारणीभूत झालेल्या अिच्छांच्या पूर्तीसाठीं निरनिराळी जी शास्त्रे झालीं त्या शास्त्रांचा परस्पराशीं संबंध असलाच पाहिजे वा असतोच असे नाहीं. परंतु या परमसुखेच्छेच्या नैसर्गिक सर्वव्यापित्वामुळें त्या विश्वव्यापी नि सर्वत्र निरपवादपणें वसत असलेल्या अिच्छेच्या सफलतेकरितां निर्माण

झालेलें शास्त्र अितर शास्त्रासारखें अेकदेशी नि अल्पव्यापी होणें शक्य नाहीं. ते शास्त्र मानवी जगातील विविध प्रकारच्या हालचालींना, कर्तव्यांना, कार्यांना, चळवळींना सर्व मानवी जगाच्या व्यक्तिशः नि समष्टिशः शारीरिक, मानसिक, बौद्धिक नि आध्यात्मिक अशा सर्व प्रकारच्या कर्मांना व्यापणारें, वळण देणारे, दिशा दाखविणारें, नियमन करणारें नि सार्थकता देणारें असेंच असलें पाहिजे; आणि तरच जीवमात्रांना कर्माला प्रवृत्त करणाऱ्या परम-सुखप्राप्तीच्या मार्गदर्शनाचें शास्त्र त्याला म्हणतां येअील आणि त्या शास्त्रालाच धर्म हे नाव आहे.

---

## २९ तें शास्त्र म्हणजे धर्म

बाल, तरुण प्रौढ, वृद्ध आदिक अवस्थांतील विद्यार्जनी वा ज्ञानकला-संपादी, गृहस्थ, संन्यासी वा संसारत्यागी अित्यादि सर्व स्थितींतील स्त्री-पुरुषांच्या अनंत प्रकारच्या निरनिराळ्या क्षेत्रांतील अुद्योग-व्यवसायांना परमसुखप्राप्तिहेतूच्या सिद्धीला अुपकारक, सहाय्यक नि यशस्कर होअील असें वळण लावून देअून प्रत्येक व्यक्तीला अधिकात अधिक सुलभतेनें नि कमीत कमी कष्टानें परमसुखप्राप्तिहेतु साध्य करून घेतां येअील अशा प्रकारे शासन निर्माण करणे हे धर्माचें कार्य आहे. आणि म्हणून धर्म हा अेकदेशी, अल्पव्यापी असा न राहता ज्याप्रमाणे परमसुखप्राप्ति-हेतु सर्व जीवांना सर्व अवस्थेंत, सर्व स्थली, सर्व कृत्यात सोडू शकत नाहीं त्याचप्रमाणे त्या सर्वव्यापी हेतूच्या सिद्ध्यर्थ प्रवृत्त झालेलें शास्त्रहि सर्वव्यापी होत सर्व मानवी जीवांना, सर्व अवस्थेंत, सर्व काली, सर्व स्थली नि सर्व कृत्यांत न सोडतां त्या सर्वव्यापी हेतुसिध्दीसाठी प्रत्येक व्यक्तिसमूहांच्या नि अखिल मानव जातीच्या सर्व प्रकारच्या क्रियाशीलतेचें सर्व क्षेत्रांत अुपकारकपणें नियमन करणारेंच असलें पाहिजे. तरच तें यथार्थ परमसुखप्राप्तिशास्त्र ठरेल अन्यथा नाही. यासाठीच तें शास्त्र म्हणजे धर्म हा मानवी जीवनव्यापी आहे. परमसुखप्राप्तिहेतु हा सर्व जीवमात्रांना अनंत कालापासून अनंत

कालापर्यंत भ्रमण करावयास लावीत राहणार आणि अशा या सर्व जगद्-व्यापी हेतूसाठीं निर्माण झालेलें शास्त्र–धर्म–मात्र अेकेदेशी नि सांतकालीन कसा असूं शकणार? तोहि मानवी जीवनव्यापीच असला पाहिजे.

जगामध्यें कोणतीहि गोष्ट वा कार्य यशाच्या दृष्टीनें अुत्तम प्रकारें पार पाडावयाचें असेल तर त्या त्या कार्याचा मार्ग यथार्थपणें दाखवणाऱ्या योग्य शास्त्राचे अनुरोधानें नि अनुसारानेंच करावयास पाहिजे. तसें न करणाराला अडचणींच्या ठोकरा बसत राहून बहुधा अपयशाची निराशाहि सोसण्याची पाळी येते. त्याचप्रमाणे जीवदशेच्या आरंभापासून ज्या अेका सर्वजीवप्रेरक परमसुखेच्छेच्या प्रेरणेनें जीवाला अनंत जन्ममरणाच्या फेऱ्यांतून फिरवीत आणून मनुष्ययोनींत जन्म दिला त्या सुखेच्छा–परि-पूर्तीसाठीं योग्य नि सुलभ मार्ग जाणून त्याप्रमाणें वागण्याचा यथाशक्य प्रयत्न करण्याची संधी देणारा नि सामर्थ्य बाळगणारा मनुष्यजन्म प्राप्त झाला असून जर मानवी देहधारी जीव परमसुखप्राप्तीसाठी शास्त्रानुसारें–धर्मानुसारें–जगांतील आपापले सर्व व्यवसाय चालवण्याचे टाळूं पाहील तर त्याला सामान्य अडचणीच नव्हे तर भयंकर क्लेशांच्या नि दुःखांच्या गर्तेत वारंवार गोते खात फिरावे लागण्याचा निश्चित संभव. हे जर टाळावयाचें असेल तर शक्य तितके क्लेश टाळीत नि दुःखें कमी करीत आपला मार्ग सुकर ठेवून अिष्टप्राप्ति करून घेण्याची अिच्छा होणें हेंच नैसर्गिक नि स्वाभाविक आहे; म्हणून परमसुखप्राप्तिशास्त्र–धर्म–हा मानवी जीवांना व्यक्तीसाठीं नि समष्टीसाठीहि हवा आहे. त्याबांचून गत्यंतर नाही. धर्म हवा असें वाटणेंच स्वाभाविक नि निसर्गानुकूल आहे. तो नको वाटणें हें अनैस-र्गिक, अस्वाभाविक नि म्हणून संकटोत्पादी आहे यांत शंका नाही.

मनुष्यांच्या जागतिक व्यवहारांत वैयक्तिक नि सामुदायिक अशा सर्व कृत्यांना, कार्यांना, कर्तव्यांना हालचालींना नि चळवळींना मार्गदर्शक नि नियामक असें तें शास्त्र झालें पाहिजे. अशा अर्थाचें जें विधान मागें केलेलें आहे, त्याची थोडीशी फोड येथें होणें आवश्यक झालें आहे; कारण ज्या समाजांना नि त्यांतील व्यक्तींना या शास्त्राची जाणीव नसेल वा ज्यांनीं त्या शास्त्राची जाणून बुजून अुपेक्षा करावयाची ठरवली असेल अशांचे व्यवहार

सुरळीत चालतात कीं नाहीं हें पाहून जर तसे ते सुरळित चालतात असें दिसत असले तर मग या शास्त्रांची आत्यतिक आवश्यकता आहे असें कसें म्हणतां येअील असा प्रश्न कित्येकाचे मनांत अुभा रहाणारा असल्यामुळें त्याचा परामर्ष घेतला पाहिजे.

जगांतील पदार्थमात्रांचें निरींद्रिय नि सेंद्रिय हे दोन वर्ग होतात. यच्चयावत् जगांतील जड पदार्थ असें ज्याना म्हणतो ते निरींद्रिय वर्गांत पडतात. नि सर्व अजड वा प्राणिमात्र—अत्यंत क्षुद्रशा जीवाणूपासून तो अत्यंत अुन्नत मनुष्यप्राण्यापर्यंत—सेंद्रियात मोडतात. निरींद्रय सृष्टींतील पदार्थांतसुद्धां अजाणती संवेदनाची बुद्धि वा अिच्छा असतात हें मागें सांगितलेलें आहे. ही अंतस्तलीन अिच्छा त्या त्या जड पदार्थाला कृतिशील बनवीत आपली स्थिति पालटविण्यास भाग पाडते. आणि यालाच गुणोत्कर्ष वा अुत्क्रांति म्हणतात. या जड जगतांतील पदार्थांचा स्थितिपालट होतां होतां त्यांच्यांत हळू हळू अिंद्रियशक्ति जागृत होअू लागून सेंद्रिय सृष्टीला आरंभ होतो. जीवंतपणा प्रकट व्हावयाला लागतो. अिंद्रियद्वारा जो कांहीं अनुभव येतो तो या आतील अिच्छेला तृप्त करावयाला समर्थ न होअून त्याच अिच्छेच्या 'पुढें चल' या नैसर्गिक आज्ञेला अनुसरून सेंद्रियतेंतूनच मनाची निर्मिति होते नि जीव अेक पायरी पुढ चढतो. या पुढील पायऱ्या चढत असतां जीवाला मागील जडता वा सेंद्रियता सर्वस्वीं सोडू शकत नाहीत आणि त्यांची अेकमेवता वा केवलताहि रहात नाहीं. जडत्व देहरूपानें रहातें नि तें अिंद्रियवशता धारण करतें. सेंद्रियता मनाला पुढें येअू देअून ती त्या नवोत्पन्न मनाची अनुगामिनी बनते. मनःशक्ति परिणत झालेल्या जीवामध्यें सुद्धां ज्या अिच्छेनें जीवाला येथपर्यंत मार्ग आक्रमावयाला लावला तिची येथेंहि परितृप्ति न झाल्यानें तिनें पुन्हां मनःशक्तिपर्यंत पोचलेल्या जीवाला पुढें जाण्याला प्रेरणा देअून त्याला बुद्धिशक्तिमान् केला. जडांमध्यें ती अिच्छा सर्वस्वी प्रतिबंधांत असल्यासारखी होती. तिला स्वतःला कांही अनुभवतां वा चाखतां येणें शक्य नव्हतें. तें तिला सेंद्रिय जगतांत करतां येअू लागलें. अिंद्रियें जगांतील विषय अर्पण करीत अिच्छेला त्यांचा आस्वाद देअू लागलीं. परंतु अेक तर अिंद्रियें सुखकरच विषय आणून

अुपभोगावयाला देतील, दु:खकर विषय देणार नाहींत असें नाही. समोर आलेला विषय ग्रहण करून सादर करणें अेवढेच अिंद्रियाचें कार्य. सुखकरच विषय घ्यावा नि दु:खकर टाकावा ही हेयस्वीकार्यवृत्ति त्यांच्यांत अुत्पन्न झालेली नसते. हें एक कारण नि जे कांही सुखोत्पादी अनुभव मिळतात ते अंतर्गत नि गूढ संस्काराशीं पूर्णपणें जुळणारे नसतात हें दुसरें नि प्रमुख कारण. यामुळें अनुकूलस्वीकाराची नि प्रतिकूलत्यागाची सहेतुक क्रिया करणारें जें मन तें निर्मिलें गेलें. तरीहि समाधान होणें शक्य होत नाही. कार्य करण्यासाठी देह, विषयग्रहणार्थ अिंद्रियें, अनुकूल प्रतिकूल ग्रहण-त्यागार्थ मन या सर्वांचा सग्रह करूनहि समाधानाची प्राप्ति त्यांचेपासून शक्य न झाल्यामुळें त्याच अंतर्गत अिच्छेनें मनाच्या पुढील श्रेष्ठतर बुद्धींद्रियाची प्राप्ति जीवाला करून दिली. ज्याप्रमाणें देह अिंद्रियाधीन, देहेंद्रियें ही दोन्हीहि मनाचे स्वाधीन, त्याचप्रमाणें गुणपरिणामवादाच्या वा अुत्क्रांतीच्या नियमाप्रमाणें या तिन्हीहिंपेक्षां श्रेष्ठतर नि अुत्क्रांत झालेले बुद्धीचे स्वाधीन वरील तीन्हीहि असणें ही निसर्गमान्य नि अुत्क्रांतिकारणाला अनुसरून असणारी गोष्ट आहे. परंतु मन हे कर्मप्रवृत्त करणारें नि अिंद्रियांना चालना देणारें साधन असल्यामुळें जीवाचे जवळील देह, अिंद्रियें, बुद्धि या सर्वांपेक्षां मन हें अत्यंत प्रबल आहे. आणि ते बुद्धीपेक्षां अिंद्रियांकडे अधिक झुकणारें आहे. पुढील मोठ्या लाभाकडे दृष्टि ठेवून आजचा स्वल्प लाभ सोडण्यास सिद्ध होणें हें प्रबुद्ध मनच करूं शकतें. ज्ञानसपन्न नि परिणत बुद्धीच्या स्वाधीन राहण्याचा स्वभाव बनलेल्या मनाला प्रबुद्ध मन ह्मणतात. अप्रबुद्ध मन भावी मोठ्या लाभापेक्षां लहान असला तरी तात्कालिक लाभाकडे झुकणारें असतें. मग तसें मन पुढील श्रेष्ठ सुखाकडे दुर्लक्ष करीत तात्कालिक अशा लहानशा सुखाकडे सतत प्रवृत्त होतें हें निराळें सांगावयास नकोच. कारण सुख मग तें क्षणिक कां असेना पण आतांच मिळणारें ह्मणून प्रिय असावयाचेंच. कारण तें स्वभावत: महान सुखेच्छेच्या श्रेष्ठतम योग्यतेचें नसलें तरी त्याची जाति तीच. अनेक वेळ अप्रबुद्ध मन क्षणिक लाभाला सोडूं शकेल. पण क्षणिकशा सुखाला कधीच सोडूं शकणार नाहीं. मग त्यापासून पुढें हानि कां असेना. हा मनाचा स्वभावच. अिंद्रियें हीं सुखसाधनें

त्याच्या हातीं राहणार, सुखासक्ति हा नैसर्गिक स्वभाव असणार आणि बुद्धीच्याकडे वळल्यास पुढील लाभासाठी नि श्रेष्ठ सुखासाठी सद्यःसुखाचा करावा लागणारा त्याग हा मूलस्वभावाविरुद्ध होणार अशी वस्तुस्थिति असते नि त्यामुळें मन हें स्वाभाविकपणेंच अिंद्रियलुब्ध राहून बुद्धिवश होण्याला अत्यंत अनिच्छुक बनतें.

निसर्गाच्या गुणपरिणामक्रमानें बुद्धींद्रियाचा झालेला विकास हा वाया जात नाही. बुद्धि ज्ञानशोधन करते, ज्ञानग्रहण करते नि प्राप्तज्ञानाच्या प्रकाशांत मनुष्याला मार्गदर्शन करते. हें तिनें कार्य अविरत चाललेलें असतें, आणि बुद्धीच्या याच कर्तृत्व शक्तीमुळे ह्या जगामधील अभ्युदयार्थ अुपयोगी पडणारी विविध शास्त्रें निर्माण झाली नि होत आहेत. हें कार्य चालत असतां नि ते कार्य करण्याला बुद्धीला शरीरअिंद्रियांद्वारा ार्य करून घेण्याकरितां मनालाच राबवावें लागतें. आणि याप्रमाणें हळू हळूं मनाला बुद्धीच्या स्वाधीन होअून कार्य करण्याची संवय लागते. सुखलोलुपतेच्या प्रबल क्षणांव्यतिरिक्त बाकी सर्व गोष्टींत मनाला बुद्धीच्या स्वाधीन राहून कार्य करणेंच योग्य वाटत असते. पण प्रबल सुखलोलुपतेच्या क्षणीं मात्र अिंद्रियांचे द्वारा मिळणारे सुखाची ओढ नि बुद्धिद्वारा पुढील श्रेष्ठतर लाभासाठीं तिचेकडून मनाला मुरड घालण्याचा होणारा प्रयत्न यांमध्यें विरोध अुत्पन्न होअून अप्रबुद्ध मन बुद्धीच्या स्वाधीन न राहतां अैंद्रियसुखाच्या ओढीनें ओढलें जातें. अिंद्रियजन्य विनाशी सुखाला प्रेय म्हणतात. प्रेय म्हणजे स्वभाववशतः जें प्रिय वाटतें तें. अविनाशी अशा परमसुखाचें जें गंतव्यस्थान तें श्रेय म्हटलें जातें. केवळ जडमयतेंतून जीव अधिकाधिक चेतनता प्रकट करीत करीत परमसुखाच्या स्थानाकडे जाण्या-साठीं पूर्ण चैतन्यमयतेकडे जी अवशतेनें धाव घेत चालला आहे त्या अनादि-कालीन प्रवासाची दगदग शक्य तितकी लवकर संपवून परमसुखस्थान गांठणें हें जीवाचें कल्याण. त्या प्राप्त होणाऱ्या कल्याणाला श्रेय म्हणतात. या श्रेयप्राप्तीचे अविश्रांत, अविरत नि अखंड दीर्घ प्रयत्न करण्याचें जगत् हेंच स्थान आहे. प्रयत्नकर्त्या मनाला जर अदम्य अुत्साही ठेवावयाचें असेल तर त्याचा अुत्साहभंग होणार नाहीं, असीम प्रयत्नशीलतेचे कालांत हें

निरुत्साहानें श्रांत, क्लांत, अुदासीन नि त्यामुळें जडमूढ बनणार नाहीं, यासाठीं त्याला सतत सुखाच्या, आरामाच्या, प्रेममय विश्रांतीच्या, मधाचें बोट चाटवीत राहिलेंच पाहिजे. त्याचे प्रेय सर्वांशी हिरावून घेता कामा नये. नाहींतर तें कार्यक्षम राहणार नाहीं त्याला सर्वस्वी प्रेयमग्नहि होअूं देअूं नये. नाहींतर श्रेयाची कार्यहानि होअील. लहान मुलाला ज्ञानसंपादन मार्गाला लावून त्याला ज्ञानी करण्याकरितां विद्यार्जनी मार्गांत गुंतवला असला तरी त्याचे खेळ बंद करणें घातुक होतें. त्याला खाअूला—मिष्ट रसास्वादाला—पारखा करून चालत नाही. त्याला करमणुक पाहिजे, खेळ पाहिजे खाअू पाहिजे, दांडगाअी पाहिजे, योग्य पालनपोषण पाहिजे, वस्त्रप्रावरण पाहिजे, सर्व कांहीं पाहिजे. खेळ करमणूक आदिक सर्व बंद करणें हेंहि मारक होतें. आणि सर्वस्वीं खेळाडू बनू देण्यानेहि हानि होतें. त्याला विद्यार्जनाची रुचि अुत्पन्न होअून तो ज्ञानलुब्ध नि विद्याप्रेमी बनवलाच पाहिजे. पण त्याला त्याचवेळी त्याचा तो प्रयत्न नि अभ्यास यशस्वी नि योग्य परिणामकारी होअूं देण्यासाठी त्याला विशिष्ट प्रमाणांत नि अुपकारकच होतील अशा प्रकारच्या निवडक बालवयोचित गोष्टीहि त्याला पुरवल्या पाहिजेत—करूं दिल्या पाहिजेत. तरच तो मनुष्योचित नि मनुष्योपकारक अशा ज्ञानसंपन्न योग्यतेला पोचूं शकेल. त्याचप्रमाणे श्रेयाचा मार्ग निर्वेधपणें योग्य प्रकारें, अदम्य अुत्साहभरानें, आक्रमतां यावा यासाठी श्रेयाला विरोधी होणार नाही अितकेंच नव्हे तर अनुकूलता, सुस्थता, स्वस्थता, अुपभोगीत अुत्साहभरानें श्रेयमार्गानुष्ठान व्यक्तीकडून नि समष्टीकडून घडावें यासाठीं प्रेयाचीहि मांडणी श्रेय पथोपकारी नि त्याला सहाय्यक होअील अशा प्रकारें झाली पाहिजे तरच श्रेयप्रेयाचे सामंजस्य राहील. श्रेयोपकारी प्रेय विपथगामी होणार नाही. जगांतील वैयक्तिक नि सामुदायिक अशा सर्व प्रकारच्या विविध कार्यक्षेत्रांचा समावेश प्रेयक्षेत्रांत होतो. आणि ज्या अेका महान् सुखप्राप्तिहेतूच्या प्रेरणेनें सर्व चराचर जगत् क्रियाशील बनलेलें आहे त्या हेतूची ओळख करून घेअून तदर्थ नि तदुन्मुख सर्व प्रयत्नांचें पर्यवसान होअील अशाप्रकारें आयु:क्रम ठेवीत तें श्रेष्ठ स्थान नि स्थिति मिळविणें हें 'श्रेय' ह्या श्रेणींत पडतें. अशा या श्रेयप्रेयांचे सामंजस्य घालून श्रेयाविरुद्ध

प्रेय जाणार नाही नि प्रेयसाधनानें प्रेयसाधन यथोचितपणें करीतच श्रेयाचा मार्ग आक्रमिला जाईल असें शासन निर्माण करणारें जें शास्त्र तो धर्म होय.

प्रत्येक व्यक्तीला श्रेयसाधनार्थ अवश्य असणारी सुस्थिति, सुसंपन्नता, वीतचिंतता, मिळविण्यासाठी–समाजाची म्हणजे राष्ट्राची स्थितिहि सुसंपन्न, सुस्थित, निर्भय, शांतिमय नि सुरक्षित अशी असली पाहिजे. जर राष्ट्राची स्थिति तशी अनुकूल, अुपकारक नि सहाय्यक नसेल तर वाटेल त्या व्यक्तीला वाटेल तेव्हां आपल्या श्रेयमार्गआक्रमणाचे कार्य करणें अशक्य होअून जाईल– आणि प्रेयाचाहि यथोचित लाभ घडणार नाही. याकरितां व्यक्तीला नि राष्ट्राला–व्यक्तीला नि समष्टीला–अुपकारक आणि अनुकूल परिस्थिति निर्माण करणें नि ती तशी सतत टिकविणें हें कार्य सुसपन्न होण्याला प्रेय वा अभ्युदय आणि श्रेष्ठ सुखप्राप्तीचा मार्ग सुसाध्य होअून अिष्टप्राप्ति होणें याला श्रेय वा निःश्रेयस् असे म्हणतात. या अभ्युदय निःश्रेयसार्थच धर्माचा अवतार आहे. श्रीमदाद्यशंकराचार्यांनी

३० "यतोऽभ्युदयानिःश्रेयसहेतुसिद्धिः स धर्मः ॥"

असें ह्मटलेंलें आहे. सर्व जगाची निसर्गनिर्मित नि स्वाभाविक धाव सुखाकडे आहे. मग तें सुख क्षणिक असो की चिरतन असो. अशा क्षणिक नि चिरंतन सुखाचे सामंजस्य राखून मानवी प्राण्याचे दोन्हीहि हेतु ज्यापासून सिद्ध होतात तो धर्म अशी यथार्थ व्याख्या सांगितली आहे. पूर्वाचार्यांनींहि तशाच अर्थाचें धर्मलक्षण दिलेलें आहे. केवळ अिंद्रियसुखोपभोगाला अुपयुक्त साधनसामुग्री वाढवीत अैहिक सुखोपभोगमग्नतेलाच चिकटून राहणें ह्मणजे निसर्गप्रेरित नि विश्वव्यापी अशा परमसुखेच्छातृप्तीचे हेतूला विरोधी होअून अनैसर्गिक नि म्हणून भयंकर हानिकारी, दुःसह संकटदायी आणि असीम क्लेशोत्पादी मार्ग स्वीकारणें होय. केवळ प्रेयामागें लागणाऱ्या व्यक्ति वा समाज कांही काल भरभराटीला आलेले दिसत असले तरी निसर्गक्रम त्यांची क्षमा करणार नाही. परमसुखप्राप्तीचा जो जीवाचा मौलिक नि निरपवादितेने सर्वत्र वास करणारा सर्वव्यापी हेतु आहे त्या हेतूला विरोधक मार्ग स्वीकारणें म्हणजे स्वभावाविरुध्द–जीवनिसर्गाविरुद्ध–

जाणें होय. आणि ज्याप्रमाणें जड निसर्गाविरुद्ध झालेल्या क्रियेची प्रतिक्रिया निसर्गविरुद्ध क्रियाकर्त्यावर होते त्याचप्रमाणें जीवनिसर्गाविरुद्ध जाणाऱ्या केवळ अभ्युदयसेवकांविरुद्धहि त्या सर्वव्यापी परमसुखेच्छारूप निसर्ग-देवतेची तशीच भयंकर प्रतिक्रिया लवकर वा अुशीरा झाल्यावाचून निश्चित राहणार नाहीं. अुलट प्रेयाला ह्मणजे अभ्युदयाला डावलून, त्याची अुपेक्षा किंबहुना त्याग करून केवळ निःश्रेयसामागे लागण्याची वा समाजाला लावण्याची हाव धरून हावभरी होणें हेहि अव्यवहार्य, निसर्गविरुद्ध नि ह्मणून भयंकर अपायकारी असें आहे. अभ्युदयाची खरी सार्थकता निःश्रेयसा-मुळच होणारी असून निःश्रेयसाविना अभ्युदय हा प्राण्याना संकटाच्या, क्लेशांच्या नि दुःखांच्या खाअीत लोटणारा आहे. आणि म्हणून निःश्रेय-सोन्मुख अभ्युदयहेतु साध्य व्हावा यासाठी जगाला धर्माची–वर वर्णन केलेले दोन्हीहि हेतु साध्य करून देणाऱ्या यथार्थ धर्माची–आवश्यकता आहे. नि म्हणून पुस्तकारंभीच्या

## ३१ ‘धर्म हवा कशाला?’

या प्रश्नाला सर्वजीवव्यापी परमसुखेच्छातृप्तिहेतु शक्य तितका सुलभ रीतीनें नि कमींत कमी कालांत प्राप्त व्हावा आणि तो हेतु सिद्ध करतां यावा अशा प्रकारची वैयक्तिक नि सामुदायिक सुस्थिति, सुसंपन्नता नि सुरक्षिति अित्यादि पूर्णपणें प्राप्त झालेलीं असावींत अथवा थोडक्यात म्हणावयाचें तर **या जगांतील अभ्युदय आणि प्राणिमात्रांना नैसर्गिक प्रेरणेनें प्रेरित करणारा परमसुखप्राप्तिहेतु–निःश्रेयस हीं दोन्हीहि यथार्थपणें मनुष्यसमाजाला नि त्यांतील व्यक्तीला प्राप्त व्हावींत,**

## ह्मणून धर्म हवा

हें अुत्तर येथपर्यंतचें विवेचन, प्रमाणशोधन, विवरण, परीक्षण नि निर्णय हीं आपणाला देत आहेत.

समाप्त

